योगीश्वर प्रकाशन, पुष्प १६वे

उदयगिरि महामंडलेश्वर, विजयनगर-[illegible]ख्यात
वेद-महाभाष्यकार

# श्रीमत् सायणाचार्य

वेदार्थ-विनोद
रामचंद्र गोविंद कोलंगडे

योगीश्वर याज्ञवल्क्य, भगवान गोतम बुद्ध, याज्ञवल्क्य-दर्शन,
ऋग्रत्न-भाण्डार, यजु-र्मणि-माला, ऋग्वेद-दर्शन,
इत्यादि ग्रंथांचा कर्ता



यावत्कीर्तिर्मनुष्यस्य न प्रणश्यति कौरव।
तावज्जीवति लोके स नष्ट कीर्तिर्विनश्यति॥

भारत

हुबळी १९५६ किंमत ४ रु.



जन्म-शके १७५१ समाधि-शके १८३२

ब्रम्हीभूत

श्रीस्वामी गोविंदानंद सरस्वती

यांची समाधि

जि. ठाणे —पनवेल

# अर्पण पत्रिका

धर्मश्रद्धा, ईश्वरभक्ति, पवित्राचरण, उद्योगशीलता
साधेपणा, करारी वर्तन, तेजस्वीबाणा
कर्तव्य-दक्षता, शांतवृत्ति,
इत्यादि सात्विक गुणमंडित

ब्रम्हीभूत

श्रीस्वामी गोविंदानंद सरस्वती

(पूर्व नाव-गोविंद नारायण नवरे, शीव, मुंबई)

यांच्या पुण्यस्मृतीस

हा ग्रंथ

अत्यादरपूर्वक अर्पण केला आहे

ग्रंथकर्ता

# चार शब्द

श्री कोलंगडे याना मी फार दिवसापासून ओळखतो ते हुबळींत वकीली करीत असत व किल्ल्यात आमच्या घराजवळच रहात असत त्याचा विद्या-व्यासग इतका मोठा असेल व पुढे ते इतके बडे लेखक होतील, याची कल्पना मला त्यावेळीं मुळींच नव्हती व कदाचित् त्यानाहि नसेल दुसऱ्याच्या भाडणावर व कायद्याच्या खेचाताणीच्या कुशलतेवर अवलबून असलेला किफायतशीर धंदा सोडून ग्रंथकाराच्या खडतर तपश्चर्येच्या क्षेत्रात त्यानी प्रवेश केला, हें फारच प्रशसनीय तसेच अनुकरणीय झाले आहे, यात शका नाहीं कुशाग्रबुद्धि ही एक ईश्वरदत्त देणगी आहे त्याचे आपण केवळ विश्वस्त (टस्टी) आहोत, व त्याच नात्यानें आपण त्याचा सदुपयोग करून आपली अल्प सेवा जनताजनार्दनास अर्पण केली पाहिजे, ही जाणीव होऊन त्याप्रमाणे वर्तन घडण्यास फार मोठी पुण्याई लागते ती श्री कोलगडे याना लाभून त्याच्याकडून भरीव अशी सात्विक साहित्यसेवा होत आहे, याबद्दल मी त्याचें अभिनदन करितो

आतां पर्यंत 'श्री योगीश्वर याज्ञवल्क्य', 'याज्ञवल्क्य दर्शन'(शतपथ-परिचय), भगवान गोतम बुद्ध, 'ऋग्रत्न-भाडार', 'ऋग्वेद-दर्शन' इत्यादि अलौकिक व प्राचीन महत्वाचे ग्रंथ लिहून या लेखकानी मराठी वाचक-वर्गाला कायमचे ऋणी केले आहे वेदमहाभाष्यकार श्रीमत् सायणाचार्यांचें सोपपत्तिक व सुदर चरित्र लिहून आता श्री कोलंगडे यांनी आपल्या ग्रथनिर्मि-तींत फारच मोठी व महत्वाची भर घातली आहे अशा तऱ्हेचे हें पहिलेच चरित्र असून, लेखकांनी लिहिताना फारच नम्रपणा स्वीकारला आहे इतिहास व चरित्र या दोन्ही विषयाबद्दल आपल्या देशात सग्रहीत व व्यवस्थित अशी फारच कमी माहिती मिळते आम्हा लोकास या विषयाचें महत्व जितकें वाटावयास पाहिजे होतें तितकें वाटलें नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट।

आहे इतिहास व चरित्रे हीं राष्ट्राची स्मरणवही, किंबहुना साचविलेलें स्मृतिभांडार आहे त्याच्या अभावीं 'शिवाजी एक लुटारू होता,' '१८५७ सालचें स्वातंत्र्य युद्ध हें एक खुळचट शिपायाचे बंड होतें', अशी भरमसाट खोडसाळ विधानें करून, आमच्या तरुणाच्या गळीं उतरविण्यास परकीयांस पूर्ण वाव मिळाला तरी पण न खचता अत्यंत परिश्रमपूर्वक सर्व उपलब्ध माहिती गोळा करून ऋषि-ऋण फेडण्याचा यशस्वी प्रयत्न श्री कोलंगडे यांनी येथें केला आहे, चरित्रात काय आणि इतिहासात काय, अखेरचा शब्द असा असू शकत नाहीं नवीन शोध झाल्यास, नवीन माहिती मिळाल्यास याहीपेक्षां सविस्तर असें श्री सायणाचार्यांचे चरित्र लिहिलें जाणे शक्य आहे परतु तो पर्यंत हा ग्रंथ वाचकवर्गास अत्यंत उपयुक्त ठरेल, यात शंका नाहीं

भारताच्या खऱ्याखुऱ्या तेजस्वी व उज्वल इतिहासाचें व संस्कृतीचें पूर्ण दर्शन होण्यास अजून बरेचसें संशोधनाचें कार्य झालें पाहिजे व एका जीवंत, तसेंच अत्यंत होतकरू, राष्ट्राच्या भवितव्यतेच्या दृष्टीनें सर्वांग परिपूर्ण असा इतिहास लिहिला गेला पाहिजे त्या बाबतींत आपल्याला विजयनगर साम्राज्याचा इतिहास फारच थोडा माहीत आहे, असें कबूल करावें लागतें ज्या बलशाली साम्राज्याचा पाया हुक्कबुक्क या दोघा वीर बांधवांनी सायणमाधव या दोन ज्ञानी भावांच्या सहाय्यानें घातला, तें साम्राज्य जवळ जवळ अडीचशे वर्षें (इ स १३३६-१५६४) अखंड टिकलें व त्यानें आक्रमणशील मुसलमानाना पायबंद घालून जेथल्या तेथें थोपवून धरलें विजयनगर शहराचें वैभव त्या वेळच्या जगातील कोणत्याहि राजधान्यापेक्षा विशेष व अपूर्व होतें, वगैरे गोष्टी इब्न बटूटा, निकोलो काँटि इत्यादि परकीय बखरकारांनी व प्रवाशांनी लिहून ठेविल्या आहेत

विजयनगरचें साम्राज्य केवळ राजकीय व आर्थिक दृष्टीनें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतें, यांत कांही आश्चर्य नाहीं पण सांस्कृतिक मोजमापानें देखील विद्या, साहित्य, शास्त्र, संगीतादि ललित कला, स्थापत्यादि शिल्प या

सर्वांमध्ये त्यानी बरीच आघाडी मारली होती, हें आज सांगण्यास फार अभिमान वाटतो

या दृष्टीने देखील श्री कोलगडे यानी श्री सायणाचार्यांचें हें चरित्र प्रसिद्ध करून आमच्या ज्ञानात फार मोठी भर घातली आहे वेदभाष्यकार सायणाचार्य, कीं ज्याना वाट पुसल्याशिवाय वेदार्थ लावण्याचा प्रयत्न देखील करता येत नाही, ते केवढे जाडे विद्वान होते व त्याचे व्यक्तिमत्व किती प्रभावी व अष्टपैलू होते, याचे छान दिग्दर्शन करून ग्रंथकारानी आम्हावर फार उपकार केले आहेत

या थोर महाविभूतीचें चरित्र सर्वांना उद्बोधक व स्फूर्तिदायक होवो, ग्रन्थकाराना आणखी नवीन नवीन ग्रंथ लिहिण्यास उत्तेजन मिळो अशी श्री भुवनेश्वरीची- श्रीमत् सायणाचार्यांच्या इष्ट दैवताची- प्रार्थना करून हे चार शब्द आटोपते घेतो

रांची
१—७—५५

रंगनाथ दिवाकर
(राज्यपाल, बिहार)

## प्रस्तावना

### तपसा वै लोकं जयति

—शतपथ

योगीश्वर ग्रथमालेतील हे सहावे व सुदर पुष्प महाराष्ट्रास सादर करण्यास आम्हास मोठा अभिमान व आनद वाटतो श्री शारदम्बेची खडतर वाङ्मय-तपश्चर्या करून आम्ही आता पर्यंत 'श्रीयोगीश्वर याज्ञवल्क्य, भगवान गोतमबुद्ध, याज्ञवल्क्य दर्शन, ऋग्रत्न-भाडार, व ऋग्वेद दर्शन' इत्यादि महत्वाचे ग्रथ प्रसिद्ध करून संस्कृति प्रेमी महाराष्ट्रास सादर केले व हें सहावे पुष्प म्हणजे 'वेदमहाभाष्यकार श्रीमत् सायणाचार्य' याचें पौरुषपूर्ण उद्‌बोधक चरित्र सादर करण्याचा सुयोग आज आम्हास लाभला, ही भवनीमातेची कृपाच आम्ही समजतो आम्ही आता पर्यंत प्रसिद्ध केलेले व पुढे होणारे सर्व ग्रथ प्राचीन सास्कृतिक छापाचे असून महाराष्ट्रास ते नाविन्य पूर्ण आहेत, हे ज्यानी आमचे ग्रंथ वाचून पाहिले आहेत, त्याना विशेष सागण्याची जरूरी नाही तशाच ठशाचा व तोडीचा हाहि ग्रथ आहे, इतकेच आम्ही सागू इच्छितो त्याची परीक्षा सुज्ञवाचक वर्गावरच सोपवून मोकळे होतो, म्हणजे झाले

सरस्वती-उपासक हा केव्हाहि व कोठेहि लक्ष्मीच्या अवकृपेतला असतोच व असला पाहिजे असा जणु ईश संकेतच दिसतो ! त्याला आम्ही तरी अपवाद कोठून असणार ? आणि ग्रथ-निर्मितीचें कार्य आत्मतन्त्र असलें, तरी प्रकाशनकार्य हें परतन्त्र व लक्ष्मीतन्त्र असल्यामुळ महालक्ष्मीच्या आराधनेसाठीं हुबळी सोडून लक्ष्मीच निवासस्थान असलेल्या मुंबापुरीकडे आम्ही धांव मारली व महत्प्रयासानें व जगदम्बेच्या कृपेने तेथील उदार व संस्कृति-प्रेमी लक्ष्मीपुत्रांनी व सद्‌गृहस्थांनी आम्हास यथाशक्ति आर्थिक मदत देऊन आमच्या वाङ्मय-तपस्येस प्रोत्साहान दिलें त्याचेंच दृश्य फल म्हणजे आमचें योगीश्वर प्रकाशन हें होय, असें सागण्यास आम्हांस आतां मोठा अभिमान वाटतो असो.

हें श्रीमत् सायणाचार्यांचें उद्‌बोधक व पौरुषपूर्ण चरित्र महाराष्ट्रापुढे ठेवण्यास आम्हास मोठा आनंद होत आहे ज्या महाभागाच्या महाभाष्यावरून ऋग्वेदासारख्या अत्यंत बोधप्रद अशा महाग्रंथाचे- म्हणजे ऋग्रत्न-भांडार व ऋग्वेद-दर्शन या ग्रंथद्वयाचें-महाराष्ट्र-भाषेतून चित्रण करण्याची स्फूर्ति व भाग्य आम्हास लाभले, अशा त्या परमथोर विद्वत्कुलशेखर श्रीमत् सायणाचार्यांच्या तेजस्वी चरित्रात ओझरतेच का होईना, पण जरा डोकावून पाहण्याची प्रबळ मनीच्छा होऊन त्या दिशेने चरित्राची ओळख करून घेणेच्या उद्योगास आम्ही लागलो प्रथम एक दोन विद्वानांचे ग्रंथ चाळून पाहिले पण आमचें त्यापासून समाधान झाले नाहीं म्हणून मुंबई पुणे व धारवाड येथील ग्रंथालयातून तत् संबंधक उपलब्ध ग्रंथ वाचून आम्हाला जी माहिती मिळाली, तिचें टाचण करून प्रस्तुत ग्रंथ तयार करण्यात आला आहे सदर्भग्रंथाची यादी पुढे देण्यात आली आहे

सायणाचार्यांचे चरित्र अनेक दृष्टीने आम्हास आज उद्‌बोधक व मननीय आहे विशेषत राजकारण व धर्मकारण हे त्यांचे दोन अत्यंत तेजस्वी पैलू आहेत राजकारण म्हणजे ते असें -- तेराव्या व चवदाव्या शतकात कडव्या इस्लामी सत्तेच्या प्रखर तलवारीच्या नंग्यानाचानें काश्मीर पासून कन्याकुमारीपर्यंत अखिल भारत देश अगदी रक्तबबाळ झाला होता. त्याच्या आसुरी अत्याचाराने भयभीत व चिंताक्रांत झाला होता जुलमी धर्मछळाने गुदमरून व हादरून गेला होता जाळपोळीनें व लूटमारीनें भडकून व भांबावून गेला होता थोडक्यात म्हणजे इस्लामच्या अनन्वित छळानें व जुलुमजबरदस्तीने अगदी त्रस्त व ग्रस्त होऊन गेला होता !!

पण दुर्दैवाची व दु खाची गोष्ट ही की त्यावेळी त्या धर्मवेड्या व रक्तपिपासु मुसलमानाच्या कडव्या आक्रमणशील महत्वाकांक्षेला पायबंद घालून शह देण्याचं सामर्थ्य व धारिष्ट्य तत्कालीन हिंदूराजवटीतील एकाहि राजाच्या मनगटात व छातीत नव्हते ! अशा कठीण व आणीबाणीच्या प्रसंगी कर्नाटकात नवचेतन्य तेजाळले! व दिव्य पौरुषाने इस्लामी आक्रमणाला

दक्षिणेत पायबंद बसून व सत्तेला धूळ चारून हिंदुपदपादशाहीचा एक तेजस्वी अंकुर वर डोकावला व त्याचेच पुढे मोठ्या साम्राज्यात रूपांतर झाले !!! वेदविद्याविशारद माधवाचार्य व शूर नरवीर हरिहर यांची मंगल युति जमून 'मयि बुद्धिर्बलं त्वयि' या जरासंधवधकालीन प्रभावी श्रीकृष्ण वचनाची पुनरावृत्ति झाली तो इतिहास सायणाचार्यांच्या चरित्राशी निगडित झाला असून, प्रस्तुत ग्रंथात त्याचा समयोचित उल्लेख करण्यात आला आहे

दुसरी गोष्ट प्रामुख्याने सांगावयाची म्हणजे धर्मकारण ही होय त्यावेळेला धर्माला जी ग्लानी आली होती, ती झाडून टाकून पुन त्याला नवा उजळा देण्याचा स्तुत्य उपक्रम जारीने सुरू करण्यात आला वेदविद्येचे पुनरुज्जीवन करण्यात आले व विविध धर्मग्रंथनिर्मितीला प्रोत्साहन मिळाले तो काल तत्त्वज्ञान, अध्यात्मशास्त्र, धार्मिक वाङ्मय, विविधशास्त्रे, इतिहास, पुराण व काव्य इत्यादि विविध विषयावर विद्वत्तापूर्ण ग्रंथ निर्माण करण्याचा असून, त्यात सायणाचार्यांचा फार मोठा भाग होता चारहि वेदांवर, ब्राम्हण ग्रंथावर, व्याकरणावर, अलंकार शास्त्रावर, पुराण ग्रंथावर, आयुर्वेदावर व इतर किरकोळ विषयांवर त्यांनी अनेक सुंदर, सरस व बोधप्रद ग्रंथ लिहून संस्कृत वाङ्मयात फार मोठी भर घालून ठेविली आहे त्याचा उल्लेखहि प्रस्तुत ग्रंथात प्रसंगानुसार करण्यात आला आहे

शिवाय राजकारणांतहि त्यांचा महत्वाचा संबंध आला आहे. प्रथम ते उदयगिरीच्या कंपराजाचे महाप्रधान होते त्यावेळी त्यांनी उदयगिरी राज्याची फार मोठी सेवा केली उत्तरेच्या मुसलमानांना खाली उतरण्याचा रस्ता रोखून, जेथल्या तेथे थोपवून धरले व चोल देशच्या शंभुवराजावर चाल करून त्याची रणभूमीवर खोडकी जिरविली नंतर ते विजयनगरच्या मंत्रिमंडळात समाविष्ट झाले बुक्क व हरिहर (दुसरा) यांच्या कारकीर्दीत त्यांना महाप्रधानकीची वस्त्रे मिळाली व त्या जागेवर असतांना विजय-नगरची चोख राज्यव्यवस्था ठेविली, हा भागहि त्यांच्या चरित्रांत यथाक्रम

येणार आहे एकदरीत 'तपसा व लोक जयति' या शतपथोक्तीचे श्री सायणाचार्य हे एक मूर्तिमत प्रतीक आहेत असो

अशा विविध पैलूच्या, विद्वद्रत्नाचे पौरुषप्रधान चरित्र आधुनिक भारतीय स्वातत्र्याच्या प्रभात कालीं उद्बोधक व मननीय असून, त्याची ओळख महाराष्ट्राला देऊन, आपल्या प्राचीन कर्मयोगी महापुरुषाचे स्मरण करून द्यावे, या हेतूने प्रस्तुत कार्य हाती घेऊन, ते जिज्ञासु व भारतीय संस्कृतिप्रेमी महाराष्ट्रास सादर करण्याचा श्री जगदबेच्या कृपेने सुयोग आम्हास लाभला, याची आम्हास धन्यता वाटते महाराष्ट्र वाचक त्याचें योग्य स्वागत करतील अशी अशा व्यक्त करून प्रस्तावनेचा मुख्य भाग आटपता घेतो

आता जाता जाता एक गोष्ट राहिली ती म्हणजे आम्हास उपकृत केलेल्या उदार सद्गृहस्थाचे अत करणपूर्वक आभार मानणे प्रथम म्हणजे श्रीमत अण्णासाहेब नवरे (श्री गणेश गोविद नवरे), शीव, मुबई, याचे हृत्पूर्वक आभार मानल्याशिवाय आमची लेखणी पुढे जाऊं शकत नाही या थोर महाशयानी उदार मन करून 'योगीश्वर प्रकाशना'स महान् आश्रय देऊन, त्यास प्रोत्साहनपूर्वक वाढीस लावले, ही गोष्ट येथे नमूद करण्यास आम्हास मोठा आनद वाटतो शिवाय आमच्या या प्रस्तुत ग्रथास यथोचित आर्थिक मदत देऊन सदरहु ग्रथ प्रकाशात येण्यास बहुमोल मदत केली असून, त्याच्या औदार्याचेच सदरहु ग्रथ हें मधुरफळ आहे या त्याच्या थोर उपकाराबद्दल ग्रथकर्ता त्याचा अत्यत ऋणी आहे त्याच प्रमाणे बिहारचे राज्यपाल श्री रगराव दिवाकर यानी आमच्या विनतीस मान देऊन आपला अमौल्य वेळ खर्च करून आमच्या ग्रथास प्रस्तावनावजा 'चार शब्द' लिहून पाठविले त्या बद्दल आम्ही त्याचे अत करणपूर्वक आभार मानतो तसेच माटुग्याचे कै कृष्णराव कब्बूर यानी चित्रास आर्ट पेपर दिला हुबळीचे सयुक्त कर्नाटक वृत्तपत्राचे सपादक श्री हनुमतराव मोहरे यानी चित्राचे ब्लाक्स दिले व 'जयहिंद'

सप्ताहिकाचे सचालक डॉ नारायण सुबराव हर्डीकर यानी विनामूल्य चित्रे छापून दिली या त्याच्या औदार्याबद्दल त्याचे मन पूर्वक आभार मानणे हें आमचं कर्तव्यच समजतो आणि शेवटी हुबळी येथील रॉयल प्रिंटिंग प्रेसचे मालक श्री श वी श्रेष्ठी यानी ग्रंथ छपाईचे काम सुबक व वक्तशीर करून दिले याबद्दल आम्ही त्याचेहि आभारी आहो

सरस्वतीसदन
किल्ला, हुबळी
१—२—१९५६

ग्रंथकर्ता

# - अनुक्रमणिका -

---

## चित्र-सूची



---

# संदर्भ-ग्रंथ

## इंग्रजी ग्रंथ

A Forgotten Empire (Robert Sewell)

History of Vijayanagar—
A Never to be Forgotten Empire
(B Suryanarayanarao)

Beginnings of Vijayanagar History(Henry Heras)

Social and Political Life in Vijayanagar Empire
(Dr B A Saletore)

Further Sources of Vijayanagar History
(K A Nilkantha Shastri
& N Venkataramanayya)

Administration and Social life under
Vijayanagar

Karnatak Darshan(Ed by Ramrao Hukkerikar)

Vijayanagar Sex Sentenary Commemoration
Volume
(Ed Dr R. P Karmarkar)

Epigraphica Indica Vols III, VI, X

Epigraphica Carnatica Vols VI, VII

Mysore Gazeteer Vol II, Part III

## संस्कृत-ग्रंथ

तैत्तिरीय संहिता (सायण भाष्य)
तैत्तिरीय ब्राम्हण (सायण-भाष्य)
ऋग्वेद्-संहिता (सायण-भाष्य)
यजुर्वेद-संहिता (महीधर-भाष्य)
शतपथ ब्राम्हण (सायण-भाष्य)
अथर्ववेद्-संहिता (सायण-भाष्य)
निरुक्त (यास्काचार्य-कृत)
पराशर-माधव (माधवाचार्य-कृत)
रुद्र-भाष्य (वामनशास्त्री गोडबोले)

## मराठी-ग्रंथ

विजयनगर स्मारक ग्रंथ
सार्थपंचदशी (विष्णुशास्त्री बापट)
विविध ज्ञानविस्तार (काशिनाथ शास्त्री लेले)

## कानडी-ग्रंथ

विद्यारण्य स्वामिगळु (भीमाजी जीवाजी हुलकवी)
सायणचरित्र (डॉ डी व्ही गुंडप्पा)
विद्यारण्य चरित्र संग्रह (सी सीतारामय्या)
विद्यारण्य (श्री वेंकटराव आलूर)
कर्नाटक कविचरिते (श्री आर नृसिंहाचार्य)
विजयनगर साम्राज्य स्मारक महोत्सव (पंडित वेंकटरायरु)
विजयनगर साम्राज्य (पांडुरंग देसाई)

(शिवाय इतर लेख, निबंध, मासिके, वृत्तपत्रे वगैरे)



**श्री शारदांबा (शृंगेरी)**

विद्यारण्य प्रस्थापित सप्तलोहमय सुवर्ण मूर्ति

(श्रीमच्छंकराचार्यांचे आद्य दैवत)



उदयगिरि-महामंडलेश्वर, विजयनगर-महाप्रधान
वेदमहाभाष्यकार

# श्रीमत् सायणाचार्य

## प्रकरण पहिले

## पूर्व परिचय

श्रीमती जननी यस्य सुकीर्तिर्मायणः पिता।
सायण सोमनाथश्च मनोबुद्धी सहोदरौ॥
यस्य बौधायनं सूत्रं शाखा यस्य याजुषी।
भारद्वाज कुलं यस्य सर्वज्ञः स हि माधवः॥

(पराशरमाधव, प्रस्तावना श्लोक ६ व ७)

ज्या महाभागांनी ऋग्वेदासारख्या महाग्रंथावर महाभाष्य लिहून, जगाला कायमचें थक्क व ऋणी करून ठेविलें आहे, अशा महाथोर आचार्यदेवाचें प्रभावी व उद्बोधक चरित्र आज महाराष्ट्राला सादर केल्यास उद्योन्मुख इतिहासप्रेमी जिज्ञासु ग्रंथकाराला व सुविद्य व सुबुद्ध तरुण पिढीला त्यापासून खास स्फूर्ती व मार्गदर्शन झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी आमची प्रामाणिक समजूत असल्यामुळे सायणाचार्यांची ओझरती ओळख करून देण्याचे आम्ही येथे योजिले आहे तसे म्हणजे भारताचा प्राचीन इतिहास बहुतेक अंधःकारातच गुरफटलेला असल्यामुळे तो सलग व सविस्तर देता येणें आजच्या परिस्थितीत तरी शक्य नाही. तथापि जी

काही माहिती इतस्तत विखुरलेली आमच्या हातास लागली, ती सर्व एकत्र करून वाचकांस बोधप्रद होईल, अशा रीतीने सुसगत व सुव्यवस्थित जुळवून, आम्ही येथे देत आहो तेवढ्यावरच वाचक समाधान मानून हा आमचा अल्पसा प्रयत्न गोड करून घेतील, अशी आशा करतो. असो

आमच्या चरित्र नायकाचे घराणे हे आध्रप्रातातले मूळचे तेलगू घराणे असून, ते कर्नाटकातील तुंगभद्रा नदीच्या तीरावर वसलेल्या सुविख्यात आनेगोंदी अगर त्याच्या शेजारींच असलेल्या हंपी येथें स्थाइक होऊन राहिले होतें त्यांच्या घराण्याची पूर्वीची माहिती फारशी उपलब्ध नाहीं. तथापि त्यांच्या आईबापाची व भावाबहीणीची मात्र थोडीशी म्हणजे केवळ नावापुरती सापडते, तेवढीच काय ती पराशरस्मृतीच्या प्रस्तावनेतील वर मथळ्यावर उद्धृत केलेल्या श्लोकात ती ग्रथित करून ठेवण्यात आली असून, तेवढ्यावरच निर्वाह करणें प्राप्त आहे त्यापेक्षा अधिक तूर्त तरी मिळणे शक्य नाही आणि ती माहिती देणारा प्रत्यक्ष सायणाचार्यांचा खास वडील भाऊ माधवाचार्य हा असून, तिचा तपशील हा असा आहे:—

सायणाच्या बापाचें नाव मायण व आईचे श्रीमती असें होतें. त्याचे वडील बंधू माधव व धाकटा सोमनाथ म्हणजे मायणाला माधव, सायण व सोमनाथ असे तीन पुत्र असून, त्यात माधव हा वडील, सायण हा मधला व सोमनाथ हा धाकटा मुलगा होय. या धाकट्या सोमनाथास कोठें कोठे भोगनाथ असें ही म्हटलें आहे हे कृष्ण यजुर्वेदीय तैत्तिरीय शाखेचे ब्राह्मण असून, त्याचें गोत्र भारद्वाज व सूत्र बोधायन हें होतें ही एवढी त्याच्या कुटुंबाची प्राथमिक माहिती झाली

याला पुष्टी देणारा पुरावा नेल्लूर येथील एका शासनपत्रांत आढळतो तो असा —

स्वस्ति श्री । श्री माई जननी पिता तवमुनिर्बोधायनो मायणो ।
ज्येष्ठो [मायण] भूष्णुरनुज. श्री भोगनाथः कविः ।

स्वामी संगमभूपति करश्रीकठनाथो गुरु ।
भारद्वाज कुलेश सायण गुणैस्त्वत्तस्तमेवाधिक ॥

(एपि इडिका, खड ३, नेल्लूर १९ १-४)

हा जो नेल्लूरच्या शासनपत्रात मजकूर आढळतो, तो मथळ्यावरील श्लोकास बऱ्हशानें जुळणारा असाच आहे मात्र दुसऱ्या पादाचा मजकूर स्पष्ट नसल्यामुळे त्याचा नीट बोध होत नाही पण बाकीचा सर्व मजकूर बरोबर जुळतो

आता सायणाची गृहस्थिति कशी काय होती, हे समजणे शक्य नसले, तरी ब्राह्मणाची गृहस्थिति जगप्रसिद्धच आहे त्याला अपवाद फारसा आढळून येत नाही गरीबी ही ब्राह्मणाच्या बारावीला पुजलेलीच आहे ! पण ती एक महान् देवता आहे !! व्यावहारिक दृष्ट्या तिला जरी महत्वाचे व मानाचे स्थान नसले, तरी मानवकुलातील तेजस्वी नररत्नाची ती एक मंगल व पवित्र अशी दिव्य खाण आहे ! हें आजच नव्याने सागितले पाहिजे असे नाही

आणि जगाचा इतिहास तरी या पेक्षा निराळे काय सागत आहे ? तिच्या दिव्य कुशीतून निपजलेल्या भारतीय नररत्नानी विद्या व तपाचे योगानें ज्ञानाचे जे गौरीशकर गाठले व साहित्याचे कैलास उठविले, ते पाहून आधुनिक विचारी जग आजहि आश्चर्यचकित होऊन तोडात बोट घालीत आहे ब्रम्हर्षि वसिष्ठ, योगीश्वर याज्ञवाल्क्य, महर्षि वेदव्यास, महामीमांसक कुमारिल भट्ट, अद्वैतमत सस्थापक श्री शकराचार्य, वेदम महाभाष्यकार सायणाचार्य, वेदात शिखामणि माधवाचार्य उर्फ विद्यारण्य मुनि, हे व यासारखे इतर अनेक थोर थोर ऋषिवर्य व विद्वान आचार्यदेव यानी सांस्कृतिक व अध्यात्मिक, शास्त्रीय व नैतिक, ऐतिहासिक व पौराणिक वाङ्मयक्षेत्रांत दाखविलेली अष्टपैलू ज्ञानाची दिव्य चमक सुविद्य व सुविचारी जगाला आजही वेड लावीत आहे, या विषयीं तिलमात्रहि संशय नाहीं

हे सर्व अमर कीर्तीचे तेज पुंज हिरे गरीबीच्या खडतर खडकातूनच पैदा झाले आहेत, हें आश्चर्य नव्हे तर काय ? आणि आमचे चरित्र नायक सायणाचार्य झाले तरी त्या नियमाला अपवाद कसे असणार ? अर्थात् ते झाले तरी गरीब आईबापाच्या पोटींच जन्मास येऊन, पुढे त्यानी ज्ञानाचा गौरीशकर गाठला व आपल्या सतत प्रयत्नाने व अवीट उद्योगाने यशाचे व वैभवाचे अत्युच्च शिखर गाठून वाङ्मयक्षेत्रात अजरामर लौकिकही मिळविला, हा इतिहास आस्ते आस्ते पुढे येणारच आहे.

या सायणाचार्यांचा वडील भाऊ जो माधवाचार्य तोच पुढे विद्यारण्य मुनि या नावाने कर्नाटकाच्या इतिहासात प्रसिद्धीस आला तो वेदविद्येत-विशेषत मीमासा व वेदात शास्त्रात-अत्यत निपुण होता इतकेंच नव्हें तर, राजकारणातहि तितकाच मोठा मुरब्बी मुत्सद्दी होता तुंगभद्रेच्या काठी आनेगोंदी शेजारीच नदीच्या पलीकडे निर्जन अरण्यात विजयनगर नावाचें सुंदर शहर वसवून, त्याला राजधानीचा अपूर्व व श्रेष्ठ असा वैभवशाली अमरावतीचा मान व दर्जा प्राप्त करून देणारा तो हा माधवाचार्य असून, विजयनगर साम्राज्याची मुहूर्तमेढ रोवणारा अमरकीर्ति आचार्यदेव तो हाच !

या तपस्वी ब्राह्मणश्रेष्ठाने तत्काली केलेली देशसेवा, लोकजागृति, धर्मोद्धार, वाङ्मयसेवा व दास्यविमोचन केंव्हाहि लोकादरास व लोकप्रशंसेस पात्र असेच आहे व राहील, याला दुमत होणार नाहीं तत्कालीन रक्तपिपासु मुसलमानाच्या अमानुष महत्त्वाकांक्षेला व त्यांच्या मनसोक्त आतताई ताडव-नृत्याला आळा घालून, निर्माल्यवत् झालेल्या आसन्नमरण हिंदुराजवटींत नवचैतन्य फुंकून, नवीन व स्वतंत्र, प्रबळ व धीर हिंदुपदपादशाही स्थापन करून दक्षिणेतील 'त्राहि भगवान्' झालेल्या व निराश व नित्राण बनलेल्या हिंदूंच्या त्रस्त व ग्रस्त जिवाला सुखसमाधानाचे सोन्याचे दिवस दाखविणारा तो हाच पुण्यात्मा व महात्मा माधवाचार्य !! 'कर्नाटक सिंहासन-प्रस्थापनाचार्य' ही महा बिरुदावलि खरोखर त्या महापुरुषासच शोभते त्या महाभाग सत्पुरुषाचे 'विद्यारण्य' हें नांव कर्नाटक

जनतेच्या कानीं पडताच आजहि त्यांचीं अंत:करणे पूज्यभावनेने व कृतज्ञतेने उचंबळून येतात ! ही कल्पना नव्हे, तर प्रत्यक्ष सत्य आहे ! हा इतिहासहि या चरित्रात यथाप्रसंग मधुन मधून येणारच आहे

सायणाचार्यांचा धाकटा भाऊ सोमनाथ उर्फ भोगनाथ हा वडील बन्धु माधवाचार्यां इतका कर्तबगार नसला, तरी तत्कालीन विद्वन्मडळात शोभण्यासारखा तो एक जाडा पडित होता शिवाय तो प्रतिभासंपन्न असा एक महाकविहि होता त्याचे पदलालित्य, वर्णनशैली, प्रतिभातेज, व विचारसौंदर्य वर्णन करण्यासारखी आहेत काचीच्या एका शिलालेखात तो आपणास 'भोगनाथ कवि ' असे म्हणवीत असून, अलंकार-सुधानिधी-मध्यें त्यास उद्देशून सायणाचार्यांनी 'भोगनाथस्य वा कवे ' असे म्हटले आहे त्यानी आपल्या सुधानिधि ग्रथात अलकाराचीं आपल्या पदरचीं उदाहरणें न देता भोगनाथाच्या काव्याकडे बोट दाखवून–'तेषामुदाहरणानि भोगनाथ-काव्येषु द्रष्टव्यानि' असें सागून, आपण मोकळे झाले आहेत

भोगनाथ हा जाडा पंडित व प्रतिभासंपन्न कवि होता इतकेंच नव्हे, तर तो सगमभूपालाचा नर्मसचिव म्हणजे विनोद मत्रीहि होता या विषयीं बिट्रगुट येथील शासनात पुढील मजकूर आढळतो, तो असा 'इति भोगनाथसुधिया सगमभूपालनर्मसचिवेन श्रीकठपुरसमृध्दै शासनपत्रेषु विलिखिताः श्लोकाः' असे म्हटले आहे या वरून तो पट्टीचा पडित, प्रतिभासंपन्न कवि व विनोदी मंत्री होता, हे स्पष्ट आहे त्याने अनेक ग्रथे लिहिले आहेत त्याचा उल्लेख पुढे येणारच आहे भोगनाथाविषयीं यापेक्षा अधिक माहिती उपलब्ध नाहीं आता राहता राहिला सायणा–चार्यांचा इतिहास आणि तो सांगण्यासाठीच प्रस्तुत ग्रथाचा अवतार आहे

याशिवाय सायणाना एक बहीण होती असे दिसते तिचें नाव सिंगला असून, ती रामरस याला दिली होती व तिच्या पोटी लक्ष्मीधर-देवनांवाचा एक मुलगाहि झाला होता सायणाना आणखी एक भाचा असून, त्याचें नांव आहोबल पंडित असे होते पण हा वरील सिंगलेचा दुसरा मुलगा का दुसऱ्या एखाद्या अज्ञात बहिणीचा मुलगा हें सांगता

येत नाहीं मात्र तो त्याचा भाचा होय, एवढे मात्र खास तो संस्कृत व तेलगु भाषेचा एक जाडा विद्वान पंडित असून, त्याने संस्कृतमध्ये तेलगु भाषेचे एक विस्तृत व्याकरण लिहिलें आहे त्यात आपल्या मामाच्या म्हणजे सायणाचार्यांच्या 'धातुवृत्ति' ग्रंथाचा आदरपूर्वक उल्लेख केला आहे

हा अहोबल पंडित वरील ग्रंथावरून तेलगू म्हणजे आंध्र पंडित असावा असे अनुमान करण्यास जागा झाली आहे अर्थात् त्याचा मामा सायणाचार्य हाहि मग आंध्र असला पाहिजे, हे ओघानेच प्राप्त होते, स्वत सायणाचार्यहि 'अस्माकमांध्राणाम्' असे एके ठिकाणी लिहून आपण आंध्र असल्याचे सुचवितात त्यावरून त्याचे मूळ घराणे कर्नाटकी नसून, आंध्र असावे, हे अनुमान अधिकच दृढमूल होते सायण्णा हे नाव देखील तेलगू नावच आहे ही एवढी माहिती सायणांच्या कुलविषयीं व कुटुंबाविषयीं येथें देण्यात आली, ती तेवढी तूर्त पुरेशी आहे



## प्रकरण २ रे

# विद्या-साधन

'अन्तः प्रविष्टः शास्तेति अतर्यामिश्रुतीरितः।
सोऽस्मान् मुख्यगुरु. पातु विद्यातीर्थमहेश्वरः॥

—अनुभूतिप्रकाश

क्षत्रियाचें बल जसें तलवारींत तद्वत ब्राह्मणाचें बल विद्येंत आहे, हा इतिहासाचा दाखला प्रसिद्धच आहे याच कारणासाठीं ब्राह्मण हा आपला खरा पुरुषार्थ विद्यार्जनात मानतो म्हणून योग्य वयांत तो घर सोडून विद्यादेवीच्या उपासनेसाठीं गुरुगृहाचा आश्रय करून राहतो हा वैदिक आर्यांचा विद्यार्जनाचा सनातनी परिपाठ आहे- किंबहुना होता, असें म्हटल्यास तें आता अधिक शोभेल

पूर्वीची विद्या व पठण पद्धति किती तेजस्वी व प्रभावी होती, याचें वर्णन करण्याच्या भरीस न पडतां त्याचें प्रात्यक्षिक म्हणून आमचे चरित्रनायक व त्याचे वडील बंधु-म्हणजे सायण व माधव-यांस पुढें करतो म्हणजे झालें त्याची विद्या व त्याची कर्तबगारी हीच ती साक्ष देतील. सायणाचार्यांचें प्राथमिक शिक्षण कोठें झालें, याविषयी खात्रीलायख पुरावा उपलब्ध नाहीं पण त्याचे वेदाध्ययन वें शास्त्राध्ययन कोठें झालें व कोणाकडे झालें, या विषयी मात्र उल्लेख आढळतो त्याना भाष्यकाराच्या महायोग्यतेस चढविणारे त्याचे. मुख्य गुरुदेव म्हणजे श्रृगेरी पीठाचे श्री विद्यातीर्थ हे होत शिवाय भारतीतीर्थ, शकरानद व श्रीकठ हेहि त्यांच्या गुरुदेवांत मोडतात म्हणून त्या गुरुदेवाची हकीकतहि येथें थोडक्यांत देतो

## श्री विद्यातीर्थ सरस्वती

विद्यातीर्थ हे मूळचे कांचीकडले असून, मध्ययुगीन भारतात दक्षिणे कडचे एक भारी विद्वान् व मोठे कर्ते पुरुष होऊन गेले त्यांचें पूर्वाश्रमाचें नाव सर्वज्ञ विष्णु असे असून, त्यांच्या वडीलांचे शारंगपाणि असें होते ते बिल्वारण्य येथील राहणारे असून, परमार्थतीर्थांचे शिष्य होते त्यांची वेदविद्येत, मीमांसा शास्त्रात, वेदांत विषयात गति सर्वसंचारी व अप्रतिहत असून, शिवाय योगविद्येतहि ते अत्यंत निष्णात होते ते अद्वैतपंथाचे कट्टे पुरस्कर्ते असून, चक्राधिष्ठित त्रिपुरसुंदरी देवीचे महाउपासक होते. माधव, बुक्क व भारतीतीर्थ यांचे ते पूज्य गुरुदेव होते एकंदरीत ते विद्येचे महासागर असून शब्दशास्त्राचे जिवंत शब्दकोश होते, असें सांगितल्यास त्यांत अतिशयोक्ति बिलकूल होणार नाहीं

त्यांची थोडी माहिती पुण्यश्लोकमंजिरीमध्यें आढळते ती अशी --

'बिल्वारण्यज-शार्ङ्गपाणितनयः सर्वज्ञविष्णु. श्रयन् ।
सन्यास गुरुचन्द्रशेखरमुनेरास्थाय पीठीं गुरोः ॥
योगेशस्य च चक्रराजवसतेर्देव्याश्च सक्तोऽर्चने ।
श्रीमन्माधवबुक्कभारतीयतिप्रष्ठैर्महिष्ठैर्वृत ॥

--पुण्यश्लोकमंजरी

भावार्थ वर आलाच आहे सबब पुनरुक्तीचें कारण नाहीं

त्यांना दोन मुलगे असून, पहिल्याचे नाव सर्वज्ञ व दुसऱ्याचें चेन्नु भट्ट असें होतें हा चेन्नुभट्ट मोठा न्यायशास्त्र पंडित होता त्यानें केशव मिश्राच्या तर्कभाषेवर सुंदर टीका लिहली आहे तो हरिहर (द्वितीय) राजाचा समकालीन होता, असें या पुढील वचनावरून दिसून येतें. वरील टीकाग्रंथाच्या प्रस्तावनेत त्यांचे एक वाक्य आढळते तें असें — 'इति हरिहररायपालितेन सहजसर्वज्ञानुजेन चेन्नुभट्टेन विरचितायां तर्कभाषा-

व्याख्याया ' यावरून चेन्नुभट्ट हा सर्वज्ञ विष्णूचा मुलगा व सर्वज्ञाचा धाकटा भाऊ होता, हे वरील आमचें विधान चुकीचे म्हणता येणार नाहीं अर्थात् तो सायणाचार्यांचा समकालीन ठरतो, हे मग उघड सांगण्याचे कारण नाही

या सर्वज्ञविष्णूंनी गृहस्थाश्रमात राहून तेथील आश्रमकर्तव्ये व कृत्यें यथायोग्य व यथासांग बजावून कृतकृत्य झाल्यावर पुढें त्या आश्रमातून निवृत्त होऊन, कांची येथील मठातील चंद्रशेखर मुनींकडून संन्यास दीक्षा घेऊन, विद्यातीर्थ ऊर्फ विद्याशंकर नाव धारण करून, चतुर्थाश्रमात प्रवेश केला त्यानंतर पुढे काही दिवसांनी तेथील कामकोटि पीठावर अधिष्ठित होऊन, जवळ जवळ पस्तीस वर्षे काढलीं सायण व माधव यांचे अध्ययन बहुतेक येथेच झाले पस्तीस वर्षे तेथील पीठाचे काम पाहून झाल्यावर तपश्चर्येसाठीं म्हणून त्यांनी हिमालयांत जाऊन, तेथे पंधरा वर्षे राहून, योगसिद्धि मिळविली. नंतर पुनः दक्षिणेत येऊन श्रींगेरी पीठावर ते विराजमान झाले या विद्यातीर्थांना विद्येश, विद्यानाथ, विद्याशंकर अशी आणखी इतर नावे होतीं

माधवाचार्य व सायणाचार्य यांचे ते मुख्य गुरु असून, त्या बंधुद्वयाची या गुरुदेवावर अत्यंत भक्ति, नितांत निष्ठा व प्रगाढ पूज्यभाव होता. 'गुरुर्देवो महेश्वर ' ही उक्ति या शिष्यद्वयाच्या अंत करणात पूर्ण प्रतिबिंबित झाली असून, तसें त्यांनी आपल्या ग्रंथांत ठिकठिकाणीं स्पष्ट बोलून दाखविलें आहे

अनुभूतिप्रकाश या ग्रंथात माधवाचार्यांनी त्यांना उद्देशून हा पुढील श्लोक घातला आहे —

'अन्तः प्रविष्टः शास्तेति अंतर्यामिश्रुतीरितः।
सोऽस्मान् मुख्यगुरुः पातु विद्यातीर्थमहेश्वरः।

— अनुभूति-प्रकाश

त्याच प्रमाणे जीवन्मुक्तिविवेकमध्ये हा त्याचा पुढील श्लोक आढळतो —

'जीवन्मुक्तिविवेकेन तमोहार्द निवारयन् ।
पुमर्थमखिल देयात् विद्यातीर्थमहेश्वर. ॥

— जीवन्मुक्तिविवेक

आणि सर्वदर्शनसंग्रहामध्ये त्याचा उल्लेख आला आहे, तो असा:—

पारगत सकलदर्शनसागराणाम् ।
आत्मोचितार्थचरितार्थित-सर्वलोकम् ॥
श्रीशार्ङ्गपाणितनय निखिलागमज्ञम् ।
सर्वज्ञविष्णुगुरुमन्वहमाश्रयेऽहम् ॥

— सर्वदर्शन-संग्रह

या श्लोकात विद्यातीर्थ असे न म्हणता सर्वज्ञविष्णु या पूर्वाश्रमातल्या नावानें गुरूचें स्मरण केलें आहे या वरून गुरूच्या पूर्वाश्रमातसुद्धा माधवाचार्य त्यांच्याजवळ होतें, असें अनुमान करण्यास जागा आहे

'जैमिनीय न्यायमाला विस्तर' मध्येहि माधवाचार्यांनी गुरूचें स्मरण केलें आहे, तो श्लोक असा आहे:—

'प्रणम्य परमात्मान श्री विद्यातीर्थरूपिणम् ।
जैमिनीय न्यायमाला श्लोकै सगृह्यते स्फुटम् ॥

—जैमिनीय न्यायमाला विस्तर

असो आता असाच मजकूर सायणाचार्यांच्या सर्व ग्रंथातहि दृष्टोत्पत्तीस येतो ऋग्वेदभाष्याच्या अगदी प्रारभीच त्यानी पुढील प्रमाणें

विद्यातीर्थांना वंदन केले आहे तो श्लोक असा —

> 'यस्य नि:श्वसित वेदा यो वेदेभ्योऽखिल जगत् ।
> निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थमहेश्वरम् ॥

— वेदार्थप्रकाश

आणि प्रत्येक अष्टकाच्या शेवटी तो ग्रंथ त्या गुरुदेवास पुढील श्लोकाने समर्पण करण्यात आला आहे

> 'वेदार्थस्य प्रकाशेन तमोहार्द निवारयन् ।
> पुमार्थांश्चतुरो देयाविद्यातीर्थमहेश्वर

याप्रमाणे माधवाचार्य झाले काय, अगर सायणाचार्य झाले काय, दोघाहि शिष्यवर्यांनी प्रत्येक ग्रंथात आपल्या या गुरूदेवाविषयी आपला पूज्यभाव व कृतज्ञता व्यक्त करून, आपली नि सीम गुरुभक्ति व गुरुस्मरण जगाच्या निदर्शनास आणून देण्याचे पुण्य जोडलें आहे

इतकेंच नव्हे, तर विजयनगर नरेशाकडून आर्थिक मदत मिळवून, श्रृंगेरी येथे कलाकुसरीने संपन्न असें एक सुदर शिल्पकलेने भरगच्च नटलेले एक मनोहर मदीर बाधून तेथे या गुरुदेवाची 'विद्याशकर' नावाची सुदर शिवलिंगाची स्थापना करून, गुरुभाउलीची पुण्य-स्मृति जगापुढे उदंड उभी राहील अशी सर्वोत्तम व्यवस्था करून ठेविली आहे हें देऊळ तत्कालीन कर्नाटकातील सुप्रसिद्ध शिल्पकला कुशल जकणाचार्याने बाधले असून, त्याचे शिल्पसौंदर्य व कलाकुसर इतकी सुदर व सुरेख व मनोहर आहे की ती लेखणीने लिहून अगर शब्दानी सागून मनात बिबण्यासारखी नाही तर ते प्रत्यक्ष डोळ्यानं पाहूनच डोळ्याची तृप्ति व मनाचे समाधान करून घेतले पाहिजे खरोखर तें अनुपम दिव्य सौंदर्य आजहि प्रेक्षकाच्या नयनाला थक्क करून व मनाला वेड लावून सोडतें ! हें विद्यारण्याच्या गुरुभक्तीचे शाश्वत सुदर स्मरक आजहि तेथे डोळे भरून

पाहून कोणीहि आपल्या डोळ्याचे पारणे फेडून घ्यावे वाचकाच्या कुतूहल तृप्तीसाठी आम्ही येथे त्याचे छायाचित्र दिले आहे त्यावरून वाचकाना अंशतः तरी त्याच्या सौंदर्याची व सुबक बांधकामाची यथार्थ कल्पना करण्यास मदत होईल असो

## भारती कृष्णतीर्थ

विद्यातीर्थ हे इ स- १३५६ सालानतर पुढे लवकरच ब्रह्मीभूत झाले त्याच्या नंतर भारतीतीर्थ हे त्या धर्मपीठावर आले. हे भारतीतीर्थ श्री विद्यातीर्थ सरस्वतीचे आठ पट्टशिष्या पैकी एक प्रमुख शिष्यअसून, ते शृंगेरींत आपल्या गुरूजवळच रहात असत याचे जवळहि माधव सायणाचे अध्ययन झाले होते हे भारतीतीर्थ मोठे जाडे पडित असून सर्व शास्त्रात पारंगत असे अष्टपैलू प्राचीन वेदविद्या विशारद होते या भारतीतीर्थांना अद्वैत ब्रह्मानद असे दुसरेहि एक उपनाव होते विद्यातीर्थांचे आणखी एक प्रमुख शिष्य म्हणजे शकरानद यति हे होत. ही गोष्ट शकरानदानी लिहिलेल्या बृहदारण्यकोपनिषद्दीपिकेवरून उघड होते तेथें प्रारंभीच श्लोक आढळतो तो असा —

काञ्चीपीठजुष कठोरधिषणानिर्धूत दुर्धूर्वहत्-
द्वैतिव्रातदुराग्रहभयान् मायाविदूरक्रियान् ।
आचार्यान्मम चन्द्रमौलिचरणध्यानैकतानाशयान्
विद्यातीर्थमहेश्वरान् हृदि सदा विद्योतमानान् भजे ॥
॥ १ ॥

सच्छात्रत्वेऽपि साक्षाद्गुरव इव दयामेदुरा ये पुनर्माम् ।
गूढेष्वर्थेषु गाढं विवरणसरणेश्चक्रुराप्तप्रवेशाम् ॥
भारत्यानन्दतीर्थापर विरुदवहानद्वयब्रम्हसौख्यान् ।
वृद्धान् सिद्धान् प्रबुद्धानपि हृदि सतत भावये
ब्रम्हभूतान् ॥ २ ॥

द्वैतध्वान्तनिकुन्तनाहर्धिपैः शिष्यैर्विशिष्याष्टभि-।
र्विष्टभ्याद्वयविष्टराष्टकमितः श्री माधवाद्यैर्बुधैः॥
स्पष्टं यो व्यदधिष्ट शिष्टपरिषत्स्वद्वैतमेवाद्वय-।
ब्रम्हानंदमुनीश्वरं तमनघं वन्दे विरुपाक्षगम्॥

—बृहदारण्यकोपनिषद्दीपिका

या शिवाय उपनिषत्समुच्चयदीपिकेच्या शेवटी सुद्धा या शंकरानंदाचा शेरा आढळतो तो असा — 'श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य आनन्दात्म-पूज्यपादशिष्य' या वचनावरूनहि आनंदात्म उर्फ भारतीतीर्थ शंकरानंदाचे गुरुदेव होते, हे स्पष्ट होते

हे भारतीतीर्थ श्रृंगेरीपीठस्थ असताना विद्यातीर्थाप्रमाणेच विजयनगर राज्याला त्यांनीहि सर्व तऱ्हेने मदत दिली अडीअडचणीच्या प्रसंगीं आर्थिक मदतहि दिली व प्रसंगविशेषी पीठाचे पाठबळहि उभे केले राजकारणाचे महत्वाचे व गुंतागुतीचे प्रश्न उपस्थित झाल्यावेळीं माधवाचार्यांना योग्य सल्ला देऊन, मार्गदर्शनहि ते करीत असत थोडक्यात म्हणजे श्रृंगेरी पीठाचा तेजस्वी धर्मदंड विजयनगरच्या पाठीस अहोरात्र जागृत राहून पाठराखण करीत होता

विद्यातीर्थांचे व भारतीतीर्थांचे वेळोवेळीं झालेले उपकार स्मरून हरिहर राजाने आपल्या बंधुसमवेत इ स १३४५ सालीं श्रृंगेरीस जाऊन तत्कालीन पीठस्थ स्वामीचे भक्तिपूर्वक दर्शन घेऊन पीठाला मोठी जहागीर इनाम घालून दिली या गुरुदेवाच्या योग्य मार्गदर्शनामुळे माधवाचार्यांना विजयनगरचें राजकारण प्रभावी व यशस्वी करून दाखविण्याचें भाग्य व श्रेय लाभलें, असे म्हटल्यास त्यात गैर काहीच नाही

माधवाचार्यांनी या गुरुदेवाचा आपल्या ग्रंथात गौरवपूर्ण केलेला उल्लेख पहावयास मिळतो कालनिर्णय ग्रंथाच्या उपोद्घातांत त्यांना उद्देशून हा पुढील श्लोक घालण्यात आला आहे

'लब्धामाकलयन् प्रभावलहरी श्री भारतीतीर्थतो ।
विद्यातीर्थमुपाश्रयन् हृदि भजे श्रीकंठमव्याहतम् ॥

—पराशरमाधव

या श्लोकात त्यानी श्रीविद्यातीर्थ व भारतीतीर्थ या दोन्ही गुरूचा व त्याबरोबरच श्रीकंठनाथ या गुरुचाहि उल्लेख केलेला आहे या वरून भारतीतीर्थ हे विद्यारण्य पराशरमाधव हा ग्रंथ लिहिण्याच्यावेळी विद्यातीर्थाप्रमाणेच त्याच्या गुरुस्थानी होते, असे ध्वनित होते त्याप्रमाणे हें पुढील वचनहि मननीय आहे

'सर्वेषां तु प्रथमसुखद भारतीतीर्थमाहुः ।
तद्भावान् मे विमलमनसो निर्णये शक्तिरस्ति ॥

या वचनात भारतीतीर्थ आपले गुरु असल्याचा निर्वाळा स्पष्ट प्रतीत होतो

या भारतीतीर्थांनी 'वाक्यसुधा' व 'वैयासिक न्यायमाला', हे दोन महत्वाचे ग्रंथ लिहिले असून, त्यापैकी 'वैयासिक न्यायमाला' या ग्रंथांत ब्रम्हसूत्रावर सुदर विवेचन करण्यात आले आहे पुढे माधवाचार्यांना सन्यासदीक्षा देणारे हे भारतीतीर्थच असून, आश्रमांतर केल्यावर त्याना 'विद्यारण्य' हें नाव देणारे हे भारतीतीर्थच होत माधवाचार्यांनी बुक्क भूपाल कैलासवासी झाल्यावर इ स १३७६-७७ साली संन्यास दीक्षा घेतली. हे भारतीतीर्थ सरस्वती इ स १३८० साली ब्रम्हीभूत झाले आणि त्याच्या पश्चात् श्रृंगेरीची गादी या विद्यारण्यानाच मिळाली असो

## श्रीकठनाथ

या नतर माधव-सायणांचे तिसरे गुरुदेव म्हणजे श्रीकंठनाथ हे होत. हे कांचीपुरचे राहणारे असून, शैवमताचे ते कट्टर अनुयायी व अभिमानी

प्रचारक होते शैवपंथाचे ते मोठे नामांकित पंडित व तसेच त्यांचे मर्मज्ञ रसिकहि होते ते कोठे जन्मले, कोणत्या कुळात जन्मले, कोठे शिकले, या विषयी फारशी माहिती उपलब्ध झालेली नाहीं तथापि कांचीपुरात ते वेदशास्त्रादिकांचे जाडे पंडित व तत्त्वज्ञानाचे महिमाशाली आचार्य म्हणून त्यांचा विद्वन्मंडळात मोठा लौकिक होता ते अद्वैतपंथाचे कट्टे पुरस्कर्ते असून, विद्यातीर्थ, भारतीतीर्थ, वेदांतदेशिक, अक्षोभ्यतीथ यांचे समकालीन होते. पुढे त्यांनी उदयगिरीच्या संगमनरेशाचे शैव-मताचे परम रहस्य उपदेश करणारे गुरुदेव होण्याचा अपूर्व मान मिळविला असून, त्याबद्दल त्यांच्या बोधामृताने परम संतुष्ट होऊन त्याबद्दल त्या नरेशाने कृतज्ञबुद्धीने त्यांचे नाव संस्मरणीय करण्यासाठीं 'बिट्रगुंट' या गावाचे नाव बदलून 'श्रीकंठपुर' असे ठेऊन, तो गाव आपल्या बापाच्या पारलौकिक कल्याणार्थ बहुश्रुत विद्वान ब्राम्हणास दान देऊन त्यांचे दानपत्र करून दिलें, असे खालील शासनपत्रावरून दिसून येते तेथील शेवटचा मजकूर हा असा आहेः –

'शाकाब्दे नागशैलद्युमणिपरिमिते दुर्मुखाब्दे तृतीये।
मासि श्रीसंगमेंद्रो गुरुहितनिरतस्संगमे चन्द्रभान्वो.॥

प्रादात्प्रत्यद्रुकाले निजपितुरमरत्वाप्तये बिट्रगुंट।
ग्राम त्रिंशन्मिताभ्यः श्रुतिपथनिरताभ्यो महीदेवताभ्य ॥

बिट्रगुंटमितीह प्रथितापरनामशालिनस्तस्य।
प्रकटयति स्म यमिन्द्रप्रायः श्रीकंठपुरमिति प्रख्याम्॥

—(एपि इंडिका, खंड ३, पृष्ठ २९)

हे श्रीकंठनाथ गुरुदेव माधव, सायण व भोगनाथ या तिघांचेहि विद्यागुरु होते, असा पुरावा सापडतो माधवाचे ते गुरुदेव होते याबद्दल खालील वचनात आधार सापडतो तो असा.—

'लब्धामाकलयन् प्रभावलहरीं श्रीभारतीतीर्थतो।
विद्यातीर्थमुपाश्रयन् हृदि भजे श्रीकंठमव्याहतम् ॥

—पराशर-माधव

त्याचप्रमाणे ते सायणाचेहि गुरु होते ही गोष्ट या पुढील वचनावरून अभिव्यक्त होते ते वचन हे असे. —

'स्वामी सगभूपति कर श्रीकठनाथो गुरु-।
भारद्वाजकुलेश सायण गुणैस्त्वत्तस्त्वमेवाधिक ॥

– एपि इडिका, खड ३, नं ११९, पृष्ठ ११८

सायणाचे धाकटे बधु भोगनाथ यांच्याहि ते गुरुस्थानी होते, याची साक्ष पुढील श्लोकावरून पटते तो श्लोक असा —

'श्रीकठश्च गुरु परोपि गुरवो लोकत्रयेप्यद्भुतम्।
भक्ताधीन भवाश्च दैवतमहो सर्वेप्यमी देवताः ॥

— अलकार सुधानिधि

या वरील विवेचनावरून श्रीकठनाथ हे माधव व सायणाचे गुरुदेव होते, हें उघड आहे

## श्रीशंकरानद यति

आतां श्री शंकरानद यति हे सायणमाधवांचे चौथे गुरु होत यांच्या वडीलाचें नाव मध्यार्जुन बालचद्र याज्ञिक हें रसून, शंकरानंद तीर्थांचे पूर्वाश्रमीचे नाव महेश असे होतें 'श्री मध्यार्जुनबालचद्रमखिराट सूनुर्महेशाव्हय' असे पुण्यश्लोकमजरीत म्हटले आहे हे शकरानंद सुप्रसिद्ध

विद्यातीर्थ याचे शिष्य असून, त्याचा प्रारंभीचा इतिहास थोडक्यांत खालील श्लोकात देण्यात आला आहे, तो असाः—

'श्रीमध्यार्जुनबालचंद्रमखिराट् सूनुर्महेशाव्हयः।
विद्यातीर्थपदान्नियम्य समयेष्वदूद्वैतमुद्योतयन् ॥
अध्यास्त प्रतिकामकोटि शरदो द्वात्रिंशतं देहिनाम्।
द्वैतध्वान्तनिवारणो नवमठीनाथो नवश्शंकर' ॥

—पुण्यश्लोकमंजरी

या श्लोकावरून शकरानद यतीचे पूर्वाश्रमीचे नाव महेश असून, बापाचे नाव बालचद्र मखिराट असे होतें, हे उघड होते तसेच त्याचें जन्मस्थान मध्यार्जुन हें असून ते विद्यातीर्थ सरस्वती जवळ राहून, वेद-शास्त्राचा–विशेषतः वेदात शास्त्राचा– सखोल अभ्यास त्यानी केला होता विद्यातीर्थांचे जे प्रमुख दहा शिष्य होते, त्यापैकींच हे एक असून, शंकराचार्यांच्या अद्वैत मताचे ते कट्टे पुरस्कर्ते व महोपदेशक होते विद्यातीर्थ तपश्चर्येसाठीं हिमालयात जावयास निघाले, तेव्हा दहा शिष्या-पैकी हेच त्याच्याबरोबर जावयास निघाले व हिमालयात काहीकाल गुरुदेवाजवळ राहून त्याची सेवासुश्रूषा केल्यावर पुढे गुरुदेवानी त्यास पुनः कामकोटीस जाण्यास आज्ञा दिली त्याप्रमाणे पुनः काचीपुरास येऊन तेथील कामकोटी पीठावर आरोहण करून शाकर मताचा देशभर प्रसार करण्याचा सपाटून प्रचार चालविला ते कट्टर अद्वैत पथाचे एकनिष्ठ अभिमानी व उपासक असून, त्यावेळी भरात असलेल्या माध्वसाप्रदायाच्या प्रगतीस मोठ्या कटाक्षाने रोखून धरून, अद्वैतमताची जनमनावर ठसठसीत छाप बसविण्यात त्यानी अपूर्व यश मिळविलें त्यावेळीं शृंगेरीपीठाचें वर्चस्व अगदी ओहटीस लागले असून, त्या मठाचा लौकिक जेमतेमच टिकून राहिला होता. शृंगेरीपेक्षा या कामकोटी पीठाचे प्राबल्य व लौकिक फार मोठा असून, त्यावेळीं तेथें विद्यातीर्थ, भारतीतीर्थ, शंकरानंदतीर्थ हे व यासारके जाडे अष्टपैलू विद्वान पंडित त्यापीठाचे भूषणभूत होऊन

अद्वैतपंथाचे आधारस्तंभ होऊन राहिले होते या शंकरानद सरस्वतींनी विद्यातीर्थांच्या आदेशाप्रमाणे अद्वैत मत प्रसारार्थ पुण्यगिरि, शिवगंगा, अवनी, संकेश्वर, कोल्हापूर हंपीविरूपाक्ष इत्यादि आठ मठाची स्थापना करून नवव्या म्हणजे कामकोटि मठाचे ते पीठस्थ आचार्यदेव होते म्हणून त्याना 'नवमठीनाथ' या बिरुदावलीने लोक संबोधित असत

हे शकरानद माधवाचार्यांचे गुरुदेव होते, हें पचदशी ग्रथाच्या प्रारंभीच्या श्लोकावरून स्पष्ट होते तो श्लोक हा —

'नमः श्रीशकरानंदगुरुपादाम्बुजन्मने ।
सविलासमहामोहग्राहग्रासैक कर्मणे ॥
तत्पादाम्बुरुहद्वन्द्वसेवानिर्मलचेतसाम् ।
सुखबोधाय तत्त्वस्य विवेकोऽय विधीयते ॥

—पचदशी श्लो १ व २

त्याचप्रमाणें नृसिंहोत्तरतापनीयोपनिषद्भाष्याच्या शेवटीं 'श्रीशकरानंद-शिष्य विद्यारण्यरचितम्' असा शेरा आहे आणि विवरणप्रमेयसग्रहात 'श्री शंकरानदपदं हृदब्जे दिभ्राजते तद्यतयो विशंति' असे म्हणून त्या गुरुदेवाच्या ठिकाणीं आपला पूज्यभाव व्यक्त केला आहे

या शंकरानदाचा मुख्य आवडीचा विषय म्हणजे वेदांत हा होय उपनिषद्‌ग्रंथाचा त्यांचा व्यासंग मोठा दाडगा असून, त्या ग्रंथावर 'दीपिका' नांवाची लिहिलेली टीका प्रसिद्ध आहे 'ईशावास्य, तैत्तिरीय, केन, मुंडक, श्वेताश्वतर, बृहदारण्यक, इत्यादि ग्रंथावर लिहिलेली त्यांची टीका लोकविश्रुत आहे त्यातल्या त्यात त्याचा सर्वोत्तम व सर्वश्रेष्ठ असा महाग्रंथ म्हणजे 'आत्मपुराण' हा असून, तें पुराण सर्वोपनिषदाचें सार म्हटलें तरी चालेल त्याचा मराठी अनुवाद पुण्याचे कै विष्णुशास्त्री बापट यांनी केला आहे असो

अशा तत्त्वज्ञान व आत्मज्ञान पारंगत ज्ञानदेवापाशीं सायण-माधव यांनी वेद-वेदांतशास्त्राचा अभ्यास केला होता

---

## प्रकरण ३ रें

# सायणकालीन भारत

सायण-माधवाचार्यांचें महत्व समजण्यासाठी आता पुढे जावयाच्या-आधीं सायणमाधवकालीन भारताची-विशेषत दक्षिण भारताची-एकदर राजकीय परिस्थिति कशी होती, याचा थोडासा कानोसा घेतल्यास ते अप्रस्तुत होणार नाहीं कारण त्यापासून वरील बंधुद्वयानी केलेली भारताची अविस्मरणीय अशी अमोल्य सेवा व धार्मिक वाङ्मयात घातलेली आश्चर्यकारक अशी प्रचड भर, याची वाचकास यथार्थ कल्पना येण्यास बहुमोल मदत होईल म्हणून या प्रकरणात उडत उडत तत्कालीन हिंदुस्थानच्या राजकीय उलढालीचे व खळबळीचें यथार्थ चित्र थोडक्यात रगून दाखवितो

इ स १००० च्या पूर्वीं हिंदुस्थानला परशत्रूचे वारे फारसे बाधलें नव्हते त्यावेळीं हिमालय-हिंदुकुशपासून तो थेट रामेश्वर-कन्याकुमारीपर्यंत सर्वभरतखडभर एक जात लहान थोर हिंदुराजाचे जाळे सर्वत्र पसरून राहिले असून, हिंदुधर्माला पूर्णंदूची दिव्य कळा विलसत होती तो काळ भारताला मोठा सुखशातीचा असा गेला

पुढें हा मनु पालटला वैभवशाली भारतराष्ट्राचें ग्रह बदलत चालले व राजलक्ष्मीवर अशुभ ग्रहणाची अवकळा पसरत चालली इ स १००१ मध्यें महमद गझनी नावाच्या या इस्लामी कडव्या धटिंगणाने वायव्येकडून प्रथम पंजाबवर झडप घालून, तेथील जयपाल राजाला पजात पकडून, त्याच्या कडून जबर खडणी वसूल करून व राज्यातील प्रमुख शहरें लुटून अगणित सपत्ति बरोबर नेली.

पण येवढ्याने त्याची तहान भागली नाहीं पुन लवकरच दुसरी तयारी करून सिंध प्रातावर धाड घातली आणि तो प्रांत जिंकून घशाखाली

घातला नतर पुढे पजाबच्या अनंगपालावर तलवार उपसून, तो प्रांत काबीज केला हें झाल्यावर पुढे त्याला हिंदुस्तानच्या रक्ताची चटक लागून, इ स १०१९ मध्ये पुन. त्याची सक्रात हिदुस्तानावर आदळून, लूटमार करीत करीत कनोजपर्यंत धडक मारून, मथुरा क्षेत्रात शिरून, तेथील हिंदूचीं पवित्र मंदिरे लुटून, अपार सपत्ति घशात ओतली !

त्यानतर त्याची सागण्यासारखी महत्वाची स्वारी म्हणजे सौराष्ट्रातील सोरटी सोमनाथ देवळावर घातलेली प्रचड धाड ही होय याखेपेस ही स्वारी खैबर घाटातून न होता, मुलतान मधून होऊन, प्रथम अजमीरकडे वळली तेथे त्याला सोमनाथाच्या सुप्रसिद्ध वैभवसपन्न देवालयाची बातमी लागली तेव्हा तिकडे आपला मोर्चा वळवून, तो गुजराथेत शिरला व तेथील राजाचा पराभव करून, पुढें तेथून सोमनाथपर्यंत धडक मारून, देवळात 'दीन दीन' करीत त्यांने प्रवेश केला व तेथील पुराणप्रसिद्ध सोमनाथाची सुदर व पवित्र मूर्ति फोडून, तेथील अगणित सपत्ति लुटून घेतली ही दुर्घटणा इ स १०२४ साली घडून आली ! ही प्रचंड लूट बरोबर घेऊन तो स्वदेशी परत गेला त्यानंतर मात्र त्याचा उपसर्ग हिंदुस्थानास भोवला नाही. तो अखेर इ स १०३० सालीं पैगंबरवासी झाला याच्या कारकीर्दीत फक्त पंजाबप्रात मात्र मुसलमानी पंखाखाली गेला, तो कायमचाच येथपर्यंत परकीयाचे पाय हिंदुस्थानात फारसे स्थिर होऊन राहिले नव्हते फक्त लुटीच्या आशेने मात्र मधून मधून ज्या काही टोळधाडी येत, त्या तात्पूर्तिकच असत पण अद्याप सुलतानशाही येथे पाय रोवून दृढमूल झाली नव्हती

उत्तर भारताचे पतन.— पुढे मात्र हा रग पालटत चालला. हिंदुस्थानच्या रक्ताची चटक लागून, त्याच्या छातीवर कायमचा पाय देऊन ठाणमांडून बसण्याची इच्छा त्या सवकलेल्या लाडग्याच्या अत करणात उसळी मारू लागली आणि हे त्याचे डोहाळे पुढे महमद घोरीनें सत्य-सृष्टींत रंगरूपास आणून दाखविले त्याने हिंदुस्थानावर एकामागून एक अशा अनेक स्वाऱ्या करून, संबध उत्तर हिंदुस्थानात नंगा नाच घालून,

सगळा देश खिळखिळीत करून सोडला आणि आग्र्यात कायमचे ठाणें ठोकून दिले !

इ स ११७५ सालीं त्याने प्रथम मुलतानवर स्वारी करून तो सगळा प्रात हादरून सोडला त्यानंतर पुढें दहा वर्षांनी म्हणजे इ. स ११८६ साली सिंधप्रातावर धाड घालून, तोहि प्रात पचनीं पाडला नतर इ. स ११९२ सालीं दिल्लीवर चाल करून आला त्यावेळी तेथे पृथ्वीराज चव्हाण हा राज्य करीत होता त्याची व महमदची स्थानेश्वर येथे गाठ पडून, तेथे तुम्मळ रणकदन माजलें. त्या झटापटीत पृथ्वीराजाचा पराभव होऊन त्यात तो ठार मारला गेला ! पुढें इ स ११९४ सालीं महमूदची नजर कनोजकडे वळली त्यावेळी तेथे जयचद राठोड हा राज्यावर होता महमूदने कनोजवर चालून जाऊन, तेथील राजास काल्पी येथे गाठले व तेथे दोघाची चकमक झडून, त्यात जयचदाची आहुति पडली ! अर्थात् ते राज्य पोरके होऊन, अखेर सुलतानाच्या छत्राखाली गेले !

हें झाल्यावर पुढे काशी क्षेत्रावर त्याची नजर ठरून, तिकडे त्याने भरारी मारली. तेथे त्याला म्हणण्यासारखा अडथळा न झाल्याने क्षेत्रात शिरून, विश्वेश्वराच्या देवळात धुसडी मारून, आतील विश्वेश्वराची मूर्ति फोडून काढली आणि शहरात सगळा धुमाकूळ घातला त्यानतर इ स ११९७-११९८ मध्ये गुजराथवर धाड घालून तेथील राणा भीमदेव राजाचा पराभव केला पुढे इ स ११९७ मध्ये ग्वाल्हेर व इ स १२०२ मध्यें कालिंजर वगैरे प्रात जिंकून घेतले त्याच्या एका सरदाराने–महमद्-बखत्यारने–बगाल, बिहार, अयोध्या प्रांतावर इस्लामी तलवार चालवून, तो सगळा मुलुख पादाक्रात करून टाकला !

या प्रमाणे इ स ११७५ पासून इ स १२०२ पर्यंत म्हणजे अवघ्या पावशतकातच पंजाब, सिंध, दिल्ली, अजमीर, कनोज, काशी, बंगाल, बिहार, अयोध्या, गुजराथ, ग्वाल्हेर, कालिंजर असे प्रातामागून प्रात सर करीत जाऊन, तेथें तेथे आपला एक एक मुसलमान सरदार प्रतिनिधि व सुभेदार म्हणून नेमून, हिंदुस्थानात इस्लामी सत्ता कायमची

दडमूल करून ठेविली !! ही मर्दुमकी महमूद घोरी याचीच होय पुढे तो इ स १२०५ मध्यें लवणाचलातील गक्कर लोकाकडून ठार मारला गेला

अशा रीतीने या महमद घोरीनें पाचपंचवीस वर्षांतच आखा उत्तर भारत देश पादाक्रांत करून, तेथील हिंदूचीं राज्ये नष्ट करून, त्याच्या छातीवर मुसलमानी सत्ता प्रस्थापित केली एव्हापासून मुसलमानाचे पाय हिंदुस्थानात कायमचे रोवले गेले आतापर्यंत म्हणजे पजाबचा जयपाल, दिल्लीचा पृथ्वीराज, कनोजचा जयचंद, मेवाडचा समरसिंह, गुजराथचा राणाभीमदेव, बंगालचा लक्ष्मणसेन, असे हे सर्व हिंदुराजे पराभूत होऊन, त्याच्या वाड्यावर इस्लामी हिरवा झेंडा फडकूं लागला !!

दक्षिण भारतावर धाड – ही झाली उत्तरेची कथा आता दक्षिणेतील कथेस प्रारंभ करू प्रत्यक्ष या कथेस हात घालण्याच्या पूर्वी तत्कालीन तेथील राजवटीची थोडक्यात कल्पना करून दिल्यास, ते काही अप्रासंगिक होणार नाहीं म्हणून त्या प्रश्नावरहि हळुवार हात फिरवून, मग चरित्र ग्रंथाकडे वळतो. अकराव्या व बाराव्या शतकात विंध्यपर्वताच्याखालीं दक्षिणेत समस्त प्रदेशावर प्रथम चालुक्य राजाचे साम्राज्य पसरलेले होते. पण पुढें अनेक कारणानें तें हतबल व हतप्रभ होऊन अखेर नष्ट झालें

त्याच्या नाशानंतर तीन भिन्न भिन्न प्रदेशात तीन नवीन राजवंशाचा उदय होऊन, तें साम्राज्य तीन राजघराण्यात वाटले गेले उत्तरेकडील भागांत म्हणजे विंध्यपर्वताच्या दक्षिण भागी यादवाची सत्ता स्थापन होऊन, देवगिरि ही त्याची राजधानी झाली हें यादवाचे राज्य नर्मदेपासून दक्षिणेस कृष्णानदीपर्यंत पसरलेले होतें त्याच्या आग्नेय दिशेला काकतीय राजाचा अम्मल चालून, त्याची राजधानी वारंगळ ही झाली तिसरा राजवश होयसळ घराण्याचा असून, त्याचा अम्मल कर्नाटक प्रांतावर बसून, द्वारसमुद्र हें त्या राज्याचें मुख्य ठाणे झालें

अर्थात् ही होयसाळची सत्ता सर्व कर्नाटकावर स्थापित होऊन, त्याची उत्तरेकडील सीमा कृष्णानदीपर्यंत येऊन पोचली होती चौथा एक महत्वाचा राजवश अगदी दक्षिणेस कावेरीच्या खाली आपली सत्ता

गाजवून होता तो म्हणजे पांड्य होय त्याचें राज्य दक्षिणेस कन्याकुमारी पर्यंत जाऊन भिडलेलें असून, मदुरा येथें त्याची राजधानी होती शिवाय चोळ, केरळ, पल्लव, कदंब, आनेगोंदी इत्यादि चिमुकलीं राष्ट्रें तेथें तेथें आपला चिमुकाला संसार थाटून होतीं

याप्रमाणे चालुक्य साम्राज्य नष्ट झाल्यावर दक्षिण भारताची ही अशी राजकीय परिस्थिति होती उत्तरेस यादव, पूर्वेस व आग्नेय दिशेस काकतीय, मध्यें कृष्णे पासून कावेरीपर्यंत होयसळ आणि अगदी दक्षिणेस म्हणजे कावेरीच्याखालीं पाड्य, याप्रमाणे दक्षिणेची ढोबळ मानाने राजकीय परिस्थिति होती या सर्वांची सरहद्द कोठे ना कोठें एकमेकास येऊन भिडल्यामुळें त्यासाठीं एकमेकात नेहमी वाद व घर्षण चाललेलें असे. याचा परिणाम असा झाला होता कीं त्याच्यात परस्परांत स्नेह, प्रेम व ऐक्य ही केव्हाच नादलीं नाहींत

अशा परिस्थितीत उत्तर हिंदुस्थानावर लुटारू मुसलमानाच्या एका-मागून एक अशा प्रळयातक धाडी कोसळून तो थोड्याच अवधीत अघाशी इस्लामी मगरीच्या जबड्यात पूर्ण ओढला गेला रजपुताच्या आपापसातील कलहामुळें व चुरशीमुळें या परशत्रूचें आयतेंच फावून, अखेर परिणाम असा झाला कीं विंध्याचलाच्या उत्तरेकडील सगळा मुलूख यवन सत्तेखाली जाऊन, तेथें इस्लामी वर्चस्व पूर्णतया स्थापित झालें पण अजून त्याची काकदृष्टि विंध्यपर्वताच्या खाली उतरली नव्हती

पण ही स्थिति पुढे फार दिवस टिकून राहिली नाहीं पुढें खिलजी वंशांतील सुलतान दिल्ली तख्तावर आरूढ झाल्यावर त्याच्यातील महत्वा-काक्षी अल्लाउद्दीन खिलजी याची पापीनजर दक्षिणेकडे वळली महमूद घोरीनें जे उत्तरेत केलें, त्याचीच नक्कल या अल्लाउद्दीन खिलजीनें दक्षिणेत उठवून दाखविलें दक्षिणेतील अपार संपत्ति लुटून आणण्याच्या उद्देशानें ई स १२९४ सालीं आठ हजार निवडक फौज घेऊन, तो विंध्यपर्वत ओलांडून खालीं दक्षिणेंत उतरला व पहिल्या झपाट्यासरसशीच देवगिरीच्या रामदेव रावावर झडप घालून, त्याला जेरीस आणलें

या झटापटींत रामदेव राजाचा पराभव होऊन, अखेर खंडणी देण्याचें कबूल करून, पुढील अरिष्टातून त्याने आपली सुटका करून घेतली पण पुढें करारप्रमाणे खंडणी देण्याचे बद केल्यावरून अल्लाउद्दीनने आपल्या शूर मलिक काफूर सरदारास खडणी वसूल करण्यास देवगिरिकडे रवाना केले इ स १३०७ मध्ये मलिक काफूरने मोठे सैन्य घेऊन देवगिरीवर हल्ला चढविला व रामदेवरावास पकडून, दिल्लीकडे पाठवून दिले त्याने पुन खंडणी देण्याचे कबूल करून आपली सुटका करून घेतली

ही दक्षिणेची हवा या मलिक काफूरला बरीच आवडली व मानवली पुढे दर वर्षीं दक्षिणेत उतरून कोणत्या ना कोणत्या तरी राज्यावर झडप घालून तेथून अपार सपत्ति लुटून नेण्याचा त्याने प्रघात पाडला इ स १३०७ मध्ये वरगळच्या राज्यावर चालून, तेथील प्रतापरुद्रदेव राजाचा पराभव करून, त्याचा मुलुख सगळा उध्वस्त करून टाकला, पुढें प्रताप रुद्रदेवाने त्यास खडणी देण्याचे कबूल करून, आलेले सकट कसे बसे निवारण करून घेतले

या विजयानंतर काफूरला अधिकच स्फूर्ति आली त्यानतर पुढील वर्षी म्हणजे इ स १३१० साली त्याची सक्रांत होयसाळच्या द्वार-समुद्रावर वळली आणि शेवटी तेथील वीर बल्लाळचा बीमोड करून, त्याची राजधानी द्वारसमुद्र काबीज केली तेव्हा होयसळ राजानें त्यास खंडणी देण्याचे मान्य करून, दिल्लीचे माडलिकत्व पदरात घेतलें

या सुमारास पाड्य देशाचा राजा मारवर्मन् कुलशेखर हा मृत्यु पावला असून, त्याच्या मागे त्याच्या गादी विषयीं त्याच्या दोन मुला-मध्ये-म्हणजे वीरवर्मन् व जटावर्मन् सुदर—या दोघांत चुरस लागून, त्यांतील जटावर्मन् सुदर यानें अल्लाउद्दीन खिलजीकडे मदत मागितली तेव्हा अल्लाउद्दीननें सुंदर पाड्य यास मदत करण्यास मलिक काफूर यास पाठवून दिलें

सुलतानच्या हुकुमाप्रमाणें मलिक काफूर हा मोठें सैन्य घेऊन दक्षिणेंत निघाला व जटावर्मन् सुंदर पाड्य याचा पक्ष घेऊन, त्याचा प्रतिस्पर्धी

वीरवर्मन् याचा पराभव करून जटावर्मन् सुंदरास त्याने गादीवर बसविले इतकें करूनच काफूर स्वस्थ बसला नाहीं पुढें तसाच रामेश्वर पर्यंत धडक मारून, तेथे विजयाचे स्मारक म्हणून एक मशीद उभारून, वाटेतील गावाची लूटमार करून, अपरपार लूट मिळवून, इस्लामी झेंडा नाचवीत नाचवीत स्वारी परत दिल्लीकडे वळली याखेपेस त्याला इतकी लूट मिळाली कीं त्या लुटीत ३१२ हत्ती, बारा हजार घोडे, ७६ हजार मण सोनें व पुष्कळ मोत्यांच्या व जडजवाहिऱ्याच्या पेट्या होत्या !!

पुढे अल्लाउद्दीन खिलजी हा इ स १३१६ सालीं वारला त्याच्या मागे त्याचा तिसरा मुलगा मुबारक हा गादीवर आला यासुमारास देवगिरीचा रामदेवराव हा वारला असून, त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा हरपालदेव हा गादीवर आला होता त्याने आपले स्वातंत्र्य जाहीर करून, सुलतानास खंडणी पोंचविण्याचे बंद केले म्हणून इ स १३१८ मध्ये मुबारकने त्याच्यावर स्वारी करून, त्याचा पुरा मोड केल्यावर, त्यास पकडून त्यास जिवंत सोलून ठार केलें व यादवांचें राज्य कायमचें बुडवून टाकलें !

अर्थात् हा प्रांत आता बादशहाच्या मुलुखात सामील करण्यात येऊन, तेथें एक सुभेदार नेमण्यात आला एव्हापासून देवगिरी प्रांत बादशहाचा दक्षिणेंतला पहिला सुभा होऊन राहिला पुढे त्या देवगिरीचे दौलताबाद झालें ! अर्थात् तेथें इस्लामी सत्ता आता कायम होऊन राहिली पुढें इ स १३२० मध्ये मुबारक हा वारला आणि त्याच्याबरोबर खिलजी घराण्याचा शेवट झाला

खिलजी घराण्यानतर तघलख घराणे दिल्लीपदावर आरूढ झाले ध्यासुद्दीनचा मुलगा महमद तघलख यानें अल्लाउद्दीनची प्रथा पुढे चालवून, दक्षिणेंत बेदर व वारंगळ यावर स्वारी करून प्रथम बेदर घेतलें. नतर इ स. १३२२ मध्यें वरंगळवर चालून जावून, तेथील प्रतापदेव रुद्राचा पराभव करून त्यास पकडून दिल्लीस नेले अर्थात् हें वरंगळ राज्य खालसा करून, तेथे एक सुभेदार नेमून, त्याच्या करवी तेथील सत्ता चालू केली

## प्रकरण ४ थे

# यदुकुलोद्भव संगमवंश

'सोमवंश्या यतःश्लाघ्याद्यादवा इति विश्रुता ।
तस्मिन् यदुकुलेश्लाघ्ये सोभूत् श्रीसंगमेश्वरः ॥
येन पूर्वविधानेन पालिताः सकलाः प्रजा ।

(एपि इं खंड, नेल्लूर नं १९, पृ १२१)

मुसलमानांनी दक्षिणेत असा प्रळय मांडला असतां कर्नाटकांत नवचैतन्य तेजाळूं लागलें होयसल राजाच्या दरबारांत संगम नांवाचा एक प्रतापी वीर होता तो चंद्रवंशी यदुकुलोत्पन्न असून होयसळ राजघराण्याशीं त्याचा निकट संबंध होता म्हणजे दोघेहि चंद्रवंशीय यादव कुलातले असून, दोघांचा पिढीजाद संबंध प्रेमाचा व विश्वासाचा होता या संगमाच्या बापाचें नांव बुक्क व आईचें नांव मागांबिका असें होतें या बुक्काची नांवापलीकडे माहिती आतांपर्यंत फारशी उपलब्ध झालेली नाहीं

हा संगम होयसळ नरेशाचा मांडलिक असून, त्याचें राज्य म्हैसुर राज्यातील पश्चिमेकडील शिमोगा प्रांतांत कलास येथें होतें होयसळच्या दरबारांत हा संगम एक चांगला नावाजलेला प्रतापशाली वीर होता तो जितका शूर, तितकाच मोठा उदार व धार्मिक होता तो पराक्रमामध्यें कार्तवीर्यासारखा प्रभावी व धैर्यांत हिमालयासारखा महामेरु असून, त्यानें दक्षिणेंत व उत्तरेत अनेक पराक्रमाचीं कृत्यें केलीं होतीं दक्षिणेकडे चेल, चोल व इतर राजे यास होयसाळशी प्रसंग असतां आपल्या प्रखर तरवारीचें पाणी पाजून, त्यास चांगलें रंजीस आणलें होतें आणि तंजावर व श्रीरंगपट्टण यांचा कबजा घेतला होता तो रामेश्वराच्या यात्रेस गेला, त्यावेळीं

त्याने तेथे पुष्कळच दानधर्म केला आपल्या राज्यातील प्रजेस प्रेमाने व धर्माने वागवून तिला सुखी व सतुष्ट राखलें होते त्याचा उल्लेख शिला-लेखात केलेला अनेक ठिकाणीं आढळतो वर मथळ्यावर दिलेला श्लोक नेल्लूर दानपत्रातला आहे या सगमाच्या वेळी मुसलमानाची झळ इतरत्रा प्रमाणें होयसाळ राज्यास फारशी बाधली नव्हती त्यास सगम, सगमेश, सगमेंद्र व संगमनृपेंद्र अशीं अनेक नावे होतीं

या सगमाची बायको शारदा नावाची असून, तिला मागाम्बिका, गौराम्बिका आणि कामाक्षी अशी आणखी दुसरीं नावेहि होतीं नेल्लूरच्या दानपत्रात तिला मानाम्बिका असे म्हटले आहे तिच्या पोटी पाच पुत्र जन्मास आले पहिला हरिहरप्प, दुसरा कम्प, तिसरा बुक्क, चौथा मारप्प व पाचवा मुद्दप्प अशी त्याचीं नावे असून, ते सर्व शूर व पराक्रमी होते हा मजकूर पुढील श्लोकात आढळतो, तो असा —

'तस्मादुद्भवन् पञ्च तनया॰ शौर्यशालिन॰।
कल्पावनिरूहाः पूर्वं कलशाम्बुनिधेरिव ॥
आदौ हरिहरः क्ष्माभृदथ कम्प-महिपतिः।
ततो बुक्कमहिपाल॰ पश्चान्मारपमुद्दपौ ॥

(एपि इं ख ३, पृ, २५)

या सगमवंशाची विशेष व विस्तृत अशी माहिती एपिग्रापिया कर्नाटिका खड १०, बागेपल्ली ७० मध्ये देण्यात आली आहे ती वाचकाचे मन या विषयात अधिक प्रकाशित करण्यासाठीं म्हणून येथे खालीं उद्धृत करीत आहे ती माहिती पुढील प्रमाणे आहे.

'चतु॰समुद्राधिपतेस्सुतोभूत् ततश्चतु षष्टि-कला-प्रवीण ।
नाम्ना यदुःकोपि नराधिपेन्द्रो आम्ना प्रथातीत-भुज-
प्रतापः ॥ ११ ॥

तद्वंश-मुक्तामणयो बभूवुश्चतुर्विंगैस्सहिता महीपा ।
यद्गो प्रतापहिमभानुनास्ता प्रतिपदारश्मित-चन्द्रिकासीत्
॥ १२ ॥

तेषां कुले कश्चन बुक्क-नामा तेजो-दुरापस्समभून्महीप ।
मागाम्बिका तस्य बभूव राज्ञी मेदिन्यदन्वत्तनयाधिविन्ना
॥ १३ ॥

तस्याऽभवत् सगमनाम-धेय सरस्वती-गीत-भुजापदान ।
शौर्ये यमाहुः किल कर्तवीर्य धैर्ये हिमाद्रिं महसीह
सूर्यम् ॥ १४ ॥

मानाम्बिका तस्य बभूव पत्नी महेश्वरस्येव महीध्रकन्या ।
विदर्भपुत्रीव नसलस्य विष्णोर्लक्ष्मीरिवेन्द्रस्य पुलोमजेव
॥ १५ ॥

तेनोदपाद्यन्त सुता महिष्यां तस्यां प्रशस्याकृतिना नृपेण ।
पञ्चाहित-क्ष्मापति-कुंजराणां पञ्चाननाः पञ्च
शराभिरूपा ॥ १६ ॥

हरिहर-राय-कम्प-धरणीपति-बुक्क मही-
परिवृढ-मार-भूरमण-मुद्द-नृपा खलु ते ।
अनघ गुणेषु तेषु नवखड-महीश्वरताम्
अभजत पूर्वजस्स युधिष्ठिरवन्महसा ॥ १७ ॥

सौय विजित्याखिल-दिग्विभागान्
सुत्राम-धामांग-कलिंग-पूर्वैं ।
उपास्यमानः क्षितिपैश्च सर्वाम्
उर्वीमशात् कुंजरकोणपुर्याम् ॥ १८ ॥

(एपि क खंड १० बागेपल्लि ७०, पृ २९८)

यावरील वचनांत संगमाची थोडीशी विस्तृत अशी पूर्वीची हकीकत आली आहे ही हकीकत संस्कृत भाषेंत पण कानडी लिपींत आहे यावरून

समग हा यदुकुलोद्भव असून, तो कर्नाटकी म्हणवीत होता, याविषयी सशय रहात नाहीं

या सगमाच्या पाचहि पुत्रात हरिहर हा सर्वात ज्येष्ठ असून, तो होयसलच्या दरबारात मोठा प्रतिष्ठावंत सरदार होता यावेळेला मुसलमानानी द्वारसमुद्रावर स्वारीकरून, वीर बल्लाळ (तृतीय) याची सत्ता जवळ जवळ सपुष्टातच आणली होती, तरी त्यातल्या त्यात सुदैव हें कीं इतर राज्याप्रमाणे द्वारसमुद्राच्या छातीवर अद्याप मुसलमानी सुभेदार लादला नव्हता वीरबल्लाळाची सत्ता कशीबशी तरी जीव धरून होती पण केव्हां कसा प्रसंग येईल, याचा मात्र नेम नव्हता

पुढे लवकरच एक भयसूचक व चिंताजनक बातमी आली इ स. १३३४ सालची गोष्ट ही बातमी आणणारा वारगळ येथील प्रतापरुद्रदेव याचा मुलगा कृष्णनाइक हा होय तो राज्यभ्रष्ट झाल्यावर वारंगळ नजीकच अज्ञातवासात रहात होता त्याचे लक्ष वारगळ येथील मुसलमानानी चालविलेल्या गुप्त खलबताकडे पूर्ण लागलेलें होतें त्याचे काही गुप्तहेर त्यास तेथील गुप्तकारस्थानाची माहिती चोरून कळवीत असत याप्रमाणे संगमवंशाची व द्वारसमुद्राची ही अशी थोडक्यात हकीकत आहे



प्रकरण ५ वें

# महामंडलेश्वर हरियप्प वडेयर

प्रतापरुद्रदेवाचा मुलगा कृष्ण नाइक याने वारंगळ येथे चाललेल्या मुसलमानाच्या गुप्त खलबताची व कारस्थानाची भूयसूचक बातमी द्वार समुद्रात येऊन प्रकट करताच वीरबल्लाळाच्या छातीत धस्स झाले ! त्याला वाटलें हें गडातर आपणावरच मागेपुढे शेकणार आहे ! कारण तोच तेवढा एक दक्षिणेत त्यातल्या त्यात स्वतंत्र राजा म्हणवीत होता तेथे मुसलमानाचा प्रवेश अजून झाला नव्हता. माडलिकच खरा पण एका दृष्टीनें तो स्वतंत्रहि होता न जाणो त्यावरहि घाला आला तर ! इतर हिंदूराजांचें तर नावच नव्हते ! सगळा मुलुख इस्लामी सत्तेने ग्रासलेला ! सर्वराजे काय असतील नसतील तेवढे इस्लामी सत्तेच्या दावणीत अखड गोवलेले ! मग त्याच्या मदतीची आशा कसची !

वीर बल्लाळ आता खडबडून जागा झाला आणि आपल्या राज्याचा कडेकोट बदोबदस्त करण्याच्या तयारीस लागला सगमनरेशाचे पाचहि पुत्र त्यावेळीं द्वारसमुद्रातच असून, त्या पैकीं सर्वात वडील जो हरिहरराय तो नुकताच तेथे एका अधिकारपदावर होता व त्याची योग्यता व लौकिक तो वीरबल्लाळ चागला जाणून होता त्याला आता महामडलेश्वर करून त्याची त्याने उत्तरेकडे नेमणूक केली आणि ती फार शहाणपणाची व मुत्सद्दीगिरीची गोष्ट झाली कारण हरिहराचा मागचा इतिहास लक्षात घेता, त्या योजनेंत पुष्कळ अर्थ भरला होता, असेच कोणीहि म्हणेल ही गोष्ट ध्यानात येण्यास त्याचा मागचा थोडासा इतिहास समजणे इष्ट वाटल्यावरून, त्याचा आम्ही येथे धावता उल्लेख करतो

हा हरिहर पूर्वी वारंगळ येथे काकतीय राजाच्या पदरीं मोठ्या अधिकारावर होता त्याच्या बरोबरच त्याचा मधला भाऊ बुक्क हाहि एक

अधिकारी होता. त्यावेळी ते तेथे हुक्क (म्हणजे हरिहर) व बुक्क या नावानें ओळखले जात होते त्यामुळे त्या राज्यातील सर्व माहिती हरिहरास पूर्ण अवगत होती पुढे ते राज्य इ स १३२३ साली खालसा होऊन बादशहाच्या सत्तेखाली गेल्यावर तो तेथून निसटून बाहेर पडला व पुढे लवकरच आनेगोंदी येथे आल्यावर तेथील जबुकेश्वर राजाने त्याची कर्तबगारी पाहून, त्यास आपल्या दिवाणगिरीवर नेमून घेतले. यामुळे तेथील भागातील माहितीहि त्यास खडान् खडा मिळाली होती याचा उपयोग पुढे त्यास बराच झाला

आनेगोंदीचें राज्यहि इ स १३३४ मध्ये खालसा झाल्यावर पुढे तो आपल्या घरी म्हणजे होयसळ राज्यात आला तेथे आल्यावर वीर बल्लाळाने त्यास आपल्या पदरी घेऊन मोठ्या हुद्यावर नेमून घेतले आणि त्याची आता मागच्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणें महामंडलेश्वरच्या जागेवर नेमणूक करून, उत्तरेकडचा प्रांत साभाळण्याची जबाबदारी त्याच्यावर सोपविली. अशी ही हरिहराची थोडक्यात मागील कथा आहे

हरिहराला मुसलमानाच्या डावपेचाची वारगळ येथे असताना अधुकशी कल्पना आली होती तिचा आता त्याला फार उपयोग झाला त्याची महामंडलेश्वरच्या जागीं नेमणूक होऊन, उत्तरभाग रक्षणाची जबाबदारी अंगावर पडताच पुढे दिवस न घालविता तावडतोब तो आपल्या जागेवर रुजु होण्यास निघाला वाटेंत आनेगोंदीकडे वळून तेथे जाऊन पाहण्याचें मनात आल्यावरून तो तिकडे वळला व तेथे गेल्यावर त्यास काय दिसलें व त्यानें काय पाहिले ?

ती पूर्वीची आनेगोंदी आता त्यास दिसली काय ? ती तशी होती काय ? सर्वच रंग पालटलेला ! स्वर्गाचे स्मशान, सोन्याची माती, अमृताचें वीष झालेले ! जेथे पूर्वी इहलोकातील स्वर्ग होता, आता तेथे भकास स्मशान पसरून होतें ! गाव सगळा ओस पडला होता ! जावे तिकडे व पहावें तेथे पडझड, जाळपोळ व मोडतोड ! याशिवाय त्याला तेथे काहीच दिसलें नाहीं !! जिकडे तिकडे शुकशुकाटच शुकशुकाट ! घरे पडलेली,

मंदिरें मोडलेलीं, मूर्ती फोडलेल्या, रस्ते ओस पडलेले, बाजारपेठा उघड्या झालेल्या, जावे तेथे दुःखाचे उद्गार व निराशेचे सुस्कार !! सर्व वातावरण दुःख, दैन्य, निराशा, चिंता व घबराट यांनी अगदी दाटून गेले होते !!

त्याचप्रमाणे राजा जंबुकेश्वराचा शोकजनक अंत ! राजस्त्रियांची अग्नि-कुंडांत आहुति ! राजपुत्रांना सक्तीने दिलेली इस्लामी दीक्षा ! व राज-धानीत रोज चाललेले अनन्वित अत्याचार व भ्रष्टाचार !! काळजाला झोंबणारे हें सर्व शोचनीय व उद्वेगजनक दृश्य पाहून, त्याचे अंतःकरण कळवळले, तळमळले, तडफडले व जळजळले !! पण करणार काय ? एक आनेगोंदीच कशाला, त्यावेळी आखा दक्षिण भारत असाच हळहळत व विव्हळत पडला होता !!!

हरिहराने हें सर्व पाहिले व झालेले दुःख व आलेला संताप मुकाट्यानें गिळला. देशावर आलेल्या संकटांतून व कोसळलेल्या विपत्तीतून बिचाऱ्या गरीब व निरपराध हिंदूंची सुटका करणे हे त्याच्या हातात आता थोडकेंच होते ! भारतावर परमेश्वरच कोपला होता कीं काय, कोण जाणे ! लाखो लोक दुःखात व विरहात तळमळत व विव्हळत असता, त्यांची मुक्तता व उद्धार करणारा साऱ्या भरतखंडात एकहि हिंदू वीर निपजू नये, हा केवढा दैवदुर्विलास ! बिचारा हरिहर मनात फार शरमला ! पण उपाय नसल्यामुळें निरुपाय होऊन, आलेल्या वाटेने परत फिरला !

तथापि आनेगोंदीचे तें हृदयद्रावक दृश्य पाहून त्याला सहस्त्र विंच-वाच्या वेदना झाल्या ! या आलेल्या संकटातून सुरक्षित मार्ग कसा काढावा व कोण आपणास तो दाखवून देईल, या विचारात त्याचें मन आता गुटमळूं लागलें. दिवस मोठे नाजूक ! एकांतात बसून मनमोकळेपणानें दुसऱ्याशी धड बोलण्याची सुद्धा चोरी ! कोणीतरी ऐकलें तर ! केवढा कठीण प्रसंग ! जिवावरच बेतायचे ! तसा विश्वासूक माणूस त्यास दिसेना व योग्य उपाय सुचेना ! तो मोठ्या विवंचनेत पडला ! मुसलमानांचा दरारा इतका जबरदस्त होता की कोणाची बाहेर ब्र बोलण्याची छाती नव्हती ! फट् म्हणता ब्रम्हहत्या ! मुसलमानांचा त्यांना इतका धाक बसला होता. आखा मुलुख बावरून व भेदरून गर्भगलित झाला होता ! असो.

## प्रकरण ६ वे

# दिव्य चमत्कार

तुगभद्रा नदी तीर्त्वा दक्षिणे दिग्विभागके ।
विपिने तु परिश्रान्त दृष्ट्वा क्षुद्रमृगं पुनः ॥
शशस्य ग्रहणार्थाय भटाः श्वानचय तत ।
असुर्चस्तेष्वेभिग्रस्तौ मृगयानभ्यद्रुद्रुवन् ॥
प्रपलाय्य गता श्वाना स मृगोऽन्तर्दधे पुन ।
तदाश्चर्य मन्यमाना मृगयाजीविनो भटा ॥

—विद्यारण्यकृत-कालज्ञान

*(Further Sou1 ces of V1jayanaga1 H1story P 16)*

हरिहराम एक मोठा नाद होता तो म्हणजे शिकारीचा तुंगभद्रेच्या पलीकडे दक्षिणेस दाटजगल पसरले असून, ती जागा शिकार खेळण्यास मोठ्या सोयीची होती म्हणून काही सोबत्यासह तो आपला नेहमीचा शिकारीचा कुत्रा बरोबर घेऊन, नदी ओलाडून पलीकडे जगलांत गेला तेथे गेल्यावर काही अंतर पुढे जाऊन सावज शोधीत असता, त्याला अकस्मात् एक चागला ससा दिसला पकडण्यासाठीं म्हणून त्यानें त्याच्यावर आपला शिकारी कुत्रा घातला

यजमानाची आज्ञा होताच कुत्राहि मोठ्या आवेशानें त्याच्यावर धावून गेला पण काय चमत्कार ! त्या सशाने मोठ्या खुबीने त्याची झडप चुकवून, पळून न जाता उलट घेऊन त्या कुत्र्याचा कडकडून चावा घेतला ! तो इतका की, त्या बिचाऱ्याला प्रागातिक वेदना झाल्या ! त्यासरशी तो घाबरून ओरडत ओरडत परत मागे फिरला ! ते पाहून हरीहराला मोठें आश्चर्य वाटले ! त्याने पुनः त्याला त्या प्राण्यावर जाण्यास सागितलें

पण तो काही पुढे पाऊल ठेवण्यास धजेना ! धन्याची गोष्ट ऐकण्यास त्याची तयारी दिसेना त्या सशाने त्यास चावून मोठ्या रजीस आणले होते पुढें तो ससा तेथून झुडुपात जाऊन शिरला

हरिहराला त्या दिवशी अरण्यात घडलेला तो विचित्र व अपूर्व प्रकार पाहून, मोठा अचबा वाटला वाघाची निधड्या छातीने शिकार करणारा धीट कुत्रा कोणीकडे आणि कुत्र्याची चाहूल ऐकून झुडुपात धूम ठोकणारा भ्याड ससा कोणीकडे ! याच कुत्र्याने आपल्या सोबत्यासह मागे किती तरी वेळा वाघासारख्या हिंस्र प्राण्याची बेधडक व बेमालूम शिकार केली होती पण आज पहावे तर तोच जहाबाज कुत्रा क्षुद्र सशाला पाहून पुढे पाऊल ठेवण्यास धजत नाही ! हा काय चमत्कार ! ही काय भुताटकी का विधीची विचित्र लीला ! आहे तरी काय हें गौडबंगाल ! याचे त्याला मोठे कोडे पडले ! कुत्रा सशावर चालून जात नाही, याची जेव्हां खात्री पटली, तेव्हा तो मागें वळला

परत येत असताना वाटेत त्याला एक दिव्य पुरुष भेटला. नदीच्या काठावरून तो चालला होता जवळ आल्यावर हरिहराने त्यास जरा निरखून पाहिले केवढी तेज पुंज विभूति ती ! कपाळावर शुभ्र भस्माचा आडवा पट्टा ओढलेला, अगभरून शुभ्र वस्त्र पांघरलेले, पायांत खडाव, असा तो दिव्यपुरुष होता

त्या महाभागाकडे दृष्टि गेल्यावर हरिहरास काय वाटले कोणास ठाऊक, चटकन् घोडा थांबवून स्वारी पटकन् खालीं उतरली व त्या महाभागाजवळ येऊन त्यास आदर पूर्वक नमस्कार करून तो बाजूस उभा राहिला हरिहराने लवून आदरपूर्वक नमस्कार करतांच त्या देवपुरुषानें आपले दोन्ही हात त्याच्या डोक्यावर धरून, त्यास प्रेमाने अभिवादन केले

वाचक हो ! तो कोण हें तुम्ही ओळखलें काय ? एक तेजस्वी ब्राम्हण ! महा तपस्वी असा एक दिव्य पुरुष ! विद्यातपानें सूर्याप्रमाणें तळपणारी एक महान् विभूति ! एका शूर क्षत्रियाला–मोठ्या वीर पुरुषाला–राज्यलक्ष्मी मिळवून देणारा एक नवीन युगकर्ता थोर महात्मा ! कर्नाट-

काच्या–नव्हे भारताच्या–इतिहासात–मोठी क्रांति घडवून अमर होऊन राहिलेला एक महान् राष्ट्रविधाता ! अष्टपैलू व अष्टावधानी दिव्यविभूति ! श्रीमन्माधवाचार्य ! 'कर्नाटक–सिंहासन–स्थापनाचार्य' या बिरुदावळीने इतिहासांत चमकणारा–कर्नाटक भाग्यविधाता–अमर कीर्ति–आचार्यदेव !!

त्या महापुरुषाचे सुमंगल दर्शन होताच हरिहराला पाण्यात पडलेल्या निराधार माणसाला प्रत्यक्ष देव भेटल्यासारखे झाले ! त्या आचार्यदेवानें स्मित हास्य करून, त्यास अभयसूचक व शुभकारक मंगल आशीर्वाद दिल्यावर त्याची मोठ्या आस्थेने विचारपूस केली तेव्हा हरिहराने थोड-क्यात आपले नावगाव सांगून, शिवाय वर जंगलातील तो घडलेला चमत्कारिक प्रकारहि निवेदन केला माधवाचार्यांना ती हकीकत मोठी विलक्षण व आश्चर्यकारक वाटली म्हणून ती जागा प्रत्यक्ष जाऊन पाहण्याची त्यांनी इच्छा दर्शविल्यावरून, हरिहराने त्यास तिकडे नेऊन ती जागा दाखविली

माधवाचार्यांनी ती जागा पाहिली नीट इकडे तिकडे न्याहाळून पाहिली खाली पाहिले, वर पाहिले आजूबाजूला पाहिले एकदा पाहिलें दोनदा पाहिले तीनदा पाहिले आणि तेथील सर्व परिस्थिति नीट लक्षात घेऊन डोळे मिटून क्षणभर विचार करून, मग ते हरिहरास म्हणाले — हरियप्पा ! ही जागा मोठी पुण्यभू आहे ! आणि तू मोठा भाग्यशाली आहेस ! या ठिकाणी तूं आपला वाडा बांध व शहर वसव ! येथे मागे पुढे मोठें साम्राज्य उठून, या स्थानाला अपूर्व मान व महत्व प्राप्त होणार आहे ! तुला जर माझ्यावर विश्वास असेल, तर विलंब न करता तावडतोब कार्यास लाग ! येथे विरुपाक्षदेवाच्या मंगल कृपेने लवकरच सुंदर शहर वसेल ! येथें जो प्रकार घडला, त्यांत एक प्रकारचा दैवी शुभ संदेश असून, देशाच्या भावी उत्कर्षाचें व लोकोद्धाराचे तें सुमंगल चिन्ह आहे !

*(A forgotten Empire by Seuell Robert, P 299–300)*

असाच मजकूर थोडा फेरफार होऊन नेल्लूर व कोलार शिलालेखातहि आढळतो (एपि इंडिका खंड ३, नेल्लूर १९ पृ १२१)

## प्रकरण ७ वे

# भावी साम्राज्याची मुहूर्तमेढ

नागेष्वर्के नमितनृपतेश्शालिवाहस्य याते ।
धातोरब्दे शुभसमुचिते मासि वैशाखमासि ॥
शुक्ले पक्षे सुरगुरुयुते सोम्यवारे सुलग्ने ।
सप्तम्यां श्रीविजयनगरीं निर्ममे निर्ममेन्द्र ॥

—गुरुवंश महा काव्य
हंपी शिलालेख

ಆಲಿಸೈ ಶಾಲಿವಾಹನ ಶಕದ ಸಾವಿರದ |
ಮೇಲದಿನ್ನೂರೈವತ್ತೆಂಟರಿಂದ ಮುಂದೆ |
ಪೇಳಲೇಂ ಧಾತುಸಂವತ್ಸರದ ವೈಶಾಖ |
ಶುದ್ಧ ಸಪ್ತಮಿ ಸುದಿನದೆ ॥ ೧ ॥
ಲೀಲೆಯಿಂ ಹರಿಹರಗೆ ಪಟ್ಟಮಂ ಕಟ್ಟಲವ |
ನಾಳುವಂ ಹದಿಮೂರು ಪಟ್ಟ ಪರಿಯಂತರಂ |
ಪೇಳಲೇಂ ತನ್ನ ಸಂತತಿ ಗೂಡಿ |
ನೂರೈವತ್ತೈದು ಸಂವತ್ಸರವನು ॥ ೨ ॥

(विरुपाक्ष पंडितकृत बसवपुराण संधि ६३ श्लो १-२)

वरील संस्कृत व खालील कानडी दोन्ही वचनाचा मथितार्थ जवळ जवळ सारखाच आहे वरील प्रसंगाची सत्यता दाखविणारे इतर अनेक आधार आहेत मात्र श्रृंगेरीमठात सोमवारा ऐवजी रविवार म्हटले आहे या वरील दोन वचनावरून आमचा कार्यभाग होत असल्यामुळे इतर वचनाचा पाल्हाळ माजविण्याच्या भरीस पडत नाहीं

त्या पुण्यपुरुषाचे-माधवाचार्यांचे-ते गोड भविष्य ऐकून, हरिहराच्या दग्ध अंतःकरणात नवचैतन्याची एक मधुर लाट उसळून गेली त्याचें सर्वांग रोमांचित झाले व मन समाधान पावून, आनंदाने प्रफुल्ल फुलले त्याला रात्रंदिवस जी काळजी डिवचत होती-जो हृद्रोग सतावीत होता-जो ध्यास लागला होता, तो या आचार्यदेवाच्या भविष्यवाणीने-अमृतवृष्टीने-शांत झाला व तो हात जोडून त्यास म्हणाला — आचार्यदेव ! आपण मला गुरुस्थानीं आहा ! आपण माऊली आहा व मी आपला बाळ आहे ! मला आशीर्वाद द्या ! मंगल आशीर्वाद द्या ! मार्गदर्शन करा ! आपण माझे गुरु आहा व मी आपला शिष्य आहे ! आपले वचन मला शिरसा वंद्य आहे ! आपण सांगाल तसे करण्यास व वागण्यास मी तयार आहे ! गुरुदेवांनी मजवर अनुग्रह करावा ! माझ्या देशाचा उद्धार करावा !!

हरियप्पा ! आचार्य म्हणाले' – काही चिंता करू नकोस ! विरुपाक्ष देव तुझा पाठराखा आहे ! आणि भुवनेश्वरी तुला प्रसन्न आहे ! माझा तुला पूर्ण मंगल आशीर्वाद आहे ! आता विलंब करू नकोस ! कामास लाग ! आणि देशाचा उद्धार कर !!

इतकें झाल्यावर ते दोघे तेथून परतले

किती सुंदर प्रदेश ! काय रमणीय देखावा ! तुंगभद्रेच्या दक्षिणेकडचा पुण्य प्रदेश तो ! बोलून चालून रामायणातला प्रसिद्ध व पवित्र देश ! किष्किंधा प्रदेश ! जवळपास शेजारींच हेमकूट व ऋष्यमूक पर्वत ! त्याच-प्रमाणें मातंगाश्रम व शबरीस्थान ! पंपासरोवर व जानकी जलाशय ! वृक्षलतादिकांनी गजबजलेली घनदाट वृक्षराजि ! इत्यादि निसर्गरमणीय देखाव्यांनी विभूषित झालेला पुण्य प्रदेश तो ! श्री रामचंद्रासारख्या पुण्य पुरुषाच्या पादस्पर्शानें पूनीत झालेला पवित्र देश !! महाभगवद्भक्त आंजने-याची पुण्य जन्मभूमि !!

हरिहराने दाखविलेली ती जागा सर्व दृष्टीने योग्य आहे असें अंतर्दृष्टीने जाणून, तेथें नवीन शहर वसवून, हरिहराने ती आपली राजधानी करावी, असा सल्ला माधवाचार्यांनी दिला व तो हरिहरास

पसत पडून त्या प्रमाणे करण्यास त्याने सम्मति दिली यानंतर ते दोघेहि तेथून निघून पुढील उद्योगास लागले

कर्नाटकभाग्योदयाचा मंगल काल समीप आला! त्याचे उच्च ग्रह सन्मुख झाले! पारतन्त्र्याची काळरात्र ओसरणीस लागली! आणि निराशेचा अंधकार झुरत चालला! या सर्व गोष्टी माधवाचार्यांच्या पवित्र दर्शनानें घडून आल्या! हरिहरराय हा नदीच्या पलीकडे एक नवीन शहर वसवून तेथे तो राहणार आहे, ही बातमी बाहेर जेव्हा जाहीर झाली, तेव्हां आनेगोंदीतील त्रस्त व ग्रस्त जनतेला संजीवनीचा लाभ झाल्याचा आनंद झाला! तेथील गांजलेले व पीडलेले चागले चागले खानदानीचे श्रीमंत लोक, देशोधडीस लागलेले सरदार, जहागिरदार, तसेच उद्योगधंदेवाले व कित्येक बेकार झालेले आसपासचे लोक तेथे आपलीं घरें बाधून येऊन राहण्यास आनदाने तयार झाले

ही बातमी हा हा म्हणता सर्व प्रातभर पसरून, तेथें येऊन राहण्याची लोकात एकच अहमहमिका सुरू झाली माधवाचार्य शृंगेरीस जाऊन, भारतीतीर्थांस झालेला प्रकार व हकीकत कळवून त्याचा आशीर्वाद घेऊन परत आले व सकल्पित जागीं प्रत्यक्ष हजर राहून, शहराची मन लावून आखणी व माडणी करण्यात व त्याला सुदर व प्रशस्त रूप देण्यात आहोरात्र गढून गेले

पुढें लवकरच धातुनाम सवत्सर उजाडले आणि वैशाख मास समीपला रविवारचा तो दिवस! शुक्लपक्ष आणि सप्तमीची मगळतीथ! शके १२५८ म्हणजे इ स १३३६ साल! प्रभात होताच चौघड्याचा सुमधुर ध्वनि हवेत आलापू लागला! ब्राम्हणाचा पवित्र व प्रासादिक वेद-घोष घुमू लागला! अग्निनारायणाची प्रतिष्ठा करून, तेथें त्याचें विधिपूर्वक पूजन करण्यात आले! इतक्यात सूर्यनारायणाची स्वारी तो मगलविधि पाहण्यास म्हणून उदयगिरीवरून हळूच वर डोकावू लागली!! मुहूर्त जवळ आला आणि महामडलेश्वर हरिहररायानें मोठ्या समारंभानें कर्नाटक-भाग्यविधाता श्रीमन्माधवाचार्यांच्या मंगल हस्ते भावी राजधानीचा कोन-

शिलेचा दगड तेथे बसविला आणि भावी साम्राज्याची मुहूर्तमेढ रोवण्यांत आली !! अशी ही विद्यानगर उर्फ विजयनगर स्थापनेची जन्मकथा आहे

हा सर्व इतिहास विद्यारण्यकृत 'कालज्ञान' यात थोडक्यात देण्यात आला आहे, तो वाचकाच्या माहितीसाठी खाली देण्यात येत आहे तो मजकूर असा –

'तुंगभद्रानदीतीरे हस्तिकोणाव्हये पुरे।
निवसन्तौ कदाचित्तौ मृगयामनोत्सुकौ॥
तुंगभद्रां नदीं तीर्त्वा दक्षिणे दिग्विभागके।
विपिने तु परिश्रान्त दृष्ट्वा क्षुद्रमृग पुन.।
शशस्य ग्रहणार्थाय भटा श्वानचय तत.।
अमुचस्तेप्वाभिग्रस्तौ मृगयानभ्यदुद्रुवन्॥
प्रपलाय्य गता. श्वाना स मृगोऽन्तर्दधे पुन.।
तदाश्चर्य मन्यमाना मृगयजीविनो भटाः॥
भूपालयो. समाचख्यु. तद्वृत्तान्त तु तत्र तौ।
विज्ञापयत अर्याय गुरवे विश्रुताय च॥
विद्यारण्याय मुनये वेदव्यासकृपावते।
तच्छ्रुत्वा वचनं योगी सभायातस्तदन्वितः॥
ता स्थली स समीक्ष्याथ राजधानी महीभुज.।
तद्वंशजानामन्येषा कर्तुमेवोपचक्रमे॥
धात्रब्दे सितसप्तम्या वैशाखे मासि भास्करे।
दिक्संख्यायुक्तबाणाब्धिचन्द्रयुक्तशकान्विते॥
रचिता नगरी रम्या पुरुषाकृति शालिनी।

—विद्यारण्य–कालज्ञान.

*(Further Sources of Vijayanagar History P 16)*

अर्थात् त्यावेळी काय काय प्रकार झाले व विधि उरकण्यात आले, याची हकीकत 'विजयनगर वृत्तात' या मथळ्या खालीं थोडक्यात सारांश

**रूपाने कानडींत देण्यात आली असून, ती उद्‌बोधक असल्यामुळे आम्ही येथे ती जशीच्या तशीच देतो तो मजकूर कानडींत असा:—**

'ತುಂಗಭದ್ರಾ ಪ್ರವಾಹಯೆಲ್ಲಿ ಬರುತ್ತಾ ಇದೆಯೊ ಅಲ್ಲಿ ಆನೆಗೊಂದಿ ಸ್ಥಳಕ್ಕೆ ವನಬೇಟ ಹೋಗಿ ಇರುತ್ತಿದ್ದಲ್ಲಿ ಅಲ್ಲಿ ಇರುವಂಥಾ ಶಶಕಗಳು ಶ್ವಾನಗಳ ಮೇಲೆ ಅಟ್ಟಿಕೊಂಡು ಬರಲಾಗಿ ಇದು ಮಹಾ ಪ್ರಬಲ ಸ್ಥಲ, ಇಲ್ಲಿಯೇ ಪಟ್ಟಣವ ನಿರ್ಮಾಣ ಮಾಡಬೇಕೆಂದು ಈ ವಿದ್ಯಾರಣ್ಯರು ಸಂಕಲ್ಪಿಸಿ ಪಟ್ಟಣ ಮಾಡಿದ ವಿವರಾ —

ಶಾಲಿವಾಹನ ಶಕೆ ೧೨೫೮ ಧಾತು ಸಂ॥ ವೈಶಾಖ ಶು॥ ೭ ಆದಿತ್ಯ ವಾರ ಮಖಾನಕ್ಷತ್ರದಲ್ಲೂ ವಿಜಯನಗರ ನಿರ್ಮಾಣ ಮಾಡಿದರು ಭಾರತೀ ಕೃಷ್ಣತೀರ್ಥರು ಶ್ರೀ ವಿದ್ಯಾಶಂಕರ ದೇವಾಲಯುವ ನಿರ್ಮಾಣ ಮಾಡಿದರು ಇದಕ್ಕೆ ಶಕ ವರುಷ ೧೨೬೩ನೇ ವರುಷದಲ್ಲಿ ಜಕ್ಕಣಾಚಾರಿಯಿಂದಾ ದೇವಾಲಯುವ ನಿರ್ಮಾಣ ಮಾಡಿದರು

ಶ್ರೀವಿದ್ಯಾರಣ್ಯ ಶ್ರೀಪಾದರು ಶೃಂಗೆರಿಗೂ ವಿಜಯನಗರಕ್ಕೂ ಒಂದೇ ಯಂತ್ರವಂ ಬರೆದು ಹರಿಹರ ಮಹಾರಾಯರಿಗೆ ಪಟ್ಟಾಭಿಷೇಕ ವನ್ನು ಮಾಡಿಸಬೇಕಾದರೆ ಶ್ರೀವಿದ್ಯಾರಣ್ಯರು ತಾವು ಸಿಂಹಾಸನದ ಮೇಲೆ ಕುಳಿತುಕೊಂಡು ರಾಯರಿಂದ ಶೃಂಗೇರಿ ಶ್ರೀಮಠ, ಸತ್ರ ಧರ್ಮ ಅಗ್ರಹಾರ ಪರಮಹಂಸ ಸತ್ರಕ್ಕೆ ಸಹಾ ತಾವು ಪಡೆದ ಕರ್ನಾಟಕ ರಾಜ್ಯ ದಲ್ಲಿ ಘಟ್ಟದ ಮೇಲೆ ಘಟ್ಟದ ಕೆಳಗೆ ಸವಾದಲಕ್ಷ ಸೀಮೆಯನ್ನು ಧಾರಾಗ್ರಾ ಹಿತವಾಗಿ ಸಮರ್ಪಿಸಿಕೊಂಡು ಆ ಮೇಲೆ ರಾಯರ ಸಿಂಹಾಸನದ ಮೇಲೆ ಕುಳ್ಳಿರಿಸಿ ಪಟ್ಟಾಭಿಷೇಕ ಮಾಡಿಸಿ ರಾಜ ಚಿನ್ಹ ಮುಂತಾದ ಬಿರುದು, ಮುತ್ತಿನ ಕಿರೀಟ, ಮುತ್ತಿನ ಗದ್ದಿಗೆ ಸಹಾ ರಾಯರಿಗೆ ಕೊಡಿಸಿ ಆ ರಾಯರು ಈ ವಿದ್ಯಾರಣ್ಯ ಶ್ರೀಪಾದರಿಗೆ ಮುತ್ತಿನ ಚಾವಡಿ ಹಜಾರದಲ್ಲಿ ಕುಳ್ಳಿರಿಸಿ ಅನೇಕ ಪೂಜೋಪಚಾರಗಳ ಮಾಡಿತಮ್ಮ ಬಿರುದುಗಳಮುಂತಾಗಿ ಶ್ರೀಪಾ ದಗಳಿಗೆ ನಡೆಯಬೇಕೆಂದು ಮುತ್ತಿನ ಕಿರೀಟ, ಮುತ್ತಿನ ಗದ್ದಿಗೆ, ಸ್ವರ್ಣ ಪಾದುಕ ಮುಂತಾಗಿ ಸಮರ್ಪಿಸಿದಲ್ಲಿ ತಾವು ವ್ಯಾಸರಿಂದ ಪಡೆದ ಘಟಿಕಾ ಸಿದ್ಧಿ ಪ್ರಯೋಗಗಳನ್ನು ಇವರು ತಾವು ರಚಿಸಿದ ವಿಜಯನಗರ ಪಟ್ಟಣದಲ್ಲಿ ಸ್ವರ್ಣವೃಷ್ಟಿ ಮೂರು ಮುಕ್ಕಾಲ ಘಳಿಗೆ ತರಿಸಿ ಮನೆ ಮನೆಗಳಲ್ಲಿ ಬಿದ್ದ

ಸ್ವರ್ಣವು ಆ ಮನೆಯವರಿಗೆ ಸರಿ ಮೇಲಾಪ್ದು ರಾಜಭಾಂಡಾರಕ್ಕೆ ತರಿಸಿ ಹಾಕಿಸ್ತರು ರಾಯರಿಗೆ ಶ್ರೀಮದ್ರಾಜಾಧಿರಾಜ ರಾಜಪರಮೇಶ್ವರ ಅಪ್ರತಿಮ ಪ್ರತಾಪವೀರ ನರಪತಿಯೆಂಬ ಬಿರುದಾಂಕಿತವ ಮಾಡಿ ಶ್ರೀವಿರುಪಾಕ್ಷವೆಂಬ ಮುದ್ರೆ ಉಂಗುರ ಸಹ ದಯೆಮಾಡಿ ಶೃಂಗೇರಿಯಲ್ಲಿ ಶ್ರೀವಿದ್ಯಾಶಂಕರ ಶ್ರೀಶಾರದಾ ಚಂದ್ರಮೌಳೀಶ್ವರ ಸ್ವಾಮಿಯ ಸೇವೆಗೆ ಸತ್ರ ಧರ್ಮಗಳಿಗೆ ಸಹ ಸ್ವಾಸ್ಥ್ಯ ವಿಂಗಡಿಸಿ ಬ್ರಾಹ್ಮರಿಗೆ ಅಗ್ರಹಾರಕ್ಕೆ ಮೂವತ್ತು ಸಾವಿರ ವರಹದ ಸ್ವಾಸ್ಥ್ಯ ಸಹ ನೇಮಿಸ್ತರು ಅಲ್ಲಿಗೆ ಶಾಲಿವಾಹನ ಶಕ ವರುಷ ೧೨೬೩ನೇ ವಿಕ್ರಮ ಸಂ॥ ದಲ್ಲೂ ಶ್ರೀವಿದ್ಯಾಶಂಕರ ದೇವಾಲಯ ನಿರ್ಮಾಣ ಜಕ್ಕಣಾಚಾರಿ ಇವನ ಮಗನಿಂದಾ ಸಹ ಶೃಂಗೇರಿ ಬೆಲೂರು, ಹಳೆಬೀಡು ಈ ಮೂರು ಸ್ಥಳದ ದೇವಾಲಯ ನಿರ್ಮಾಣವಾಯಿತ್ತು

— ವಿಜಯನಗರ ವೃತ್ತಾಂತ

*(Further Sources of Vijayanagar History P P 13–14)*

**मराठी भावार्थः** — तुंगभद्रा नदीच्या काठावर असलेल्या आनेगोदीच्या रानात हरिहर हा शिकारीस गेल्यावेळी तेथे ससानी कुत्र्यांना पिटाळून त्याचा पाठलाग केला अर्थात् त्या स्थानाचे महात्म्य मोठे आहे सबब तेथेंच नगरस्थापना करावी, असे मनात ठरवून विद्यारण्यानी त्याच जागीं विजयनगरची स्थापना केली

त्याप्रसगाचा तपशील असाः— शालिवाहन शके १२५८ धातुनाम संवत्सर वैशाख शुद्ध सप्तमी, आदित्यवार, मघानक्षत्र, यादिवशीं त्यानी विजयनगरची स्थापना केली भारतीकृष्णतीर्थांनी श्री विद्याशकराची स्थापना करून, तेथे जकणाचार्यांकडून देवालय बाधविले

श्री विद्यारण्य श्रीपादानी श्रृगेरी व विजयनगर या दोहोनाहि एकच यत्र लिहून, हरिहर महाराजास सिंहासनावर बसविण्याच्या पूर्वी प्रथम आपणच त्या सिंहासनावर बसून, हरिहररायाकडून श्रृगेरी येथील श्रीमठ, छत्र, धर्म, अग्रहार व परमहंस सत्र यासर्वांना त्याने मिळविलेल्या कर्नाटक राज्यातील घाटाखालील व घाटावरील सपादलक्ष जमीन समर्पण करून

घेतली नतर रायास त्यासिहासनावर बसवून, त्यास पट्टाभिषेक करण्यात आल्यावर त्याला राजचिन्हें, बिरुदावलि, मोत्याचे किरीट, मोत्याचे राजासन वगैरे अर्पण केले

नंतर त्या रायानेहि श्री विद्यारण्य श्रीपादाना मोत्याच्या आसनावर बसवूत, त्याचे यथाविधि पूजापुनस्कारादि योग्य आतिथ्य करून आपली बिरुदावलि श्रीपादानाहि चालावी म्हणून त्यांनाहि मोत्याचे किरीट, मोत्याचे पीठासन,सुवर्णाच्या पादुका वगैरे अर्पण केले त्यानतर विद्यारण्यानी आपण व्यासाकडून मिळविलेल्या घटिका सिद्धीचा प्रयोग करून, विजयनगरावर पावणे चार घटिका सोन्याचा पाऊस पाडला. तेव्हा तेथे लोकांच्या घरादारावर पडडेले सोने त्या त्या घरमालकास देऊन, इतरत्र पडलेले सोने गोळा करवून, ते राजभाडारात आणून ओतविले रायाना 'श्रीमद्राजाधिराज, 'राजपरमेश्वर' 'अप्रतिम प्रताप वीर नरपति' ही बिरुदावलि अर्पण करून', 'विरुपाक्ष' ही अक्षरे कोरलेली आगटी नजर केली

हें झाल्यावर शृंगेरी येथील श्रीविद्याशकर, व श्रीशारदाचंद्र मौळीश्वर स्वामीच्या सेवेसाठीं व छत्रधर्मासाठी अग्रहार इनाम करवून दिले त्याबरोबरच ब्राम्हणाना व अग्रहाराला तीस हजार वराई स्वास्थ्य नेमून दिले तेथे शालिवाहन शके १२६३ च्या विक्रम सवत्सरात श्री विद्याशकर देवालय निर्माण जक्कणाचार्य याच्या मुलाकडून शृंगेरी, बेल्लूर व हळेबीडु या तीन स्थळीं देवालये निर्माण करविण्यात आलीं

'विजयनगरवृत्तांत'

*(Fu1 the1 Sou1 ces of V1jayanagar H1story P 13–14)*



## प्रकरण ८ वे

### कर्नाटक-भाग्यविधाता-राजगुरु व महामन्त्री

# श्रीमन्माधवाचार्य

इन्द्रस्याङ्गिरसो बलस्य सुमति शैब्यस्य मेधातिथि ।
धौम्यो धर्मसुतस्य वैन्यनृपते स्वौजा निमेर्गौतमि ॥
प्रत्यग्दृष्टिररुन्धतीसहचरो रामस्य पुण्यात्मनो ।
यद्वत्तस्य विभोरभूत् कुलगुरुर्मन्त्री तथा माधव ।

—पराशरमाधव, उपक्रमणिका ४)

देवराजा इद्राचा जसा बृहस्पति, शैब्याचा जसा मेधातिथि, युधिष्ठ-राचा जसा धौम्य, निमीचा जसा शतानद, रामाचा जसा अरुन्धतीसहचर वसिष्ठ, तद्वत् हरिहरभूपालाचा माधवाचार्य हा कुलगुरु व महामत्री होय

क्षत्रियाचे महत्व व श्रेष्ठत्व युद्धकलेत हमखास आहे, ही गोष्ट नाकारता येणार नाही तो हातात तलवार घेऊन रणात दृढ थोपटून उभा ठाकला म्हणजे कर्दन काळाचे रूप घेऊन मोठा पराक्रम गाजवील, शौर्याने लढेल, धैर्याने शत्रूशी टक्कर देईल आणि अखेर आपलें युद्धकौशल्य पणास लावून, शेवटी विजयश्रीने विभूषित होऊन परत येईल, यात तिळप्राय सदेह नाहीं युद्धकलेंत व पराक्रमांत तो जरी श्रेष्ठ ठरला आणि असला, तरी राजकारण त्याला तितक्याच प्रमाणात साधेल, असे म्हणणे मात्र जरा धाडसाचें व अतिशयोक्तीचें होईल राजकारण कसे रगवावे व मुत्सद्दिगिरी कशी लढवावी, या बाबतीत त्याची मति अधु आहे आणि चाणाक्ष मुत्सद्दीगिरीशिवाय राजकारण रगत व खुलत नाहीं, हें उघड सागावयास नकोच

पण ते काम क्षत्रियाचे नसून, ब्राम्हणाचे आहे राजकारण कसे उबवावे, कसे खुलवावे, कसे रगवावे आणि मुत्सद्दीगिरी कशी लढवावी नि प्रभावी करावी, हे काम निदान या भारत भूमींत तरी प्राचीन कालापासून–वेदकालापासून–ब्राम्हणानीच अत्यत यशस्वीपणें हाताळलें आहे, ही गोष्ट इतिहासज्ञास नव्यानेच सागावी, अशातला काही भाग नाहीं मध्ययुगीन इतिहासहि हीच साक्ष देतो अर्वाचीन इतिहासात विरोध दिसत नाही

आणि त्याचा प्रत्यक्ष पुरावाच पाहिजे असल्यास या वीसाव्या शतकातल्या इतिहासाकडे बारकाईने व नीट चौकसबुद्धीने नजर देऊन पहा एवढे प्रबल ब्रिटीश राष्ट्र ! त्याला येथून चबूगवाळे घेऊन मायदेशी परत लावून देण्याच्या चळवळींत प्रारंभापासून शेवटपर्यंत प्रामुख्याने कोणाचा हात होता व प्रारभीच्या प्रखर प्रसूतवेदना कोणी सहन केल्या, याची एकंदर मोजदाद केल्यास त्याचे उत्तर काय येईल, हे उघड बोलून दाखविणेची जरूरी नाही ते सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे ! हे प्रौढी म्हणून नव्हे, तर इतिहास म्हणून सागितले, तर त्यात चूक ती काय झालीं ? असो

आता आपण विजयनगरकडे वळूं तेथें राजगुरु माधवाचार्यांनी राजकारण कसे उबविले व कसे रगविले आणि त्याची परिणति पुढे अल्पच-काळांत साम्राज्यात कशी झाली, हे पाहणे मनोरजक असल्यामुळे ते आता आस्ते आस्ते सागत जातो विजयनगरचे ते पहिले महाप्रधान होत, हे प्रथमच सागून टाकणे बरे काय असेल ते असो, हरिहराचा या माधवा-चार्यांवर इतका विश्वास, इतकी निष्ठा, इतकी भक्ति बसली होती कीं त्यांना विचारल्याशिवाय तो इकडली काडी इकडे करीत नसे ! काही जरी करावयाचें झालें तरी त्याना तें विचारूनच तो करी त्या दोघाची प्रथम भेट झाली, तेव्हापासूनचा त्याचा हा क्रम चालू होता जणु वसिष्ठ-रामाचा अवतारच !

माधवाचार्यांचेहि हरिहरावर तितकेंच प्रेम नि तितकाच ळळा होता त्याचा संबध आईमुलासारखा होता, इतकें सागितलें म्हणजे अधिक



विरुपाक्ष मंदिर- विजयनगर (हंपी)

लागण्याची जरूरी नांहीं हिंदु धर्मांत ब्राम्हण-क्षत्रियाचा संबंध म्हणजे तो मायलेकाचा संबंध ! 'ब्रम्हणो हि क्षत्र जायते' असे योगीश्वर याज्ञवाक्यानी शतपथात म्हटले असून, त्याचा भावार्थ असा की तेजस्वी ब्राम्हण हा शूर व पराक्रमी क्षत्रिय निर्माण करतो म्हणून ब्राम्हण हा क्षत्रियाच्या मातृस्थानी असून,तेजस्वी क्षत्रियवीर निर्माण करण्याची ती तेजस्वी मायकूस आहे ! आणि जी माता आहे, ती गुरुस्थानी आहे म्हणून 'न मातुःसमो गुरु ' असे म्हटले असून,त्या दृष्टीने ब्राम्हण हा क्षत्रियाचा मातृस्थानभूत गुरु आहे. अशी ही परंपरा भारतात उदंड व अखंड चालत आली आहे. हा इतिहासाचा दाखला कोणालाहि खोडून काढता येणे शक्य नाही ! असो

विजयनगरची स्थापना झाली व हरिहर तेथील भूपाल झाला आतां पुढील मार्ग कसा आखावा, याविषयी त्या दोघात रात्रंदिवस वाटाघाटी चालूं लागल्या प्रथम विजयनरची सत्ता कशी बळकट होईल व बळ कसे वाढेल, याचा सतत खल व त्या दिशेने प्रयत्न चालू झाले

यासुमारास दक्षिणेत नाव घेण्यासारखी हिंदूची स्वतंत्र सत्ता असलेली अशी एकहि राजवट नव्हती जे काय थोडे राजे म्हणवीत होते, ते सर्व बादशाही सत्तेचे दास-मांडलीक-म्हणवीत होते देशात सगळा इस्लामी सत्तेचा नंगा नाच चालला होता देश सगळा गांजला व लुबाडला गेला व जात होता वित्ताची व जीविताची शाश्वति राहिली नव्हती लोक आतून फार चिडले व संतापले होते

माधवाचार्यांनी हें सर्व जाणले व त्याचा फायदा घेणेचा डाव घातला देशातील कित्येक सैनिक हिंदुराज्य नष्ट झाल्यामुळे बेकार होऊन इतस्ततः भटकत होते त्या सर्वांना विजयनगरात आश्रय देऊन, त्याची आपल्या नवीन सैन्यात भरती करण्याचा सपाटा चालविला बाहेर विश्वासूक हेर पाठवून, देशातील राजकीय परिस्थितीचा कानोसा घेतला वारंगळ, आनेगोंदी, देवगिरी, पांड्य, चोल वगैरे देशातील पदभ्रष्ट झालेले सरदार, सुभेदार, जहागिरदार व इतर वजनदार लोकांशी दूताकरवी संधान बांधून, त्यांना आपल्याकडे ओढून घेण्याचा उपक्रम चालविला

हिंदूंनी संघट्टण करून एक झाल्याशिवाय देशाचा व धर्माचा तरणोपाय नाही, ही गोष्ट त्याना पटवून देऊन, आपापसातील तेढ, द्वेष, मत्सर चुरस इत्यादि टाकून, हिंदुधर्माच्या रक्षणार्थ व हिंदूसमाजाच्या उद्धारार्थ एक होण्याचा महामृत्युजय मत्र त्याच्या कानात फुंकण्यात आला !

येथे ही गोष्ट सांगितली पाहिजे की, या कामी श्रृंगेरी पीठाचे अधीश्वर श्री विद्यातीर्थ व भारतीतीर्थ स्वामी याची हरिहरास फार मोठी मदत झाली त्याचे वजन दक्षिणेतील देशावर फार मोठे होते, त्याचा त्याला फार उपयोग झाला माधवाचार्यामार्फत श्रीस्वामी वेळोवेळा हरिहरास योग्य मार्गदर्शन करीत कारण तो प्रसगच तसा आणीबाणीचा व मोठा नाजूक होता धर्मावर फार मोठे सकट गुदरले होते. तो जगतो कीं नाही, याची भ्रात पडत चालली होती त्यावेळी हरिहराला हाताशी धरून, त्याला पीठाकडून लागेल ती मदत देण्याचे आश्वासन देण्यात आले आणि पीठाची सपत्तीहि प्रसगविशेषीं त्याच्या मागे उभी करण्यात आली यामुळे हरिहरास चोहोकडून सहानुभूति मिळत जाऊन, त्याचा मार्ग दिवसेदिवस सरळ व सुलभ होत चालला याचा परिणाम असा झाला कीं उदयोन्मुख विजयनगरला प्रचड बलशाली सत्ताधीश बनण्यास पीठाचा पाठिंबा अत्यत उपकारक ठरला मात्र या सर्व गोष्टी गुप्त रीतीनेच चालल्या होत्या. माधवाचार्य हें या दोहोमधला दुव्वा होते, हें निराळे सांगण्याची अवश्यकता नाही

कर्नाटक सिंहासन स्थापणेचा आद्य मान माधवाचार्यांना मिळाल्या- मुळें लोक त्याना 'कर्नाटक-सिंहासन-स्थापनाचार्य' या बहुमानाने गौरवूं लागले शिवाय हरिहरराजाचे कुलगुरूचा मानहि त्याच्याच पदरात पडला आणि विजयनगरच्या महाप्रधानकीची महावस्त्रेहि त्याच्याच अगावर चढलीं !! या प्रमाणे माधवाचार्य हे कर्नाटक सिंहासन-स्थापनाचार्य, राजगुरु व विजयनरचे महाप्रधान या नात्याने जगात मिरवूं लागले !

---

प्रकरण ९ वे

# विजयनगरचा राजा हरिहर

पपातीरनिवास श्री विरुपाक्षप्रसादत. ।
तपोबलेन लोकानामनुग्रहविधित्सया ॥
निर्माय विद्यानगर नृपं हरिहराभिधम् ।
गोदेवद्विजरक्षणार्थमभ्यार्षिचन्नृपासने ॥

—(एपि इं खंड ६ शृंगेरी ११ पृ ३६२)

विजयनगरचे पूर्वीचे नाव विद्यानगर असें असून, ते विद्यारण्याच्या सस्मरणार्थ ठेवण्यात आलें होते तेच पुढे इतिहासात विजयनगर म्हणून प्रसिद्धीस आले या नगरची स्थापना विद्यारण्यानी केली विद्यारण्य हें माधवाचार्यांचेंच पण आश्रमातराचे नाव आहे याविषयी स्पष्ट उल्लेख यापुढील वचनात आढळतो, तो असाः—

'विद्याभिधाननगरी विजयोन्नतशालिनी ।
विद्यारण्यकृता तस्यां रत्नसिंहासनेस्थित ॥

(एपि कर्नाटिका, खड १० वा, मुळबागल १५८, पृ १३५)

विद्यारण्यानी स्थापन केलेल्या शहराचे मूळ नाव विद्यानगर हेच होतें, हें वर मथळ्यावर दिलेल्या श्लोकावरून स्पष्ट होते हरिहराच्या वेळी 'विद्यानगर' हेंच नाव रूढ असून 'विजयनगर' हें नाव प्रसिद्ध नव्हतें पुढें बुक्काच्याकाळीं विजयनगर हे नाव सर्वत्र व सर्रास रूढीत आलें बुक्काच्या आमदानीत दक्षिणेंत पाड्यचोळ यांवर–विशेषत मदुरेची सुलतानशाही लढून नष्ट करून तुरुष्कावर–दणदणीत विजय मिळविल्यावर या विजयाच्या सस्मरणार्थ म्हणून 'विजयनगर' हें नाव व्यवहारात पूर्णतया

रूढ करण्यात आले शिवाय त्याला आणखीहि दुसरी अनेक नावे होतीं शिलालेखातून व शासनपत्रातून त्या शहरचीं निरनिराळी नावे उल्लेखण्यात आली आहेत, ती अशीं — १ विद्यानगर, २ विजयनगर, ३ कुजरकोण, ४ हस्तिनावती, ५ होसपट्टण, ६ विरूपाक्षपट्टण, ७ हपी व ८ आनेगोदी, हीं अशीं आठ नावे त्या शहराला निरनिराळ्या ठिकाणी व निरनिराळ्या प्रसगीं लावण्यात आलीं आहेत तथापि 'विजयनगर' हेच नाव इतिहासात प्रामुख्याने उपयोगात आणले आहे असो

(म्हैसूर ग्याझेटीर, खंड २, भाग ३, प्रकरण ११, पृ १४१५)

विजयनगरची स्थापना होऊन हरिहर तेथे येऊन राहिल्यावर पुढें काय प्रकार झाला, हे आता पाहू आनेगोदीचे राज्य नष्ट होऊन नुकतीच कोठे दोनतीन वर्षे झालीं होतीं राजघराणे गेले होते हे खरे, पण तेथील लोकाचे स्वातत्र्य प्रेम कांही अजून सपशेल थिजले नव्हते तेथे आता सुलतानाचा मलिक नभी हा सुभेदार असून, तो मोठा दुष्ट व जुलमी अम्मलदार होता त्याच्या या पाशवी व जुलमीवृत्तीमुळे व राक्षसी अमलामुळे लोक तेवढ्याच अवधीत भयकर गाजले जाऊन, अत्यत चिडून गेले होते

याचा फायदा धूर्त माधवाचार्यांनी घेऊन, त्याच्यात नवचैतन्य फुंकले व राज्यांत बडाचा बावटा उभारण्यास प्रोत्साहन देऊन लवकरच आनेगोंदी राज्यांत बंडाचा भडका उठविला यात वरगळचा कृष्णदेवराय यांचे बरेंच अंग होते हा बडाचा वणवा एवढा भडकला की, तो भडका पाहून सुभेदार फार घाबरला व तेथून जीव घेऊन, त्याने सरळ दिल्लीची वाट धरली !

दिल्लीस जाऊन पोचल्यावर बादशाहाला सगळा वृत्तात सागितला पण बादशहाला सैन्य घेऊन दक्षिणेत उतरण्याचें-का कोणास ठाऊक-मनात भरलें नाहीं म्हणून त्याने आनेगोदीचा माजी दिवाण जो हरियप्पा वडेयर, त्याकडेच त्या राज्याचें अधिपत्य देऊन, आनेगोदीचा मुलूख त्याच्या स्वाधीन

केला विजयनगरात आल्यावर हरिहराचा हा पहिला शुभ शकुनच होय

विजयनगर राज्याची स्थापना झाल्यावर त्याला लवकरच अंकुर फुटत चालले प्रथम कर्नाटकातील कलादगी पर्यंतचा मुलुख पहिल्या सपाट्यासरशी त्याच्या ताब्यात आला आणि तो सुरक्षित राखण्यासाठीं बादामीचा किल्ला बांधण्यात येऊन, तेथे विजयनगरच्या एका प्रबल सरदाराची नेमणूक करण्यात आली ही गोष्ट इ स १३४० च्या सुमारास घडली, असा इतिहासात उल्लेख सापडतो

—(एपि इंडिका, खंड १०, ६३)

याच सुमारास म्हणजे इ स १३३८ साली हरिहराने दक्षिण कानडा प्रांतावर स्वारी करून, आपल्या प्रतापाचे लोण थेट पश्चिम समुद्रा-पर्यंत पोंचाविले । पुढे इ स १३४२ साली होनावरच्या जलालुद्दीन नावाच्या सुभेदाराने हरिहराचे वाढत प्राबल्य पाहून, विशेष चुळबुळ न करता मुकाट्याने त्याचे मांडलिकत्व पत्करले यामुळे दक्षिण कानडाचा मंगळूर पर्यंतचा कोकण भागहि त्याच्या अमलाखालीं आला ही मर्दुमकी हरिहराच्या धाकट्या भावाने म्हणजे मारप्पा वडेयर याने गाजविली

त्यानंतर हरिहराची दृष्टि वरंगळवर वळली तो मोठें सैन्य घेऊन वरंगळवर झडप घालून, तेथील बादशहाचा सुभेदार इम्मद्-उल्-मुल्क याचा पराभव करून, त्यास तेथून पिटाळून लावले व तो महत्वाचा प्रांत विजयनगरास जोडण्यात आला

याप्रमाणे विजयनगरचा अंकुर चांगली मुळीधरून हळु हळू वाढीस लागला असता, द्वारसमुद्राच्या वीर बल्लाळ देव मोठे सैन्य घेऊन, दक्षिणेत मदुरेच्या तुर्कांवर चाल करून गेला कृष्णेच्या खाली सबंध प्रदेशात तेवढा एकच इस्लामी सुभेदार आता तळ धरून सत्ता गाजवीत बसला होता त्याची तेवढी उचल बांगडी झाल्यास तो सगळा दक्षिणेकडचा देश पुनः सलग हिंदूचा होण्यास फारशी अडचणी नव्हती हा हेतु साधाण्यासाठी म्हणून एक लाख सैन्य बरोबर घेऊन, तो मदुरेवर चाल करून गेला

त्याची व मदुरेच्या ग्यासुद्दीन सुभेदाराची त्रिचिनापल्ली येथे गाठ पडली सुभेदारहि आपले कडवे तुर्की सैन्य घेऊन मोठ्या तयारीने सामोरा आला अर्थात् दोघांमध्ये फार मोठे रणकंदन माजले हिंदू सैन्य त्यावेळी बराच जोम धरून तुर्कांशी लढत होतें लढाईच्या ऐन भरात दुर्दैवाने वीरबल्लाळ हा अकस्मात् शत्रूच्या तावडींत सापडला व तुर्कांनी त्यास घेरले व त्या चकमकींत वीरबल्लाळाचा अखेर बळी घेण्यात आला ! हिंदूचा पराभव झाला व विजयश्री इस्लामला जाऊन मिळाली ! ही गोष्ट इ स १३४२ साली घडून आली त्यानतर त्याचा मुलगा वीरबल्लाळ चौथा हा गादीवर आला पण तोहि लवकरच एका लढाईत गारद झाला आणि होयसाळ वंशाची येथे परिसमाप्ति झाली

याप्रमाणे राजवंश नष्ट झाल्यामुळे द्वारसमुद्राची गादी उघडी पडली त्यावेळीं तेथील काही प्रसंगसाधु व महत्वाकांक्षी लोकानी ती गादी बळकावण्याचा प्रयत्न करून, राज्यांत गोधळ माजविला पण माधवाचार्य व विद्यातीर्थ याच्या खटपटीने अखेर तो मान हरिहरासच मिळाला ! द्वारसमुद्र येथे हरिहराचा मधला भाऊ वीर प्रताप बुक्क वडेयर हा तेथें सुभेदारीवर असून, त्याने आपल्या पराक्रमाने बडखोरांची चागलीच हजेरी घेतली

पण ही गोष्ट काही सुखासुखी झाली नाहीं हरिहराला बंडखोराशी थोडे झगडावे लागले तथापि प्रातामागून प्रात त्याच्या हस्तगत होत चालले. इ स १३४३ सालीं कोलार प्रात हस्तगत झाला इ स १३४४ सालीं अनतपूर व म्हैसूर, इ स १३४५ सालीं चित्रदुर्ग, इ स १३४६ सालीं कडूर, याप्रमाणें एकामागून एकेक प्रात थोड्या-बहुत सघर्षणाने विजयनगर राज्यास जोडण्यात आले यासर्व चकमकीत बुक्काची मर्दुमकी विशेष गाजली शिमोगा हा प्रात मूळचा हरिहराचाच होता याप्रमाणें विजयनगर राज्याला दिवसे दिवस बाळसेदार रूप येत जाऊन, त्याचा बोलबाला सर्वत्र वाढत चालला

## प्रकरण १० वें ।

# दिल्लीचा पराभव व शृंगेरीचे दर्शन

यत्पाद   परराजरत्नमुकुटीसघातजांघाळिको ।
यत्पाणिर्नवपारिजातसुषमापांडित्यवैतडिक ॥
यन्मूर्ति   करुणापयोदधिलहरीमाधुर्यसूर्योदय ।
तस्मै हरिहरभूपते रणविदे तिष्ठत क पार्थिव ॥

- अकुमल शिलालेख

वरंगळचा गव्हर्नर इमद-उल-मुलुक याचा पराभ करून, त्याच काही प्रात विजयनगरात समाविष्ट करून घेतल्यावर, सदर इम्मद-उल-मुलुक हा हरिहराच्या धास्तीने वारंगळ सोडून, वर दौलताबाद येथें निघून गेला व तेथून त्याने दिल्लीसुलतानास हरिहरच्या दांडगाईची, पुंडाईची व व चळवळीची माहिती कलविळी

विजयनगरचा हरिहरराय हा दक्षिणेतील बादशाही मुलुखात फंद-फितूरी व बंडबखेडे माजवून विजयनगर येथे नवीन हिंदुराज्य स्थापन करण्याचा उपद्व्यापक करीत आहे, ही बातमी दिल्लीस जाऊन थडकली, तेव्हा हरिहराची आता गय करून उपयोगी नाहीं असा विचार करून, खुद बादशहा महमद तवलख हा मोठी फौज घेऊन दक्षिणेत उतरून, विजयनगरवर चाल करून आला

याचा वास हरिहरास दूताकरवीं लागताच तातडीने तयारी करून बादशहास धैर्याने व नेटाने सामना देण्यास त्यानेहि दंड थोपटले दोघांची इ स १३४४ साली एकत्र गाठ पडून, कठोर संग्राम माजला. याखेपेस हिंदुसैन्य मोठ्या निकरानें व धैर्यानें लढून, बादशहाच्या तुर्की सैन्यास तलवारीचे पाणी चांगलेच पाजले ! हिंदूची सरशी झाली ! विरुपाक्ष

देवाने हरिहराची बाजू उचलून धरली आणि विजयश्री प्रसन्न होऊन, हरिहराच्या गळ्यात तिने यशश्रीची माळ घातली !! दिल्लीचा मोड होऊन, बादशहा सैन्य घेऊन मागे फिरला !! तेव्हापासून त्याने विजयनगरचे नाव काढण्याचे सोडून दिले !! हरिहर वडेयरचा हा सर्वांत मोठा विजय होय !!!

—(एपि इंडिका, ख ३, २४)

या प्रसगावरचा हा खालील श्लोक मननीय आहे दिल्लीश्वराचा पराभव झाला, हें दाखविण्यासाठीच तो रचण्यात आला आहे तो श्लोक हा असा.—

'तत्र राजा हरिहरो धरणीमशिषच्चिरम् ।
सुत्रामसदृशो येन सुरत्राण पराजित ॥

येथे सुरत्राण म्हणजे दिल्लीचा बादशहा असा अर्थ विविक्षित आहे असो

या विजयाचा परिणाम हिंदुजनमनावर एवढा प्रभावी झाला कीं, त्यांच्यातील मुसलमानाच्या भीतीचा धाक सगळा आता सपशेल झडून जाऊन, तेथे आत्मविश्वासाचे व आत्मसामर्थ्याचे नवचैतन्य तेजाळू लागले! तशात द्वारसमुद्राची गादीहि हरिहराच्या पदरांत येऊन पडली आणि सर्वत्र आनदी आनंद झाला ! आणि माधवाचार्यांनी या सर्व विजयोत्सवा-निमित्त विजयनगर येथें हरिहर वडेयर—आता पर्यंत तो महामडलेश्वरच म्हणवीत होता—यास मोठ्या थाटानें व वैभवाने राज्याभिषेक केला व तेव्हापासून तो विजयनगरचा पहिला स्वतत्र राजा झाला ! या ऐतिहासिक मगल गोष्टीच्या सस्मरणार्थ म्हणून वरील मथळ्याचा श्लोक रचण्यात आला

आपणास एवढ्या मोठ्या वैभवास चढविण्यास ज्या थोर महाभागाची-श्रीमज्जगद्गुरु शकराचार्यांची-सर्वतोपरी मदत व मार्गदर्शन झालें होतें, त्या गुरुदेवाचें उपकार स्मरून, विजयनगर येथें राज्याभिषेक झाल्यावर आपल्या सर्व भावास व नातलगास बरोबर घेऊन, मोठ्या वैभवाने व दरबारी थाटानें हरिहर राजा श्री शकराचार्यांच्या दर्शनास श्रृंगेरीस् गेला त्यावेळीं

तेथे भारतीतीर्थ स्वामी होते सर्व भावानी मिळून स्वामिजींचे दर्शन घेऊन, त्यांचे यथाविधि व यथासांग पाद्यपूजन केले त्यावेळी त्यांनी पीठास मोठी दक्षिणा देऊन, शिवाय वर मोठी जहागीर इनाम घालून दिली

याबद्दल शृंगेरी मठातील एक शासनपत्र आहे, त्यात हा दानपत्राचा मजकूर आढळतो तो कानडीत असून, आम्ही तो जशाचा तसा येथे उद्धृत करतो

'ಸ್ವಸ್ತಿ ಶ್ರೀ ಜಯಾಭ್ಯುದಯ ಶಕ ವರುಷ ೧೨೬೮ (इ स १३४६) ನೇಯ ಪಾರ್ಥಿವ ಸಂವತ್ಸರದ ಫಾಲ್ಗುನ ಬ॥ ೧ ಗುರುವಾರದಂದು ಸ್ವಸ್ತಿ ಶ್ರೀಮಾನ್ ಮಹಾಮಂಡಲೇಶ್ವರಂ ಅರಿರಾಯ ವಿಭಾಡ ಭಾಷೆಗೆ ತಪ್ಪುವ ರಾಯರ ಗಂಡ ಶ್ರೀ ವೀರಹರಿಯಪ್ಪ ವಡೆಯರು, ಕಂಪಣ್ಣವಡೆಯರು, ಬುಕ್ಕಣ್ಣವಡೆಯರು, ಮಾರಪ್ಪ ವಡಯರು ಮುದ್ದಪ್ಪ ವಡೆಯರು ಅಳಿಯ ಬಲ್ಲಪ್ಪ ದಣ್ಣಾಯಕರು ಕುಮಾರ ಸೋವಣ್ಣ ವಡೆಯರು ಮುಖ್ಯ ಈ ಹೊಳಗಾಡುವರು ಭಾರತೀತೀರ್ಥ ಶ್ರೀಪಾದಂಗಳು ಅವರ ಶಿಷ್ಯಾದಿಗಳು ಆ ಶೃಂಗೇರಿಯ ತೀರ್ಥವಾಸದಲು ಅನುಷ್ಠಾನವ ಮಾಡಿಕೊಂಡಿಹದಕ್ಕೆ ಆ ಪರಿಚಾರಿಕರಾಗಿ ಮಾಡುವ ಬ್ರಾಹ್ಮರು ನಾಲ್ವತ್ತಕ್ಕೆ ಕೊಟ್ಟ ಶಿಲಾಶಾಸನದ ಕ್ರಮ. ಎಂತ ಎಂದಡೆ
ಮಂಗಳ ಮಹಾ ಶ್ರೀ॥ ಈ ಶಾಸನ ಬರದವನು ಚಿನ್ನಮಲ್ಲೋಜನ ಮಗನು ಲಿಂಗೋಜನು '

मराठी भावार्थ — 'स्वस्ति श्री जयाभ्युदयशके वर्ष १२६८, पार्थिव संवत्सर, फाल्गुन वद्य प्रतिपदा, गुरुवार, यादिवशीं स्वस्ति श्रीमान् महामंडलेश्वर, शत्रूचा कर्दन काळ, वचनभ्रष्टाचा शासनकर्ता, श्री वीर हरियप्प वडेयर, कपण्णवडेयर, बुक्कण्ण वडेयर, मारप्प वडेयर, मुद्दप्प वडेयर, जामात बल्लप्प दंडनायक, कुमार सोमण्ण वडेयर यांनी मुख्य भारतीतीर्थ श्रीपाद व त्यांचे शिष्य शृंगेरीतीर्थात वासकरून अनुष्ठानार्थ सेवेस राहिलेले ब्राम्हण ४८ यास दिलेल्या दानाचा शिलाशासनाचा क्रम असा (पुढे दान दिलेल्या ग्रामाची नावे व वर्णन आहे )

'यस्य यस्य यदा भूमि॰ तस्य तस्य तदा फलम् ।
तस्याह करलग्नोस्मि मया दत्त प्रपालय ॥'

मंगळ महा॥ श्री हें शासन लिहणारा चिन्नमल्लोजाचा मुलगा लिंगोजी

(एपि कर्नाटिका, खड ६ शृंगेरी १, पृष्ठ १९०)

हें जे दान दिले तें विजयोत्सव सस्मरणार्थ म्हणून देण्यात आलें 'विजयोत्सवं स्थापयितु अकरोत् धर्ममुत्तमम्' असें म्हटलें आहे यावरून हरिहराची कृतज्ञता, धार्मिक भावना, व दानप्रवृत्ति हीं चागली उघडकीस येतात

या राज्याभिषेकाचा व विजयोत्सवाचा परिणाम असा झाला कीं दक्षिणेंत हरिहर राजाचें वर्चस्व व दरारा सारखा वाढत व जोरावत चालला यावेळीं वियनगरच्या स्वतंत्र राज्यात मलप्रभेखालचा मुलुख, आनेगोंदी, वारंगळ, द्वारसमुद्र, शिमोगा, दक्षिणकानरा व मलबार यासर्वांचा समावेश झाला होता विजयनगर येथे राजवाड्यावर व तटबंदीच्या बुरुजावर हिंदूंचा वराहचिन्हांकित नयनाह्लादकारक राष्ट्रीय ध्वज उच्च आकाशात मोठ्या तोऱ्यानें हवेंत फडफडूं लागला !!

हरिहर हा जसा प्रतापशाली होता, तसाच तो मोठा धार्मिक व देवभक्तहि होता देवब्राम्हणावर त्याची अपरपार श्रद्धा व भक्ति होती हंपीचा विरुपाक्ष हें त्याचें कुलदैवत असून, त्याचे जुनें झालेलें देवालय नवीन पायावर व नवीन धर्तीवर मोठे भव्य व प्रेक्षणीय बाधण्याचे काम खर्चाकडे न पाहता मोठ्या उत्साहानें व जारीनें सुरू केलें व त्या देवालयाला मोठी जहागीर इनाम घालून दिली

त्याचप्रमाणें राज्यातील अनेक विद्वान ब्राम्हणाना, कलावताना व गुणीजनाना उदार हातानें मोठमोठ्या देणग्या देऊन, विद्येला, व कलेला प्रोत्साहन दिलें व्यापार उद्योगाची अभिवृद्धि होण्यास म्हणून पुष्कळ सवलती दिल्या गुणीजनास आश्रय देऊन त्यांच्या गुणाचें चीज होईल असें केलें त्याचे तिघे भाऊ त्याच्या आज्ञेंत राहून विजयनगर साम्राज्यवाढीस एकनिष्ठेनें मदत केली हे तिघे भाऊहि मोठे शूर व पराक्रमी होते

त्याचा इतिहासहि पुढे यथाक्रम येणारच आहे.

शिलाशासनात व दानपत्रात हरिहराची बिरुदावळ आढळते, ती अशी — महामंडलेश्वर, चतु समुद्राधीश्वर, राजपरमेश्वर, वीरप्रताप, अरिरायविभाड, भाषेगे तप्पुव रायरगंड, श्रीवीर हरियप्प वडेयर, हरिहर महाराय इत्यादि (एपि कर्नाटिका, खंड ५, अरसिकेरी) असो विजयनगर दरबारचे राजचिन्ह वराह असून,राजमुद्रेवर व नाण्यावर त्याचा ठसा उमटविलेला असे त्याचें कुलदैवत हंपी येथील श्री विरुपाक्ष हे होतें व राजाची सही 'श्री विरुपाक्ष' अशी करण्यात येत होती

(म्हैसूर ग्याझीटर, खंड २, भाग ३ प्रकरण ११)



# प्रकरण ११ वे

## कम्पराज–महाप्रधान–सायणाचार्य

तस्यानुजश्चिरमशाद् धात्री कम्पणभूपति ।
याथार्थ्यमभजन्नाम यस्य कम्पितुद्विषाम् ॥

— बिट्रगुट लेख

मतिमांस्तस्य राज्ञोऽभूत् मन्त्री मायण सायण ।
यन्मन्त्रेण न सर्पन्ति नित्य शत्रुबिलेशया ॥

—सुभाषित-सुधानिधि

कम्प-भूपति हा सगमनरेशाचा दुसरा मुलगा म्हणजे राजा हरिहराचा तो धाकटा भाऊ हा कम्प झालातरी तो हरिहराप्रमाणेच शूर, धाडसी व धोरणी होता द्वारसमुद्राच्या वीर बल्लाळाने त्याचे शौर्यादि गुण पाहून,त्याची पूर्वे कडील प्रदेशावर नेमणूक केली होती उत्तरेकडून हरिहराने आपल्या ताब्यातील मुलुखांत ठिकठिकाणी शिबदी ठेऊन, कडेकोट बदोबस्त केल्यामुळें मुसलमानाना तिकडून खाली उतरून धुडगूस घालण्यास तो मार्ग पूर्वी-प्रमाणें सोपा व सुरक्षित वाटेनासा झाला. म्हणून त्यानी तो नाद सोडून दिला, नव्हे सोडून देणे भागच पडले आता राहता राहिला एकच मार्ग व तो म्हणजे वरगळहून पूर्वेच्या रोखाने खाली उतरणे

मात्र तो मार्ग नेल्लूर प्रातातून उदयगिरीवरून जात असून तेथे उदयगिरीचा मोठा किल्ला होता किल्ल्याखालून खालीं उतरावें लागत असें आणि याच मार्गातून मुसलमान लोक खालीं उतरून, दक्षिणेंत हैदोस घालून, लूटमार करून, देश सगळा उध्वस्त करून परत जात असत

कम्पाची नेमणूक झाल्यावर त्याची दृष्टि या किल्ल्याकडे वळली त्याबाजूनें मुसलमानास रोखून धरावयाचे तर उदयगिरी किल्ला ताब्यात

घेणे अवश्य होते पण तो तेथील मन्मेय राजाच्या ताब्यात असल्यामुळे कम्पास मोठी अडचण पडली हा मन्मेय राजा स्वतंत्र राजा असून, त्याचे राज्य लहानच होते विजयनगरच्या या नव्या राज्यावर त्याची असावी तशी श्रद्धा व भक्ति नसून, त्याविषयी तो साशकच असे शिवाय मुसलमानाचे प्राबल्य व सामर्थ्य तो ओळखून असल्यामुळे त्याना अडविण्याचे व दुखविण्याचे सामर्थ्य व धैर्य त्याच्यात नव्हते

पण उदयगिरी किल्ला व त्यावरून दक्षिणेकडे जाणरा रस्ता त्याच्या हद्दीतून जात असल्यामुळे, तो भाग ताब्यात घेतल्याशिवाय त्या बाजूने मुसलमानाना रोखून धरणे व ठेवणें हें जवळ जवळ दुरापास्तच होते पण ही गोष्ट सुखासुखी होण्यासारखी नव्हती म्हणून मन्मेयराजाचा काटा काढून टाकल्याशिवाय विजयनगरला स्वास्थ्य व सुरक्षितपणा लाभणे जवळ जवळ अशक्य कोटीतीलच ती गोष्ट होती

ही गोष्ट कम्पराजाला पटून, त्याने मन्मेयराजावर स्वारी करून तो किल्ला हस्तगत करून घेणेचा घाट घातला व सधि साधून त्यावर झडप घालून मन्मेयाचा रणात पराभव करून, तो भाग जिंकून आपल्या ताब्यात घेतला या चकमकीत उदयगिरी किल्ला तर हस्तगत झालाच पण त्या बरोबरच नेल्लूर व कडपा हे दोन्ही महत्त्वाचे प्रातहि त्याच्या ताब्यात आले आणि विजयनगरची सीमा पूर्वेस समुद्रास जाऊन भिडली! कम्पराजाची ही फार मोठी कामगिरि होय

विजयनगर येथील माधवाचार्यांचा कारभार व कर्तबगारी, तसेंच त्याची विद्वत्ता व मुत्सद्दिगिरी पाहून कम्पराजा फार खुष झाला होता विजयनगरचा उदय व उत्कर्ष होण्याला या अष्टपैलू आचार्यदेवाची कर्तबगारीच मुख्यतः कारण झाली होती तेव्हां आपणाकडेहि तसाच एखादा कुशल मुत्सद्दी असावा, असे वाटणे हे सहजिकच होते म्हणून पुढें माधवाचार्यांची गाठ पडली, तेव्हां आपणास एक चागला सल्लागार मुत्सद्दी पाहून द्यावा, अशी त्याने त्यास सूचना केली

यावेळीं माधवाचार्यांचा धाकटा बधु सायण हा नुकताच विद्याध्ययन

संपवून घरीं आला होता त्याचीच शिफारस करुन, त्याचे नाव त्यांनी राजास सुचविले कम्पराजाने माधवाचार्यांच्या शिफारशीला मान देऊन, सायणास बोलावून घेऊन, त्यास प्रधानकीचीं वस्त्रें व हुद्दा दिला ही घटणा इ स. १३४६ सालीं घडून आली

(*Beginnings of Vijayanagar History P 98*)

सायणाचें वय यावेळीं जवळ जवळ तीस बत्तीस वर्षांचें असून, चेहऱ्यावर विद्वत्तेचे व तपस्येचे विलक्षण ब्रम्हवर्चस चमकत होतें तो वेदशास्त्रसपन्न असा अष्टपैलु पडित होता, इतकेंच नसून, प्रकृतीने वीर वृत्तीचा असा धाडसी तरुण होता माधवाचार्य हे जन्मत. सौम्य व सात्विक प्रकृतीचे असल्यामुळे मागे राहून 'गोष्टी सागेन युक्तिच्या चार' अशा स्वभावाचे होते पण सायणाचा जन्मस्वभाव काहीसा निराळा असून, त्याच्यात ब्रम्हतेज व क्षात्रतेज दोहोचाहि सुदर मिलाफ झाला होता, यात अतिशयोक्ति काहींच नाहीं

मंत्रीपदावर येतांच सायणाने प्रथम राज्यात दौरा काढून, तेथील परिस्थितीची बारकाईने पाहणी करून, प्रदेशाची नीट जाणीव करून घेतली. त्यांतल्या त्यात उदयगिरी किल्ल्यावर त्याचे लक्ष विशेष वेधलें त्याला कारणहि तसेंच विशेष होते तो किल्ला लष्करी दृष्टीनें अगदी मोक्याचा होता पण असावा तसा बळकट व मजबूत नव्हता तेथे तेथें पडझड व मोडतोड पुष्कळ झाली होती किल्ल्याचें सुदृढ व सरक्षणक्षम स्वरूप नष्ट झाले असून, ओसाड व भेसूर कळा आली होती

पण तो अगदी नाक्यावर असल्यामुळे तो चागला दुरुस्त करून बळकट ठेवणें हे लष्करी दृष्ट्या अत्यत महत्वाचे व म्हणून अगत्याचे होतें. म्हणून त्याने ती गोष्ट मनावर घेऊन, तेथील पडझड सगळी काढून व उत्तम डागडुगी करून, त्याला भक्कम, बळकट व बंदिस्त करून, निवडक सैन्याची तेथें मोठी छावणी ठेविली याचा परिणाम असा झाला कीं, शत्रूला खालीं उतरण्यास चागलाच पायबद्द बसला मत्रीपदावर आल्यावर सायणाची ही पहिलीच महत्वाची कामगिरी होय

प्रथम प्रथम शिरस्त्याप्रमाणे मुसलमानाच्या काही लुटारू टोळ्या दक्षिणेत घुसण्यासाठीं म्हणून तेथे आल्या नाही असे नाहीं पण उदयगिरीवर त्याना रोखून धरण्यात आले यावेळी सायण तेथे स्वत जातिनिशी हजर राहून, त्याना त्यानी परत पिटाळून लावले एकदोन वेळातर दोघाची चागलीच चकमक झडली पण किल्ल्याचा हिंदूना चागला आश्रय लाभल्यामुळे शत्रूचे काही चालेनासे झाले या उदयगिरीपासून उत्तरेस जवळच वारंगळ असून, तेथे या मुसलमानाचा मोठा तळ होता व तो अजून दिल्लीदरबारच्या अमलाखालीं होता

येथूनच मुसलमानाच्या टोळ्या लुटीच्या लोभाने उदयगिरी-मार्गावरून खालीं दक्षिणेत घुसत असत पण हा मार्ग आता रोखून धरण्यात येऊन, प्रसग विशेषी तलवारीचे पाणी पाजून शत्रूची दाणादाण करण्यात येई यामुळे सायणाची वीरांतहि गणना होऊ लागली

हरिहर व कम्प यानी उत्तरेच्या मुसलमानाना दक्षिणेत उतरण्याचा मार्ग रोखून धरून, दिल्लीच्या साम्राज्य सत्तेस एकाप्रकारे शहच दिला आहे, ही बातमी पुढे दिल्लीस जाऊन पोचली पण तेथील राजकीय व दरबारी वातावरण पूर्वीसारखे स्वच्छ व निरभ्र नव्हतें तेथील राजवाड्यातली व दरबारातली स्थिति जरा चमत्कारिक व गुतागुतीची अशी सूक्ष्म व नाजूक झाली होती

राजवाड्यात अत कलह व बाहेर दरबारात मत्सर, द्वेष व गुप्त कारस्थाने यानी तेथील सत्ता पोखरणीस लागली होती मधुनमधुन राज्यात इकडे तिकडे बंडाची वावटळे उठत व वायव्य प्राताकडून अचानक परचक्राचे हादरेहि बसत

याच सुमारास सिंध व बगाल मधील नबाबानी दिल्लीची सत्ता झुगारून देऊन, ते स्वतत्र झाले आणि दक्षिणेत मदुरेच्या जलालुद्दीन सुभेदारानीहि तोच मार्ग पत्करला यामुळे दिल्लीदरबाराची स्थिति फार नाजूक झाली या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, बादशहाला पूर्वी प्रमाणें दक्षिणेकडे लक्ष देणें व चालणे जमेनासे होऊन, तिकडील ओढ

दिवसे दिवस ओसरत चालली दरबारात हेवा-दावा, रूस-फूस, तूट-फूट चालल्यामुळे त्यांचेंहि लक्ष दक्षिणेतून उठले यासर्व प्रकारामुळे दिल्लीची दिरगाई उदयोन्मुख विजयनगर-साम्राज्याला आयतीच पथ्यावर पडली

हरिहराप्रमाणे कम्प हाहि मोठा प्रभावशाली राजा होता उत्तरेच्या बाजूवर हरिहर व पूर्वेस कम्पण वडेयर यानी मुसलमानास नीट रोखून धरण्यात चागलेच यश मिळविले हा काळ विजयनगरच्या उत्कर्षास व विकासास फारच उपयुक्त व उपकारक ठरला हरिहर व कम्प या दोघाभावा-भावांत विलक्षण प्रेम असून, कोणतेहि महत्वाचे पाऊल टाकताना परस्पर विचारविनिमय व सल्लामसलत करून व घेऊन, मग ते पुढील पाऊल टाकीत असत त्याचप्रमाणें माधवाचार्य व सायणाचार्य याच्यातहि परस्पर सहकार्याची व मदतीची देवघेव चालत होती

हरिहराच्या ताब्यात आता फार मोठा मुलुख होता त्या मानाने कम्पाचे राज्य बेताचेच होते तरी आसपासच्या शेजारच्या मुलुखात संधिसाधून हातपाय पसरण्याचा क्रम चालू ठेवून, आपल्या राज्यालाहि गोडस व बाळसेदार स्वरूप देण्यास कम्पराजाने काही कमी केले नव्हते या कम्पराजाच्या हाताखाली जो मुलुख होता, त्याला 'उदयगिरी महाराज्य' या नावाने ओळखले जात होते

सायणाचार्य मंत्रीपदावर आरूढ झाल्यापासून कम्पाच्या राज्याची घडी नीट व्यवस्थित बसत जाऊन, त्याला बाळसेदार स्वरूप येत चालले त्यांना तसे म्हणजे राजकारणाचा प्रत्यक्ष अनुभव म्हणण्यासारखा नव्हता, ही गोष्टी खरी पण जो वेदविद्येत निष्णात व भारतादि इतिहासपुराणग्रथांत चांगला पारंगत आहे, त्याला राजकारणचे निराळे धडे देण्याची गरज नाहीं वेदात व महाभारतात राज्यशास्त्र खच्चून भरलेले आहे त्यासाठी निराळ्या अध्ययनाची जरूरी नाही

वेदात देवासुराच्या ज्या कथागोष्टी आहेत व भारतात कौरव-पाडवाचा जो इतिहास आहे, त्यात राज्यशास्त्र व युद्धनीति भरपूर आहे वेदात आर्यांनी असुराना व दस्यूना हाणून पाडण्याकरता निरनिराळ्या प्रसगी

कसकसे डावपेच टाकले व काय काय युक्त्या योजिल्या या विषयीच्या अनेक कथा व आख्यायिका आहेत आणि भारत रामायण ग्रंथ तर युद्धनीति व राज्यशास्त्र यानी पूर्ण ओथबलेले आहेत ज्यानी या तेजस्वी महाग्रथाचा सूक्ष्म व खोल अभ्यास केला आहे, त्याना राजकारणाचे आणखी नवीन नवीन निराळे धडे घेण्याचे कारण नाही याला महाराष्ट्रपदपादशाही स्थापणाऱ्या शिवारायाची प्रत्यक्ष साक्ष आहे!

तसे पाहू गेल्यास वसिष्ठास कोठे राजकारणाचे असे प्रत्यक्ष शिक्षण मिळाले होते? तरी त्यानी दाशराज्ञ युद्धात पुढाकार घेऊन सुदास राजास दहा राजाविरुद्ध सणसणीत जय मिळवून दिलाच की नाही? भरद्वाज ऋषीनेहि अभ्यावर्तिन चायमान व सृंजयपुत्र प्रस्तोक यास मदत करून, त्याच्या शत्रूस अखेर धूळ चारलीच की नाही? कौरवपाडवाचा इतिहास म्हणजे राजकारणाचे प्रत्यक्ष बाळकडूच आहे! प्राचीन भारतीय विद्या आहेच तशी अष्टपैलू व प्रभावशाली!

माधवाचार्य काय अथवा सायणाचार्य काय, हे वेदविद्येत व इतिहास पुराणात चागले कसलेले विद्वान पडित असल्यामुळे राजकारणाच्या आखाड्यात उतरून तेथेहि त्यानी आपल्या तेजस्वी विद्येचा दिव्य प्रभाव दाखविला व गाजविला, यात आश्चर्य मानावयाचे कारण नाही आणि याच कारणामुळे सर्व हिदू राजे विद्वान व बहुश्रुत ब्राम्हणास गुरुस्थानी घेऊन, त्याची राजकारणात सल्लामसलत घेत असत, हा भारतीयाचा इतिहास पदोपदीं कठरवाने जगाला जाहीर करीत नाही काय? असो

सायणाचार्य हे आता कपराजाच्या दरबारात महामत्रीपदाची सूत्रें हालवीत असता अहोरात्र त्यातच गढून गेले होते, असे नाहीं. त्यातल्यात्यात फावल्यावेळीं घरात त्याचे वाचन व लेखन हे चालूंच होते दरबारांतील विविध कार्यकलाप सभाळून, कपभूपालाच्या आमदानींत एक सुदर ग्रंथ लिहून त्यानी तयार केला त्याचे नाव 'सुभाषित-सुधानिधि' असे असून, तो त्याचा पहिलाच ग्रथ होय त्याच्या या ग्रथात शेवटचा जो शेरा आहे, त्यावरून आमच्या वरील विधानास पुष्टि मिळते तो शेरा आहे

तो असा: — इति पूर्वपश्चिमसमुद्राधीश्वरारिराय-विभाल-श्री कम्पराज महाप्रधान-भरद्वाजवंश-मौक्तिक मायण रत्नाकर सुधाकर-माधवकल्पतरु सहोदर श्री सायणाचार्य विरचिते सुभाषित सुधानिधौ, यावरून सदरहु ग्रंथ कम्पराजाच्या कारकीर्दीत झाला असून, त्यावेळीं सायणाचार्य हे त्याचे महाप्रधान होते, या विधानास बळकट पुष्टिच मिळते

या प्रमाणें श्री माधवाचार्य हे विजयनगर येथे व सायणाचार्य हे उदयगिरि येथें राहून, विजयनगर साम्राज्याची धुरा अत्यंत दक्षतेने व चातुर्याने पेलून विजयनगर साम्राज्यात त्यानी नवचैतन्य ओतलें व त्याच्या वाढविकासाला अनुकूल वातावरण निर्माण केले, ही गोष्ट प्रस्तुत ग्रंथावरून सहज व स्पष्ट निदर्शनास येणार आहे



## प्रकरण १२ वे

# महामंडलेश्वर वीर श्री सायणाचार्य

'सत्य मही भवति शासति सायणार्ये।
सम्प्राप्तभोगसुखिनः सकलाश्च लोका ॥

कम्पराजाची प्रकृति पुढे दुर्दैवाने लवकरच दिवसे दिवस खगत चालली शक्तीचा ऱ्हास होत चालला इंद्रिये शिथिल होत चालली औषधाचा आता कोणताहि व कसलाहि उपाय चालत नाहीं हे त्याना कळून चुकल्यावर, जीविताची आशा दिवसे दिवस झपाट्याने अटू लागली त्याना इतर कसलीहि चिंता नव्हती पण एका गोष्टीत मात्र त्याचा जीव घुटमळत होता तो म्हणजे त्याचा एकुलता एक मुलगा-बाळ संगम तो अजून लहान होता वयात आलेला नव्हता आपल्या पश्चात् त्याचे काय होणार नि कसे होणार, याचा त्याना जवळ जवळ पुढे हृद्रोगच लागून राहिला कोणाच्या पदरात त्याला घालावे–कोण त्याचे काळजी पूर्वक संरक्षण करील-पालन पोषण करील–याविचारात अहोरात्र गढून गेले असता, अकस्मात् त्यास एक व्यक्ति सुचली ती म्हणजे सायणाचार्य त्याचा जीव आता जरा खाली पडला

आता आपण फार दिवसाचे सोबती नाही, याची जेव्हा खात्री पटली, तेव्हा त्यानी सायणाचार्यांस बोलावून जवळ घेतले आणि त्यास म्हटले — दिवाणजी ! मी आता इथ फार दिवसाचा सोबती नाहीं तर माझी एक शेवटची इच्छा आहे ती आपण पूर्ण कराल अशी आशा आहे इच्छा, इच्छा म्हणजे ती एवढीच की, माझा मुलगा संगम हा लहान आहे तेवढा एकच माझा अंकुर शिल्लक आहे तेवढ्यासाठीं माझा जीव घुटमळतो आहे तर आपण माझ्या पश्चात् आपल्या पुत्राप्रमाणे त्याचें रक्षण

करावे त्यास जपावे व त्याचे यथास्थित संगोपन करावे ही माझी शेवटची इच्छा

त्याच प्रमाणे ही राज्यलक्ष्मीहि आपल्या पदरात घातली आहे आतां पर्यंत करीत आला, तसाच पुढेहि तिचा संभाळ करावा राज्य वाढवावें व लौकिक फुलवावा लोकाना सुखात ठेवावे आता माझ्याने अधिक बोलवत नाहीं. ही माझी अखेरची इच्छा आपण पूर्ण करावी व करतो म्हणून मला आपल्या तोंडाने अश्वासन द्यावे, असे म्हणून त्यानी आपला हात पुढे केला

सायणाचार्यांनी तो त्याचा हात आपल्या दोन्ही हातामधे मोठ्या प्रेमाने व आदराने धरून सांगितलेः— महाराज ! आपण स्वस्थ असावें ! संगम युवराजाचे संगोपन मी आपला प्राण पणाला लावून करीन ! नरेशांनी चिंता करण्याचे कारण नाही ! आपल्या सर्व इच्छा विरुपाक्ष देव पूर्ण करील ! आपण निर्धास्त असावे !

संगम तेथे जवळच राजाच्या शेजारीं बसला होता त्याचा कृपाने हात धरून, तो सायणाचार्यांच्या हातात दिला आणि म्हटलें– 'हा बाळ आता माझा नसून आपला आहे ' हे शब्द उच्चारताना त्याच्या नेत्रातून दोन टिपे गळलीं ! सायणाचार्यांचा कंठहि दाटून आला ! हा प्रकार घडल्यावर पुढें लवकरच कम्पभूपाल कालवश झाले ! अर्थात् ही गोष्ट इ स १३५५ मध्ये घडून आली

राज्य व्यवस्थित चालविणे हें काम वाटते तितके सोपे नाहीं. बाहेरच्या मनुष्याला राजपुरुषाचें वैभव पाहून, त्याचा मोह व लोभ सुटतो, हें खरें लक्ष्मीचा व अधिकाराचा मोह कोणाला नाही ? आणि सुखसंपत्ति व सुखविलास नकोत असे कोणाला वाटते ? तें ऐश्वर्य, ते वैभव, तो अधिकार, तो मान सन्मान, गौरव-प्रतिष्ठा, तें सुखी जीवन, या सर्व गोष्टी राजकारण खेळणाऱ्या अधिकारपदस्थाच्या बाहेरून गोड व चांगल्या दिसतात व प्रलोभनीय वाटतात, यात खोटे काहीच नाहीं पण त्याच्या पोटात असलेली जबाबदारी, कर्तव्यनिष्ठा ही पाहिली म्हणजे सूज्ञ मनुष्याला तेथें विचारच करावा लागेल.

तशात राज्याची मुख्य सूत्रें ज्याच्या हाती आहेत, लक्षावधि लोकाचें सुखदु ख ज्याच्यावर अवलबून आहे, अशा पतप्रधानासारख्या वरिष्ठ सत्ताधीशाची जबाबदारी तर फार मोठी व तशात अत्यत नाजूक असते व आहे, हें जर समजले नाही, तर राज्याचे खोबरे व्हावयाला फारसा अवधि लागणार नाही, हा इतिहासाचा कौल राज्यसूत्रे हलविणाऱ्यानी अहर्निश डोळ्यापुढे जरूर ठेवावयास पाहिजे

हे सर्व येथे सागण्याचे कारण की, आता सायणाचार्यांवर फार मोठी जबाबदारी येऊन पडली होती दुसरा तिसरा असता तर प्रसग कठीणच होता लेच्यापेच्या मनुष्याला त साधलेच नसते कारण राजाचे मरण म्हणजे ती एक राजघराण्यावरची मोठी आपत्तिच होय ! मोठ्या क्रातीची ती एक महापर्वणी ! स्वार्थी व महत्वाकाक्षी लोकाना स्वार्थ साधण्याची ती एक मोठी अनुकूल सधीच !

यावेळी राजघराण्यात खून पडतात, देशात बंडबखेडे माजतात, गोंधळ व गडबड उठून सर्वत्र अराजकता माजते आणि राज्यातील शाति व सुव्यवस्था बिघडवून आपल्या पोळीवर तूप ओढण्यास दुष्ट व स्वार्थी लोकास आयतेंच फावतें !

अशा वेळी वरिष्ठ सत्ताधाऱ्याना डोळ्यात तेल घालून रात्रंदिवस सर्वत्र व सतत टपावे व जपावे लागते आणि चाणाक्ष सायणाचार्यांनी हें सर्व दूरदृष्टीनें जाणून, सावधगिरी बाळगून राज्यात कडेकोट बदोबस्त ठेविला व बालराजाच्या जिवाला धोका पोचणार नाहीं, अशा विश्वासू लोकाचा राजवाड्या सभोवती कडक पाहरा बसविला

तसे पाहू जाता, ही वेळ विजयनगर राज्याला जरा नाजूकच होती हरिहर भूपतीला वारून वर्ष होतें न होते, तो इतक्यात त्याचा शूर व इमानी भाऊ कम्पहि परलोकवासी झाला हरिहराच्या जागी विजयनगरात बुक्क व उदयगिरीत सगम हे राज्यपदावर आले असून, त्यात बुक्क हे विजयनगरांत नवखे व उदयगिरींत सगम हे वयाने लहान व अल्लड असेच होते शिवाय उदयगिरीचे दिवाण म्हणजे सधा पढणारे ब्राम्हण ! नाक धरून

देव्हाऱ्यात डोळे मिटून ध्यानस्थ होऊन बसणारे कर्मठ ब्राम्हण ! त्याना राजकारण कोठले कळावयाला ! व मुत्सद्दीगिरी कसली साधावयाला ! याचा फायदा घेण्याचे कांही स्वार्थी व असंतुष्ट लोकाच्या डोक्यात वेड शिरलें असल्यास, त्यात काही नवल नाहीं

या स्वार्थी व प्रसगसाधु गोटातला चोल देशचा चम्प उर्फ शंभुवराय हा एक होता तो मोठा धनाढ्य असून मोठा महत्वाकाक्षी राजा होता त्याची सीमा उत्तरेस उदयगिरि राज्यास येऊन भिडली होती तेथें सीमेवर नसती कुरापत काढून प्रकरण त्याने लढाईपर्यंत आणून भिडविले

त्याची समजूत अशी कीं, यावेळी उचल खाल्ल्यास उदयगिरीचा मोठा लचका सहज पचनी पाडता येईल पण वेड्याचा अंदाज अजीबात चुकला ! त्याचा तर्क सपशेल घसरला ! सायणाचार्याविषयीं त्याची सपशेल दिशाभूल झाली ब्राम्हण राजकारणात पडला म्हणजे तो फक्त ब्राम्हणच राहत नाहीं ! त्या ब्रम्हतेजात मग क्षात्रतेजहि चमकूं लागते ! मग तो क्षत्रियाला सुद्धां भारीच होतो ! भारताचा हा इतिहास प्रसिद्धच आहे

सायणाचार्य हे ब्राम्हण असले तरी अष्टावधानी व अष्टपैलू ब्राम्हण होते ! त्याच्या जिव्हाग्रांत वेदहि होते व हातांत तलवारहि होती ! प्रसंगी ते वेदातहि निमग्न असत व प्रसगी रणभूमिवरहि सग्राम गाजवीत ! दक्षिणेत चम्पराजा गडबड उठविणेच्या तयारींत आहे, ही वार्ता त्यास त्याच्या खास दूताकडून वेळेवर लागल्यामुळे सावध होऊन, वेदाला ढावळींत गुडाळून, हातात तलवार घेतली व निवडक सैन्य घेऊन, शत्रु हल्ल्याची वाट न पाहतां, स्वराज्य रक्षणार्थ स्वारी सरहद्दीवर निघाली चम्पराजास ही गुणगुण लागून, तोही मोठ्या तयारीने पुढें आला

सायणाचार्यांनी शत्रूच्या राज्यात मुसडी मारून, हल्ला चढविला दोघाची कांची-पुराजवळ गाठ पडून मोठा रणसग्राम माजला चम्पराजाजवळ सैन्य मोठे होते, पण तें तितकें तयार नव्हतें स्वत सायणाचार्य हे युद्धनीतिकुशल असल्यामुळें मोठ्या खुबीने व धैर्याने लढून, चम्पराजाचा सणसणीत पराभव केला व त्याच्या सैन्याची दाणादाण करून, त्यांना

दशदिशेस पिटाळून लावले !! सायण विजयी झाले व चम्पराज शरण आला !! ही लढाई फार मोठी झाली आणि त्यात सायणाचे रणकौशल्य जगाच्या निदर्शनास आले ही लढाई इ स १३५५ १३५६ च्या सुमारास झाली

(म्हैसूर ग्याझेटीर, खंड २, भाग ३, प्रकरण ११)

याविषयीं 'अलकार सुधानिधी' मध्ये वर्णन आढळतें, तें असेः—

'जगद्वीरस्य जागर्ति कृपाण सायणप्रभो ।
किमित्येते वृथटोपा गर्जन्ति परिपन्थिन ॥

आणि चम्पराजाच्या लढाई विषयी म्हटले आहे कीं—

'दिष्ट्या दैष्टिक भाव-सभृतमहा-सम्पद्विशेषोदयम्।
जित्वा चम्पनरेंद्रमूर्जितयशा प्रत्यागतः सायणः॥

भावार्थः—जगद्वीर सायणाच्या हातात कृपाण जागृत आहे, तो पर्यंत शत्रू गर्वाने वृथा ओरड करून काय साधणार आहे? संपत्तीने मदांध झालेल्या चम्पराजाचा पराभव करून यशोधवल कीर्तीने विजयी सायण परत आला

सायणाचार्य हे कम्पभूपालाचे महाप्रधान म्हणजे पंतप्रधान होते याचा पुरावा 'सुभाषित-सुधानिधि' मध्ये आढळतो तेथे हें पुढील वाक्य आहेः—'इति पूर्वपश्चिम समुद्राधीश्वरारिरायविभाल श्री कम्पराज महा-प्रधान भरद्वाजवंश मौक्तिक-मायणरत्नाकर सुधाकर-माधव कल्पतरु-सहोदर-श्री सायणाचार्यविरचिते सुभाषित सुधानिधौ' यावचनात सायणाचार्यांना कंपभूपालाचा महाप्रधान असे स्पष्ट म्हटलें आहे त्याचप्रमाणें ते संगमराजाचेहि महामत्री होते, असे धातुवृत्तिसुधानिधि ग्रंथावरून ध्वनित होते त्या ग्रथात हे पुढील वाक्य आहे —

'इति पूर्व-दक्षिण पश्चिम समुद्राधीश्वर कम्पराजसुतसगमराजमहा-मन्त्रिणा मायण पुत्रेण माधवसोदरेण सायणेन विरचितायां माधवीयायां धातुवृत्तौ '

येथे सायणाना कम्पराजसुत संगमभूपाचा महामन्त्री असे म्हटलें आहे कम्पराजाचे महाप्रधान म्हणून इ स १३४५—१३५५ पर्यंत व पुढे सगमाचे महामत्री म्हणून इ स १३५५—१३६४ पर्यंत सायणाचार्य उदयगिरि राज्याचे काम पहात होते नेल्लूर येथे एक शिलालेख इ स. १३६४चा मिळालेला असून, त्या लेखात त्याना 'श्रीमन् महामंडलेश्वर वीर श्री सायण्ण ओडेयलु' याने पृथ्वीवर शासन केलें, असे म्हटलें आहे यावरून त्यांना महामडलेश्वर, हा किताबहि लावण्यात येत असे, ही गोष्ट निर्विवाद आहे

*(Beginnings of Vijayanagar History,*
*by S G Haras P 98)*

चम्पराजाचा वर सांगितल्याप्रमाणें पराभव झाल्यावर पुढे लवकरच पुनः तसाच एक प्रसंग आला गरुडनगरच्या राजाने लढाईचा प्रसग आणल्यानें संगमराजाला बरोबर घेऊन सायणाचार्यांनी त्याच्यावर चढाई करून, त्याची चागली खोड जिरविली हा मजकूर एका शिलालेखांत सापडतो. शिवाय उत्तरेकडून आध्राचा त्रासहि मधुन मधुन होतच असे त्यांचाहि वेळोवेळीं बदोबस्त करण्यात आला याप्रमाणे कम्पराजाला वचन दिल्याप्रमाणें उदयगिरि महाराज्याचे जागृत राहून उत्तम तऱ्हेने रक्षण केलें त्यांच्या शौर्याविषयी हा पुढील श्लोक आढळतो, तो असा —

'समरे सपत्नसैन्यं सायण तव बिम्बित वहन् खड्ग ।
क्रीडति कैटवरिपुरिव बिभ्रत् क्रोडे जगत्रय जलधौ ॥'

यावरून सायणाचार्य हे केवळ वेदविद्याविशारद व राजकारणपटु होते, इतकेंच नव्हे तर ते रणकुशल तलवार बहाद्दरहि होते, ही गोष्ट आता सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे त्याच्या कारकीर्दीत उदयगिरीची प्रजा सुखी संपन्न व संतुष्ट होती

---

## प्रकरण १३ वे

# सायणाचार्य वाङ्मय क्षेत्रांत

'अस्ति श्री सगमक्ष्मापः पृथ्वीतलपुरन्दर ।
तस्य मन्त्रिशिरोरत्नमास्ति मायणसायण ॥
तेन मायणपुत्रेण सायणेन मनीषिणा ।
आख्यया माधवीयेय धातुवृत्तिर्विरच्यते ॥

(धातुवृत्तिसुधानिधि)

मागच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे सायणाचार्य राजकारणांत गुंतले होते, तरी ग्रथलेखनाच्या कार्यांत ते अगदी उदासीन होते, असा त्याचा अर्थ नव्हे ग्रथावलोकन व ग्रंथलेखन हा त्याचा अत्यंत आवडीचा विषय असल्यामुळें, तशातच वेळांत वेळ काढून ग्रंथलेखनाचा उपक्रम त्यांचा चालूच होता कम्पराजाच्या वेळीं त्यानी 'सुभाषित सुधानिधि' हा ग्रथ लिहून काढला त्यात सुभाषित विषयावर संस्कृत कवींच्या बोधप्रद वचनाचा निवडक सग्रह केला आहे हा ग्रंथ कम्पराजाच्या आमदानींत झाला, हें अनुमान पुढील वचनावरून करता येण्यासारखें आहे 'इति पूर्वपश्चिमसमुद्राधीश्वरारिराय विभाड श्री कम्पराज महाप्रधान श्री सायणाचार्यविरचिते सुभाषित सुधानिधौ' या वाक्यावरून तो ग्रथ कम्प राजाच्या काळींच लिहिण्यात आला, हें स्पष्ट होतें

यानंतर त्याचे लक्ष आयुर्वेदाकडे वळलें धर्माचरणाला आयुर्वेदाचें ज्ञान उपकारक व म्हणून अवश्य असल्यामुळें, त्यातील रहस्याचें प्रकटीकरण या ग्रथात करण्यात आलें आहे या ग्रंथाचा उल्लेख अलंकार-सुधानिधींत करण्यात आला असल्यामुळे हा 'आयुर्वेद-सुधानिधि' ग्रंथ अलकार-सुधानिधीच्या आधी झाला असावा, या अनुमानास बळकटी येते या

'आयुर्वेद-सुधानिधि' चा सग्रह एकाम्रनाथ याने केला, असे खालील वचनावरून दिसून येतें तें वचन हे असेः —

> एकाम्रनाथो यत्तात सायणामात्यचोदितः ।
> समग्रहीत् सुबोधार्थमायुर्वेदसुधानिधिम् ॥

याशिवाय 'आयुर्वेद-सुधानिधि व्यसनिभि श्रीसायणार्योदितं । भैषज्यं च भिषग्वरैर्नगणयत्युत्कूल बाष्पाकुला ॥' असे इंडियन एण्टिक्वेरी (१९१६) च्या बावीसाव्या पृष्ठावर उद्धृत करण्यात आले आहे हा त्याचा तिसरा ग्रथ होय.

यानंतर त्याचा चौथा ग्रथ म्हणजे 'अलकार-सुधानिधि' हा होय या ग्रथात संस्कृत साहित्यातील विविध अलकाराचे लक्षण सागून, त्याचें उदाहरण देऊन समर्थन व स्पष्टीकरण करण्यात आलें आहे. हा ग्रथ दक्षिण भारतात फार प्रख्यात व प्रचारात असून, दक्षिणेतील सुप्रसिद्ध अप्पय्य दीक्षित यानें आपल्या अलकार शास्त्रावरील चित्रमीमासा या ग्रंथात त्याचा गौरवपूर्वक उल्लेख केला आहे हा ग्रथ कम्पराजाच्या कारकीर्दींतला नसून तो संगमराजाच्या वेळचा आहे, असे या पुढील वचनावरून दिसून येतें 'इति श्री सगमराज-सकलराज्यधुरधुरस्य श्री सायणाचार्यस्य कृतावलकारसुधानिधौ ॥' अर्थात् हा ग्रथहि संगमराजाच्याकाळीच लिहिण्यांत आला

आता त्याचा पांचवा ग्रंथ 'धातुवृत्ति-सुधानिधि' हा होय अलंकार-सुधानिधि झाल्यावर व्याकरणशास्त्राकडे वळून, त्यानी 'धातुवृत्ति-सुधानिधि' नावाचा ग्रंथ लिहून संपविला तो हल्ली काशी संस्कृत सीरीज मध्यें १०३ क्रमाकात प्रकाशित करण्यात आला आहे हाहि संगमराजाच्या आमदानींतच झाला

> 'अस्ति श्री सगमक्ष्माप पृथ्वीतल पुरन्दर ।
> तस्य मंत्रिशिरोरत्नमस्ति मायण सायण ॥

तेन मायणपुत्रेण सायणेन-मनीषिणा ।
आख्यया माधवीयेय धातुवृत्तिर्विरच्यते ॥

याप्रमाणे संगमभूपालाच्या कारकीर्दीत यशस्वी राजकारण खेळता खेळताच त्याच वेळी फावलेल्या वेळात 'प्रायश्चित-सुधानिधि' 'आयुर्वेद सुधानिधि' 'अलकार-सुधानिधि' व धातुवृत्ति-सुधानिधि' असे वेगवेगळ्या शास्त्रीय विषयावर सुदर ग्रथ रचना करून त्यानी सस्कृत वाङ्मयाची भरीव व बहुमोल सेवा केली यावेळीं त्याचे वय जवळ जवळ ४५ ते ४८ वर्षांचे होते. पुढे ते बुक्क राजाच्या मन्त्रीमडळात समविष्ट झाले अर्थात् ही त्याची उदयगिरीची कारकीर्द प्रजेला मोठ्यासुखाची झाली, हे उघड सागावयास नकोच



## प्रकरण १४ वे

# वीर श्री बुक्क भूपाल

'तस्य संगमेश्वरस्य पुत्रोऽभूत् पुण्यवैभवात् ।
वीरश्रीमगलादर्शो वीर श्री बुक्क भूपतिः ॥
सप्तार्चिरलस (लोका) अभुजग-विभूषणम् ।
वदन्त्यनुग्रनामान शिव यं भुक्कभूपतिम् ॥
यत्कीर्तिलक्ष्म्या. क्रीडन्त्या ब्रम्हाडं रत्नमण्डप ।
मुक्ताच्छत्र शशांक (स्तु) दीप. शुक्रदिवाकरौ ॥
धर्मेण रक्षति क्षोणी वीरश्रीभुक्कभूपतौ ।
निरातका भयात्तास्मिन् नित्यभोगोत्सवा प्रजा ॥

(एपि इडिका, खड ३, नेल्लूर १९, पृ १२१)

हरिहरनृपालानी मरणसमयीं विजयनगरची गादी आपल्या पश्चात् आपला धाकटा मधला भाऊ बुक्करायास द्यावी, अशी इच्छा प्रकट केली होती. तसें म्हणजे तो हक्क कम्पराजाचा होता तो बुक्कापेक्षा वडील असल्यामुळें त्याचा हक्क अधिक होता पण तो हरिहरास फार मानीत असल्यामुळें त्यानें फारसे आढेवेढे घेतले नाहींत शिवाय त्याची प्रकृतिहि पूर्वीसारखी निकोप नसून, मधुन मधुन ती बिघडत असे तेव्हा बुक्कास गादी देण्यास कुरकुर न करता त्याने आपली सरळ मान्यता दिली व वीर प्रताप बुक्क हा गादीवर आला तो झालातरी हरिहराप्रमाणेंच शूर व पराक्रमी असून, वैदिक धर्माचा मोठा अभिमानी व कैवारी होता

विजयनगर साम्राज्याचा जन्म झाला, तो मुसलमानाची राक्षसी सुलतानी सत्ता दक्षिणेतून समग्र उखडून काढून तिला कायमची मूठमाती देणेसाठींच झाला होता, हें खरे पण इतकेंच त्याचें ध्येय नव्हतें त्याबरोबरच

हिंदुधर्माचे पुनरुज्जीवन व पुनरुद्धार करून, हिंदु संस्कृतीचे रक्षण व पोषण व्हावे, हेंहि त्याचे ध्येय होतेंच आणि ते बुक्क राजाच्या राजवटीत पूर्ण यशस्वी झाले, यांत तिलमात्र शंका नाही

मुसलमानांच्या अमानुष छळानें हिंदुप्रजा अगदी त्रस्त व ग्रस्त होऊन गेली होती त्यांचा जीव अनन्वित हाल अपेष्टा सोसून अगदी मेटाकुटीस आला होता पण सुदैवानें ती काळ रात्र आतां संपून, विजयनगरांत स्वातंत्र्यरवीचा नुकताच मंगलोदय झाला होता कष्टाचे, काळजीचे, दुःखाचे व निराशेचे दिवस जाऊन, आत्मविश्वासाची व नवचैतन्याची प्रभात झाली होती अर्थात् विजयनगर साम्राज्याचा अंकुर जोरानें वाढीस लागला होता

हरिहराच्या आमदानींत बुक्क हा पेनुकोंडा व द्वारसमुद्र येथें राहून, दक्षिणेतील प्रांताचा युवराज या नात्यानें कारभार पहात असे त्यानें त्यावेळीं दक्षिणेची बाजू चांगली संभाळली होती त्याचा धाक व दरारा त्या भागांत चांगला बसलेला असून, शेजारच्या राज्यांतील लोक देखील त्याला वचकून व नमून असत व त्याचप्रमाणें त्याचा धाकटा भाऊ मारप्पा हा पश्चिमेस मालेराज्य-म्हणजे डोंगरी व जंगली प्रदेश-याचा राज्यपाल असून, तेथें त्याची छाप चांगली बसली होती

हें माले राज्य शिमोग्याच्या दक्षिण-पश्चिम कोपऱ्यांत पसरलेलें होतें त्याचा मंत्री माधव नांवाचा असून, तो जाडा विद्वान तसाच मोठा शूर होता त्याच्या सहाय्यानें मारप्पानें कदंबराजावर स्वारी करून, त्याचें राज्य काबीज केलें चंद्रगुप्ती म्हणजे बनवासी ही त्याची राजधानी होती तीच पुढें मारप्पानेंहि आपलें मुख्य ठाणें करून तेथें तो राहूं लागला ही गोष्ट इ स १३४६ च्या सुमारास घडून आली कारण इ स. १३४६ सालीं तो तेथला राज्यपाल होता, असा उल्लेख आहे. (एपि कर्नाटिका, खंड ८, सोरब ३७५) हरिहराच्यावेळीं हे दोघेहि भाऊ त्यास अनुकूल होऊन, त्याच्या सल्ल्यानेंच वागत असत पुढें बुक्कास गादी मिळाली मारप्पाची मात्र पुढची हकीकत उपलब्ध नाहीं कारण त्याचा उल्लेख पुढें कोठेंच आढळून येत नाहीं

हरिहरराजे वारल्यावर पुढे लवकरच माधवाचार्य हे राजकारणातून निवृत्त होऊन, इ स १३५५-१३५६च्या सुमारास काशीस जाऊन राहिले उद्देश हा की उर्वरीत आयुष्य आता अध्यात्मविद्येत व आत्मचिंतनात घालवून, जन्माचें सार्थक करावें पण याचा परिणाम असा झाला कीं, त्याच्या अभावीं विजयनगरचा दरबार फिक्का व ढीला पडून, बुक्कराजास पाण्यांत पडल्यासारखे झाले त्याच्या गैरहजरीत त्याची ती महत्त्वाची व जबाबदारीची प्रमुख जागा भरून काढणारा असा त्याच्या तोडीचा व तोलाचा अष्टपैलू व अष्टावधानी मुत्सद्दी तसा कोणी राहिला नाही व मिळाला नाहीं

माधवाचार्यांची गैरहजरी बुक्कराजास फार जाणवू लागली. फार काय, त्याचा उजवा हातच मोडल्यासारखा झाला! बाहेर बोलता येईना व स्वस्थ बसून चालवेना मोठी चमत्कारिक स्थिति झाली यावेळीं बुक्क-राजाची राज्याची घडी अजून बसावी तशी व्यवस्थित बसली नव्हती मधुन काही उपद्व्यापी व स्वार्थी लोक तेथे तेथे खेकटी व गडबड उठवीत असत माडलिकात गुप्त कारस्थाने शिजूं लागून, राजधानीत दररोज नाहीं नाहीं त्या कंड्या पिकत असत शिवाय उत्तरेकडील मुसलमानांची भीति अद्याप नष्ट व्हावी तशी झाली नव्हती

यासर्व गोष्टी झेलून तोल सभाळणारा व सर्वांवर छाप पाडणारा असा वजनदार व प्रभावी मुत्सद्दी दरबारात नसल्यामुळे व नवीन घडी बसत चाललेल्या राजकारणात दैनंदिन उत्पन्न होणाऱ्या प्रश्नाचा व पेचप्रसगाचा निर्णय घेण्यास योग्य मार्गदर्शन करणारा तसा कुशल व दूरदर्शी मंत्री दुसरा कोणी नसल्यामुळे बुक्कराजास राज्यकारभार सुरळीत व सुव्यवस्थित हाकणे जड जाऊ लागलें

पुढें पुढें असे झालें कीं बुक्काना स्वस्थ बसवेना! बाहेर राहून वाटेल तसें बोलता व बडबडतां येतें पण जबबदारी पडलेल्या मनुष्याची गोष्ट अगदी निराळी असते 'जावे त्याच्या वंशा तेव्हा कळे' अशी राजकारणी पुरुषाची स्थिति असते व आहे तेव्हा राजकारणात त्याची बुद्धि पदोपदीं कुंठित

होऊ लागल्यामुळे माधवाचार्यांना परत बोलवून घेण्याचे त्याच्या मनात आले पण तो बेत सिद्धीस जाईल, याची त्याना खात्री वाटेना या विवचनेत असता सुदैवाने एक मार्ग त्याना सुचला चटकन् ते श्रृंगेरीस धावून जाऊन, भारतीतीर्थ स्वामीजीची भेट घेऊन, त्याना सर्व हकीकत निवेदन करून व आपला मनोदय कळवून, माधवाचार्यांना परत येण्यास त्याच्या कडून श्रीमुख घेऊन, त्याबरोबर आपलेहि एक पत्र काशीस पाठवून दिले

भारतीतीर्थ हे माधवाचार्यांचे गुरुदेव असल्यामुळे त्याच्या श्रीमुखाला मानदेऊन, आचार्यदेव परत विजयनगरास आले व बुक्क राजाच्या विनतीला रुकार देऊन, आपण लावलेल्या व वाढविलेल्या विजयनगर साम्राज्याला समर्थ व कार्यक्षम करण्यास पुन मत्रीपदाची सूत्रे हातात घेतली

माधवाचार्य जागेवर येतात तोच मलबारात त्याचा माडलीक सुलतान कुर्बत हसन कागू याने कोकणात विजयनगरराज्यात गोधळ व गडबड उठविल्याची बातमी विजयनगर दरबारात येऊन थडकली सुलता-नची समजूत अशी की, माधवाचार्य गेल्यामुळे विजयनगर दरबार हतबल व हतप्रभ झाला असून, यावेळीं गडबड केल्यास आपणास माडलिकत्व झुगारून देऊन स्वतत्र सुलतानशाही स्थापता येईल पण विचाराचा कयास चुकला व त्याची फसगत व फटफजीति झाली !

सुलतानच्या पुडगिरीची बातमी विजयनगरास येऊन पोचताच माधवाचार्यांनी हा कांटा ताबडतोब काढून टाकण्यास बुक्कास सल्ला दिला अर्थात् बुक्कराजाने विलब न करता मलबारवर आपली फौज घातली यास्वारीत मारप्पाचा शूर व चाणाक्ष मत्री माधव याने भाग घेऊन, बुक्कास जय मिळवून देण्यास मोठी मदत केली लढाईत सुलतानचा पराभव करण्यात येऊन, त्याला पदच्युत करून मलबार प्रात विजयनगर साम्राज्यात सामील करून घेण्यात आला ही गोष्ट इ स १३५८–१३५९ साली घडली

माधवाचार्य काशीहून परत येऊन विजयनगर येथे आपल्या पूर्वस्थळीं म्हणजे पत–अमात्यपदावर रुजु झाल्यावर राजकारणात पुन नव चैतन्य तेजाळू लागले अतर्गत व्यवस्थेंत शिस्त लागत जाऊन सुधारणा होत चालली राजधानींत नवीन आशा व नवीन उत्साह स्फुरू लागला शहराला सुंदर, विशाल व बळकट स्वरूप देण्याच्या कार्याला मोठ्या उमेदीने सुरवात करण्यात आली दररोज कोठे ना कोठें तरी राजधानीच्या स्वरूपात व सौंदर्यांत भर पडत चालली कालचे विजयनगर आज नव्हते व आजचें उद्यां दिसत नव्हते दररोज त्याच्या स्वरूपात व सौंदर्यांत कोठें ना कोठेंतरी, काही ना काही तरी सतत भर पडतच होती.

विजयनगरचें वर्चस्व व लौकिक ऐकून देशोदेशीचे मोठे मोठे व्यापारी, बडेबडे सरदार व जहागीरदार, सुखवस्तु व श्रीमत लोक, विविध कलावंत, नानातऱ्हेचे उद्योगधदेवाले व हरहुन्नरी लोक याची तेथें स्थाइक होऊन राहण्यासाठीं सारखी रीघ लागून राहिली लोकाची वस्ती नित्य वाढत जाऊन, त्यामानाने शहरचा विस्तारहि वाढीस लागला ठिक-ठिकाणी मोठ मोठे वाडे, सुदर सुदर देवळे उंच उंच गोपुरें, लाब, रुंद व आखीव रस्ते, नदीचे कालवे, बागबगिचे, इत्यादि तयार करण्याचीं कामें झपाट्यानें सुरू झालीं

बाजारांत नित्य नवोनवीन वस्तूंचीं नानाविध दुकाने उघडली जाऊन, दिसदीस त्याच्या शोभेंत व विविधतेंत भर पडत चालली कलाकौशल्याला दरबारांतून व धनिकवर्गाकडून चागलें उत्तेजन मिळत गेल्यामुळें कसलेले चांगले चागले नामवंत कलावंत तेथें येऊन राहूं लागले. विद्येला व शास्त्राला राजाश्रय लाभू लागल्यामुळें पट्टीचे पंडित व विद्वान लोक व तसेच इतर शास्त्रांतील नामवंत शास्त्रज्ञ लोक याचा भरणा वाढत चालला. तात्पर्य काय तर विजयनगरच्या सौंदर्याला, वैभवाला, ऐश्वर्याला, लौकिकाला, वर्चस्वाला, व अभिवृद्धीला सुदर बहर येत चालला !

याप्रमाणें विजयनगर साम्राज्याचा ससार सुसूत्र व सुरळीत चालला असतां, मधेंच अनपेक्षित असा एक चमत्कारिक प्रसंग उद्भवला. इ स.

१३६५ सालची गोष्ट. त्यावेळी गुलबुर्ग्याच्या गादीवर महमद बहामिनी हा होता हा गाण्याचा मोठा शोकीन असून, एके दिवशीं त्यास लहर लागून, काही नामवत गवयाचें त्याने गाणे करविलें त्या मैफलींत तो इतका रगला व खूष झाला कीं, त्याना चागले बक्षीस देण्याकरता सरकारी खजिन्यावर एक चेक दिला

पण त्यावेळी स्वारी दारूच्या निशेंत असल्यामुळे तो चेक आपल्या खजिन्यावर न देता विजयनगरच्या खजिन्यावर दिला ! तो चेक घेऊन, त्याचा एक मंत्री विजयनगर येथे येऊन, बुक्क रायाच्या हातीं तो दिला तो चेक पाहून बुक्कास मोठा अचबा वाटला व तसाच मोठा रागहि आला ज्यानें तो चेक आणला होता, त्याची गाढवावरून धिंड काढून, शहरातून मिरवणूक काढण्यात आली ! त्याचा अपमान व उपहास करून त्याची बोळवण करण्यात आली

ही बातमी महमदशहास लागताच त्याच्या क्रोधाग्नीने पेट घेतला व मोठे सैन्य घेऊन विजयनगरचें पारिपत्य करण्यासाठीं कृष्णा ओलाडून खालीं उतरला बुक्क नरेशहि हें भविष्य जाणून असल्यामुळें आळस न करता मोठी फौज घेऊन तोहि बाहेर पडला व बहमनीच्या राज्यांत शिरून मुद्कल हें शहर काबीज करून, तेथें लुटालूट करण्यात आली

ही वार्ता महमद शहास लागली, तेव्हा त्याचा राग शेंडाच्या टाळूस जाऊन भिडला व कूच दरकूच करीत त्याने लवकरच बुक्क राजास गाठलें आदवानी येथें दोघांची गांठ पडून, तेथे मोठें रणकंदन माजलें, पण रणात महमदशहाची सरशी होण्याचा रंग दिसताच बुक्कानें माघार घेतली. महमदशहानें तेथें जवळ जवळ एक लाख लोकाची कत्तल करून, तेथून पुढें त्यानें विजयनगरच्या रोखानें मोर्चा वळविला

पुढें हें प्रकरण अधिक चिघळून विजयनगरला धोका व ताप पोचूं नये म्हणून पचामार्फत महमदशहाशी तहाचें बोलणें लावून, कसें बसे हें अरिष्ट त्यानें टाळलें आपल्या चेकची रकम गवयास दिल्यास आपण राजी होऊन परत फिरू, असें महमदशहानें कबूल केल्यावरून बुक्काने ते मान्य करून,

गवयास ती रकम देऊन टाकली यानप्रमाणे विजयनगरवर आलेले हें संकट खुबीने व शहाणपणाने टाळून साम्राज्याची अब्रू बचावण्यात आली.

नवीन साम्राज्य स्थापन होऊन तें स्थिर-स्थावर होई तो पर्यंतचा मधला काळ मोठा गुतागुंतीचा, आणीबाणीचा व गडबडीचा असतो त्यावेळीं नवीन दरबारला फार काळजी घ्यावी लागते व सावधानपणाने पाऊल टाकावें लागते राज्यात कोठें कोठें बंड उठतात, गोंधळ माजतो, गडबड होते, अंदाधुंदी बोकाळते, काय नानाप्रकार होतात

अशीच गोष्ट विजयनगरचीहि झाली पहिली काही वर्षे बुक्काला अंतर्गत शत्रूशी लढावे लागले व ते काम त्याने चोख बजावले कर्नाटकात थोडी गडबड माजली व ती त्यनें तेव्हाच मोडून काढली पुढे वरंगळच्या काही भागात बंड उठले त्याचाहि खरपूस समाचार घेण्यात आला कांचीवरम येथें अंदाधुदी माजली तिचाहि बंदोबस्त करण्यात आला. यानंतर राज्यात म्हणण्यासारख्या अनिष्ट गोष्टी घडल्या नाहीत

दक्षिणेतील जवळ जवळ सर्व मुलुख आता विजयनगर सत्तेखाली आला होता फक्त मदुरेचा सुलतान तेवढा अजून तेथें मुळीं धरून राहिला होता बाकीसगळा मुलूख विजयनगरच्या वर्चस्वाखाली एकत्र आला होता उत्तरेकडे मात्र विजयनगरची मात्रा फारशी प्रभावी ठरली नाहीं कृष्णेच्या उत्तरेकडे मुसलमानाचे वर्चस्व अजून कायमच होतें त्याला अर्धचंद्र देता आला नाहीं

तशांत गुलबुर्ग्यांचे बहामनी सुलतान अगदी शेजारीच नादत असून, ते मोठें प्रबल सत्ताधारी होते त्याचे वर्चस्व महाराष्ट्र, वऱ्हाड व मध्यप्रांत येथें चागलें बीजधरून होतें मात्र कृष्णा व तुंगभद्रा या दोन नद्यांच्या दोआबातील प्रांत सीमेच्या दृष्टीनें विजयनगर व गुलबर्गा यांच्या घर्षणाचा विषय होऊन बसला होता पण बुक्काचा दरारा चागला असल्यामुळे व त्याचें सामर्थ्यहि डोळ्यात भरण्यासारखें असल्यामुळे त्याच्यात मधुन मधुन धुसफूस चालत असली तरी प्रकरण लढाई पर्यंत रगत नसे

विजयनगर साम्राज्याचा संसार जसा वाढत चालला तसे कारभारांचें

क्षेत्र व जबाबदारीहि वाढत चालली आणि तसे होणे हे स्वाभाविकच आहे माधवाचार्यांचे वय आता सत्तराच्या घरीं आले होते ते किती जरी योग्यतावान मुत्सद्दी असले, तरी वाढत्या जबाबदारीचे जू सुसूत्र व सुरळीत वाहून नेणे त्याना त्या वयात आता जड जाऊ लागले असल्यास, त्यांत आश्चर्य मानण्यासारखे काही नाही

तेव्हां त्यानी मदतनीस म्हणून आपल्या धाकट्या भावास-म्हणजे सायणाचार्यांस-जवळ बोलावून घेण्याविषयी राजाजवळ गोष्ट काढून, त्यांना आपल्या मंत्रिमंडळात दाखल करून घेण्यास सुचविलें. यावेळीं सायणाचार्य हे नेल्लूर येथे राहून, तेथील कारभार महामडलेश्वर या नात्याने पहात होते तेथून बुक्कानी त्यास आपल्याकडे बोलावून घेऊन, माधवाचार्यांच्या सूचनेप्रमाणें त्याना आपल्या मत्रिमंळात दाखल करून घेतले

अर्थात् ही गोष्ट इ स १३६४–१३६५ साली घडून आली तो पर्यंत म्हणजे इ स १३४६ पासून इ स १३६५ पर्यंत म्हणजे जवळ जवळ वीस वर्षें सायणाचार्य हे उदयगिरीचे महाप्रधान व महामडलेश्वर म्हणून काम पहात होते

*(Beginnings of Vijayanagar History P 98)*

उदयगिरि-महाराज्यात या सायणाचार्यांचा लौकिक व वर्चस्व चागले होतें ते विद्वानपडित तर होतेच, पण त्याच वेळीं मुत्सद्दी व रणगाजी वीर-ही होते बुक्कानीच आपण राज्यावर आल्यावर, त्याना महामंडलेश्वर करून नेल्लूर येथें नेमिले होते संगमाच्यावेळीं राज्यातील बडे मोडून व बाहेरील शत्रूंशी लहान मोठ्या लढाया करून राज्याचे रक्षण व सवर्धन करून, सर्वत्र चोख व्यवस्था ठेविली होती त्याची तलवार म्यानेतून बाहेर पडून चमकूं लागली म्हणजे दुष्टाच्या छातीत धडकीच भरे ! लढाईंत चोल देशच्या चपराजाला चांगलाच हात दाखविला होता, या सर्व गोष्टींचा उल्लेख मागें आलाच आहे असो आता सागावयाचा मतलब इतकाच कीं त्याच्या

मन्त्रीपदाच्या नेमणुकीनें विजयनगर दरबाराला एकप्रकारची शोभा व बळकटी आली

सायणाचार्यांनी राज्यकारणधुरंधर बुक्क भूपालाचे गूण पाहून, त्याचा गुणगौरव केला, तो मननीय असल्यामुळे त्याचा येथे उल्लेख करून प्रकरण आटपते घेतो

सत्यैकव्रतपालको द्विगुणधीस्त्र्यर्थी चतुर्वेदिता।
पञ्चस्कन्धमखी षडन्वयदृढस्सप्ताङ्ग सर्वसह.॥
अष्टव्यक्तिकळाधरो नवनिधि पुष्यद्दशप्रत्यय।
स्मार्तोच्छ्राय धुरंधरो विजयतां श्रीबुक्कणक्ष्मापति॥

पुरुषार्थ-सुधानिधिः



प्रकरण १५ वे

## माधवाचार्यांची वाङ्मय-कलाकृति

'पराशरस्मृति. पूर्वैर्नै व्याख्याता निबन्धृभि ।
मयाऽतो माधवाचार्येण तद्व्याख्यायां प्रयत्यते ॥
(पराशर स्मृति, उपक्रमणिका ६)

व्याख्याय माधवाचार्यो धर्मान् पराशरानथ ।
तदनुष्ठानकालस्य निर्णय वक्तुमुद्यतः ।
(कालमाधव)

निर्माय माधवाचार्यो विद्वानन्ददायिनीम् ।
जैमिनीय न्यायमालां व्याचष्टे बालबुद्धये ॥
(जैमिनीय न्यायमालाविस्तर)

मध्ययुगीन दक्षिण भारताच्या राजकीय इतिहासात व धार्मिक वाङ्मयात राजगुरु माधवाचार्यांच नाव व स्थान अत्यत महत्त्वपूर्ण व सस्मरणीय असे आहे अत्याचारी व धर्मवेड्या मुसलमानाच्या वाढत्या व प्रबल आक्रमणाला पायबंद घालून, सर्वस्वी गाजलेल्या दक्षिण भारताला दास्यमुक्त व दु खमुक्त करून, ज्यानी हिंदु धर्माचें रक्षण व उद्धार केला, इतकेंच नव्हे तर राज्यभ्रष्ट हिंदूचे एका स्वतत्र व वैभवशाली साम्राज्यात रूपांतर केलें व निर्जन अरण्यात विजयनगरासारखे सुदर व विशाल शहर वसवून, तेथें स्वातत्र्यलक्ष्मीची प्राणप्रतिष्ठा करून व हिंदुपदपादशाही स्थापन करून, हतबल व हतप्रभ झालेल्या हिंदुजनतेत नवचैतन्य स्फुरविले आणि हिंदुधर्माला उजळा व हिंदु सस्कृतीला नवजीवन देण्याचें भाग्य व श्रेय जोडलें, अशा महाभाग युगकर्त्या आचार्यदेवाचे उपकार व गोडवे किती गाइले तरी ते थोडेच आहेत !

राजे हरिहर व बुक्क याना अगदी निराधार व असहाय स्थितीत हाताशीं धरून, त्याना समयोचित सल्ला व मार्गदर्शनन करून, त्या हतबल व हतबुद्ध बधुद्वयाना ज्यानी प्रबल राजाच्या योग्यतेस चढवून, अमर कीर्तीच्या अत्युच्च शिखरावर नेऊन बसविले आणि देशात 'त्राहि भगवन्' होऊन जमीन धरून बसलेल्या हताश व निराश हिंदु जनतेला स्वातन्त्र्यतेचे सुखी व सपन्न दिवस दाखविण्यात व धर्म नि संस्कृति याचे रक्षण, पोषण व वर्धन करण्यात ज्यानी आपले सर्व आयुष्य वेचले, व आपली अचाट बुद्धि, शक्ति व वर्चस्व ही ओतलीं, अशा त्या पुण्यश्लोकमहानुभावाचे विस्मरण होणें म्हणजे ते एक देशाचे खडतर दुर्दैवच म्हटले पाहिजे! दुसरे काय?

विजयनगरची धुरा या आचार्य-देवानी मोठ्या धैर्यानें व निष्ठेनें वाहिली होती, तरी ते सर्वस्वी राजकारणातच रगून व गुरफटून बसले होते, असा भाग नसून, त्या बरोबरच व त्याचवेळीं वेळात वेळ काढून सस्कृत वाङ्मय क्षेत्रातहि पदार्पण करून, तेथेंहि जी प्रचड व बहुमोल भर घातली व वेदात व अध्यात्म विद्येचा उद्धार व उत्कर्ष केला, तो देखील वाङ्मय-इतिहासात अविस्मरणीय असाच आहे! त्याचे नाव हिंदु समाजाचा एक मोठा अभिमानाचा विषय असून, तो भारतीय राजकारणात केव्हाहि बोधप्रद व संस्मरणीय असाच राहील!

हरिहर भूपाल व बुक्क नरेश हे राजे तर माधवाचार्यांना देवाप्रमाणें पूज्य मानीत व त्याचे शब्द वेदाप्रमाणें प्रमाण धरून, त्या रोखानें चालत, यात एक अक्षरहि खोटें नाहीं माधवाचार्यासारखे कर्तृत्ववान, सत्वशील, विद्यासपन्न, लोकहिततत्पर व राज्यकारणपटु असे धीरगभीर वृत्तीचे ब्राम्हण व हरिहर-बुक्कासारखे, उदार व प्रतापी क्षत्रिय वीर याचा जेथें सुदर व व मधुर संगम झालेला दिसून येईल, त्या राष्ट्राचें भाग्य व वैभव काय व कीती, हें कोणी वर्णन करावें! तोच पुण्य व पवित्र देश होय आणि तेथेंच देव नांदण्यात आनद मानतात!

चौदाव्या शतकातील विजयनगरची आठवण झाली म्हणजे बुक्क

यजुर्वेदातील या पुढील वचनाची आठवण वेदवेत्या विद्वानाना झाल्याशिवाय रहात नाहीं ते वचन असे—

'यत्र ब्रम्ह च क्षत्र च सम्यञ्चौ चरत. सह।
तं लोक पुण्य प्रज्ञेय यत्र देवा सहाग्निना ॥

(शु य २०-२५)

भावार्थ — जेथे विद्वान व तपस्वी ब्राम्हण व शूर व उदार क्षत्रिय हे प्रेमाने व सलोरव्याने एकत्र वागतात व नांदतात, तोच पुण्य देश समजावा, कारण तेथेंच सर्व जगावर सत्ता चालविणारे देव हे तेजस्वी अग्निनारायणासमवेत आनंदाने सूक्ष्म रूपात संचार करतात. विजयनगरच्या माधव-हरिहराची जोडी पाहिली म्हणजे द्वापरातील वसिष्ठरामचंद्राची व कृष्णार्जुनाची गोड आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं ! असाच प्रकार पुढे महाराष्ट्रातहि रामदास-शिवाजी रूपाने घडून आला असो

माधवाचार्यांचा राजकारणातील इतिहास वर उडत उडत देण्यात आला आहे आता त्याची वाङ्मय सृष्टीतील सेवा व धार्मिक क्षेत्रांतील कार्य यांचेंहि थोडक्यात दिग्दर्शन केल्यास तें अप्रासंगिक होणार नाहीं

याचे कारण असे कीं सायण व माधव यांचें चरित्र परस्परपूरक, परस्पर समर्थक, परस्पर प्रकाशक, परस्पर सहायक व परस्पर उपकारक असें असल्यामुळे, ते जोडीने व समान्तराने मार्गक्रमण करणारें व म्हणून अविभाज्य असे आहे तसेंच त्याच्या चरित्राला पूर्णत्व व महत्व यावयाचें झाल्यास त्यांच्या जीवतेतिहासाबरोबरच हरिहर व बुक्क-अर्थात् विजयनगरचा प्रारंभीचा इतिहास – याचाहि घनिष्ठ संबंध येतो त्याशिवाय कोणालाच पूर्णत्व व महत्व व सार्थकत्व नाहीं हा त्रिवेणीसंगम आहे सायणाचें नांव निघालें कीं तेथें माधवहि आलेंच व सायणमाधवाचा इतिहास लिहावयाचा झाला तर हरिहर व बुक्क याना वगळून चालण्यासारखें नाहीं असा हा परस्पर तिरंगी संबंध असल्यामुळे आम्हांला सायणाचार्यांचें चरित्र रंगवितांना त्यांच्या जोडीला प्रसंगानुरूप माधवाचार्य व हुक्क व बुक्क याचाहि उल्लेख करणें अपरिहार्यच झाले आहे

म्हणून सायणाचार्यांबरोबरच माधवाचार्यांच्या ग्रंथलेखनाचाहि प्रस्तुत स्थळीं समाचार घेण्याचा आम्ही संकल्प केला आहे आतां येथे जी माहिती देण्यांत येईल, ती त्यांनी पत-अमात्यपदावर असतानाच-म्हणजे माधवाचार्यांनी आश्रमांतर करण्याच्या पूर्वींच-केलेल्या वाङ्मयसेवेपुरतीच असेल पुढें त्यांनी आश्रमातर करून, शृंगेरी पीठावर अधिष्ठित झाल्यावर केलेल्या ग्रंथलेखनाचा इतिहास पुढे प्रसंगानुसार देण्यात येईल

माधवाचार्यांची पहिली वाङ्मय कृति म्हणजे कलियुगातील आचार-धर्मांची प्रमुख स्मृति-जी पराशर स्मृति-त्या स्मृतीवर खुलासेवार लिहिलेला विस्तृत असा टीकात्मक महाग्रंथ होय. कलियुगात इतर स्मृतींपेक्षा पराशर स्मृतीला विशेष महत्व असल्यामुळें व त्या स्मृतीवर तोपर्यंत कोणीहि निबंधकारांनी व्याख्यान न लिहिल्यामुळे त्या आचार-प्रधान ग्रंथावर साधार व सविस्तर असे टीकात्मक भाष्य लिहिण्यास माधवाचार्यांच्या मनानें घेतलें

त्या ग्रंथाला टीका लिहितांना प्रारंभीच पुढील प्रमाणे म्हटलें आहे 'पराशरस्मृति पूर्वैर्न व्याख्याता निबन्धृभि । मयाऽतो माधवाचार्येण तद्व्याख्यायां प्रयत्यते ॥ ॥ ६ ॥ (पराशरस्मृति उपक्रमणिका) अर्थ सरळ व स्पष्टच असल्यामुळें भाषातराचें कारण नाहीं

हा त्यांचा पहिला ग्रंथ असून, त्यात त्यांची अगाध विद्वत्ता, प्रगाढ शास्त्राध्ययन, विशाल बहुश्रुतपणा, अप्रतिम प्रतिभाविलास व विलक्षण भाषाप्रभुत्व यांची कोणालाहि सहज साक्ष पटल्याशिवाय रहात नाहीं. हा एवढा एकच ग्रंथ धर्मशास्त्राच्या क्षेत्रात व इतिहासांत त्यांची कीर्ति अजरामर करण्याला पुरेसा आहे.

हा ग्रंथ 'बाम्बे संस्कृत सीरीज' मध्ये पंडित वामन शास्त्री इस्लापूरकर यांनी चार भागात छापून प्रसिद्ध केला आहे तो ज्यांनी पाहिला असेल, त्यांना विशेष सांगण्याचें कारण नाहीं. व ज्यांनी पाहिला नाहीं, त्यांना काय सांगूनहि त्याची कल्पना येणार नाही व खात्री पटणार नाहीं. असा प्रकार असल्यामुळें लेखणी येथेंच आंखडून घेणें योग्य दिसतें असो

आता त्यांचा दुसरा ग्रंथ म्हणजे 'काल माधव' हा होय पराशर-स्मृतीवर टीका लिहून झाल्यावर धर्माचरणाचा काल निर्णय करण्यासाठीं या ग्रंथाची त्यानी रचना केली, असे या पुढील श्लोकावरून दिसते

'व्याख्याय माधवाचार्यो धर्मान् पराशरानथ।
तदनुष्ठानकालस्य निर्णयं वक्तुमुद्यतः'॥

—(कालमाधव)

या कालमाधव ग्रंथाचे एकदर पाच प्रकरणे असून, पहिल्यात काल-विषयाची व्याख्या करण्यात आली आहे दुसऱ्यात वर्षाची कल्पना, चद्र, सावन, व सौर वर्षांचा पारस्परिक भेद, अयन, ऋतु, मास व त्यात वर्ज्य सागितलेला कर्मकलाप, याचे विस्तृत विवेचन करण्यात आलें असून, तिसऱ्यात तिथीचा अर्थ, काल, सीमा व कर्तव्यकर्म याचे वर्णन, चौथ्यात प्रतिपदा, द्वितीया इत्यादि तिथींचें विवेचन व पाचव्या प्रकरणात धार्मिक कृत्यासाठीं योग्य नक्षत्र, योग व करण, याचें उपयुक्त व उद्बोधक वर्णन करण्यांत आलें आहे पराशर-माधव व कालमाधव हे दोन्ही ग्रथ धर्म-शास्त्रक्षेत्रात अग्रगण्य मनण्यात आले असून, ते पडितमान्य झाले आहेत

या नंतरचा त्याचा अतिमहत्वाचा तिसरा ग्रथ म्हणजे 'जैमिनी न्यायमाला विस्तर' हा होय वैदिक आचार धर्माचे सागोपाग विवेचन केल्यावर, त्याची दृष्टि आता यज्ञयागादि कर्मकाडाकडे-म्हणजे श्रौत धर्माकडे-वळली. कर्मकाडालाच न्यायकाड असे म्हणतात आणि तें प्रथम जैमिनीने प्ररूढ केलेलें आहे ('जैमिनिप्रोक्तानि धर्मनिर्णायकान्यधिकरणानि न्यायः'). त्याला मीमांसा कांड असें दुसरेंहि एक नाव प्रसिद्ध आहे वेदाचे मुख्य दोन भाग असून, पहिल्यात यज्ञयागादि कर्मानुष्ठानाचे विवेचन करण्यांत आले असून, दुसऱ्या भागांत उपासना व ज्ञान याचा परामर्श करण्यांत आला आहे. पहिल्याला 'मीमासा' व दुसऱ्याला 'शारीरिक' यानावानें सबोधण्यांत येतें

याविषयी 'न्यायमाला विस्तर' भूमिकेतील उतारा देतो म्हणजे

वाचकांना त्याची यथार्थ कल्पना येईल 'तत्र च वेदे पूर्वापरविरोधादिना वास्तवार्थविचिकित्सायां प्रसक्तायां तद्वारणाय मीमासाशास्त्रं रचितम्। तत्र कर्मसाधिकाना श्रुतीना विचाररूपो भाग पूर्वकाड-प्रथमतन्त्र शब्दव्यवहृतो मीमासात्वेन ख्यातिं गत । उपसनाज्ञानसाधिकाना श्रुतीना विचाररूपो वेदान्तत्वेन प्रसिद्धो भाग शारीरक शब्दवाच्यो वैयासिक ोन ख्यातिं गतः॥' या उताऱ्यावरून मीमासा व वेदात या उभयशास्त्राची थोडक्यात पण स्पष्ट कल्पना माडून दाखविण्यात आली आहे, हे स्पष्ट होते•

पराशर-माधव हे दोन ग्रंथ लिहून तयार झाल्यावर त्यानी जैमिनीच्या मीमासा शास्त्रावर न्यायमाला हा श्लोकबद्ध ग्रथ लिहावयास घेतला ही गोष्ट यापुढील वचनावरून स्पष्ट होते

श्रुतिस्मृतिसदाचारपालको माधवो बुधः।
स्मार्तं व्याख्याय सर्वार्थं द्विजार्थं श्रौतउद्यत ॥ ५ ॥
प्रणम्य परमात्मान श्रीविद्यातीर्थरूपिणम्।
जैमिनीय न्यायमाला श्लोकैः सगृह्यते स्फुटम् ॥ ६ ॥

यावचनावरून जैमिनि न्यायमाला हा ग्रथ पराशर-माधव याग्रथानंतर लिहिण्यात आला, हें उघड होतें

हा ग्रथ लिहून तयार झाल्यावर तो बुक्कभूपालास दाखविण्यात आला त्यांना पराशर-माधव व कालमाधव या ग्रथाचा परिचय होताच तशात हा ग्रंथ पाहून राजे फार खुष झाले• व त्याची भर दरबारात मोठी प्रशंसा केली

पण त्यांनी अशी एक सूचना केली कीं, ग्रथ उत्कृष्ट असला तरी सामान्य जनांस समजण्यास जरा अवघडच आहे तर तो टीका जोडून आणखी थोडा अधिक स्पष्ट,सुलभ व सुगम केल्यास खरोखर रत्नाला कोंदणात बसविल्यासारखें होईल या भाषणातील इंगितार्थ चाणाक्ष माधवाचार्यांनी ओळखिलें आणि त्या न्यायमाला ग्रथावर विस्तृत टीका लिहून, त्याला 'जैमिनीय-न्यायमाला-विस्तर' असें नाव दिलें

ही गोष्ट ग्रंथाच्या प्रारंभीच स्पष्ट करून सांगितली आहे ती अशी —

'स खलु प्राज्ञजीवातुः सर्वशास्त्रविशारदः।
अकरोज्जैमिनिमते न्यायमाला गरीयसीम् ॥ ५ ॥
तां प्रशस्य सभामध्ये वीर श्रीबुक्कभूपतिः।
कुरु विस्तरमस्यास्त्वमिति माधवमादिशत् ॥ ६ ॥
निर्माय माधवाचार्यो विद्वानानन्ददायिनीम्।
जैमिनीय न्यायमालां व्याचष्टे बालबुद्धये ॥ ७ ॥

माधवाचार्यांनी बुक्क नरेशाच्या इच्छेप्रमाणे न्यायमाला ग्रंथावर विस्तृत व्याख्या करण्यास प्रारंभ केला पण तो त्या नृपतीच्या हयातीत पूर्ण न होतां पुढे त्याच्या चिरंजीवाच्या-म्हणजे हरिहर द्वितीय-याच्या आमदानीत पूर्ण झाला, असे ग्रंथाच्या शेवटच्या शेऱ्यावरून दिसून येते तो शेरा असाः—

'वेदानां स्थितिकृत्पुरो हरिहरोऽभूत्सूत्रकृज्जैमि-।
निस्तद्भाष्य शबरोऽभ्यधाद्वदितवांस्तद्विस्तर माधवः ॥

या ग्रंथात एकदर बारा अध्याय, नऊशे सात अधिकरणें, व सत्तावीसशे पंचेचाळीस सूत्रे आहेत ग्रंथ यज्ञविषयक म्हणजे कर्मकांडपर आहे ग्रंथ पुणे येथील आनंदाश्रममुद्रणालयांत छापला असून, तो ७०४ पृष्ठांचा आहे याशिवाय पुढें अनेक महत्त्वाचे ग्रंथ त्यानीं रचिले असून, ते सर्व वेदांत-विषयक आहेत व ते आश्रमांतर करून संन्यास दीक्षा घेतल्यानंतरचे आहेत त्याचा उल्लेख पुढे करण्यात येईल

---

## प्रकरण १६ वे

# वेद्-महाभाष्यकार-श्रीसायणाचार्य

ये पूर्वोत्तरमीमांसे ते व्याख्यायाति सग्रहात् ।
कृपालुः सायणाचार्यो वेदार्थं वक्तुमुद्यत. ॥ ११ ॥
ब्राम्हण कल्पसूत्रे द्वे मीमांसां व्याकृतिं तथा ।
उदाहृत्याथ तै. सर्वैर्वेदार्थः स्पष्टमीर्यते ॥ १२ ॥

(तैत्तिरीय सहिता-उपोद्घात)

बुक्क नरेश हे जसे रणात शूर व राजकारणात धुरंधर होते, तसेंच ते मोठे विद्याप्रेमी व धर्मजिज्ञासुहि होते अर्थात् त्याचें सगळे लक्ष राजकारणात व राजवैभवांत रगून व गुरफटून न राहता, धर्माकडे-ज्ञानाकडेहि-त्यांची ओढ होती कुलगुरु माधवाचार्यांनी लिहिलेला 'पराशर-माधव' हा धर्मशास्त्रावरचा अमोल्य असा महाग्रंथ व त्याचप्रमाणें मीमासा शास्त्रावर विविधमाहितीनें नखशिखात नटलेला विद्वत्तापूर्ण ग्रंथ निर्माण करणाऱ्या पडितकुलशेखर माधवाचार्यांविषयीं त्याच्या मनात गाढ प्रेम, निस्सीम भक्ति व नितांत आदर उत्पन्न झाला असला तर त्यात नवल मानण्याचें कारण नाहीं गुणी व विद्याप्रेमी माणसाचा स्वभावच आहे तो !

नरेशांना तो ग्रथ पाहून मनात अशी इच्छा उत्पन्न झाली कीं, अशाच ठशाचा वेदांचा अर्थ सुबोध व सुलभ करून सागणारा आणखी एखादा सुदर ग्रथ त्यांच्या दिव्य व प्रभावी लेखणीतून बाहेर पडून जगास वाचावयास मिळाला, तर काय सोनें होईल ! म्हणून त्यानी माधवाचार्या-जवळ बोलता बोलता सहज गोष्ट काढली कीं, आचार्यदेवानी वेदावर भाष्य लिहून आपणास व त्याबरोबरच जगास वेदार्थामृत पाजल्यास फारच उपकार होतील ! जग त्याचे कायमचे ऋणी होऊन राहील ! गुरुदेव तीं

इच्छा पूर्ण करण्यास पूर्ण समर्थ आहेत, मग होईल का तो अनुग्रह ? मला वेदार्थ जाणण्याची इच्छा झाली आहे तर गुरुदेवानी ती पूर्ण करून मला धन्य करावे !!

तेव्हा आचार्यदेव त्यास म्हणाले — महाराज ! आपली इच्छा फार स्तुत्य आहे ती कोण झिटकारील ? आपली इच्छा जरूर तृप्त करण्यात येईल पण मला असे सागावेसे वाटते कीं, ही गोष्ट सिद्धीस नेण्यास माझ्यापेक्षा माझा भाऊ सायण हा अधिक योग्य आहे त्याच्यावर हें काम सोपविल्यास अगदी चोख होईल व आपल्याला खरा आनद व धन्यता वाटेल तेव्हा हे काम आपण त्याच्यावर सोपविल्यास बरे होईल'

हे माधवाचार्यांचे भाषण ऐकून बुक्कराजानी सायणाचार्यांस आपले मनोगत कळवून, त्यास वेदावर भाष्य लिहिण्यास कळकळीचा आदेश दिला हा मजकूर सायणाचार्यांनी लिहिलेल्या तैत्तिरीय सहिताभाष्याच्या उपोद्घातात साराश रूपाने प्रारंभीच आढळतो, तो असा' —

'वागीशाद्या' सुमनस सर्वार्थानमुपक्रमे ।
य नत्वा कृतकृत्या' स्युस्त नमामि गजाननम् ॥ ६ ॥

यस्य नि.श्वसित वेदा यो वेदेभ्योऽखिल जगत्
निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थमहेश्वरम् ॥ ७ ॥

तत्कटाक्षेण तद्रूपं दधत् बुक्क महीपति. ।
अन्वशान्माधवाचार्यं वेदार्थस्य प्रकाशने ॥ ८ ॥

स प्राह नृपति राजन्सायणार्यो ममानुजः ।
सर्वं वेत्येष वेदानां व्याख्यातृत्वे नियुज्यताम् ॥ ९ ॥

इत्युक्ते माधवार्येण वीरबुक्कमहीपति ।
अन्वशात्सायणार्यं वेदार्थस्य प्रकाशने ॥ १० ॥

ये पूर्वोत्तरमीमांसे ते व्याख्यायातिसग्रहात् ।
कृपालुः सायणाचार्यो वेदार्थं वक्तुमुद्यतः ॥ ११ ॥

ब्राम्हण कल्पसूत्रे द्वे मीमांसां व्याकृतिं तथा।
उदाहृत्याथ तैः सर्वैर्वेदार्थः स्पष्टमीर्यते ॥ १२ ॥

(तैत्तिरीयसंहिता-उपोद्घात)

सारांशरूपानें वरील श्लोकाचा मथितार्थ वर देण्यांत आलाच असल्या-मुळें त्याची आता येथें पुनरावृत्ति करण्याचे कारण नाहीं असो बुक्क भूपालाच्या जगत्कल्याणकारी शुभेच्छेस मान देऊन, श्री सायणाचार्य हे वेदग्रंथावर भाष्य लिहिण्यास प्रवृत्त झाले या पंडितरत्न आचार्यदेवानी विजयनगरचे मन्त्रिपद संभाळून अथाग अशा चारहि वेदावर सुंदर, सुगम व सविस्तर असे अमरकीर्ति भाष्य लिहिण्यास लेखणी हातात धरली आणि अश्रांत परिश्रम व उदंड उद्योग करून, चारहि वेद-ग्रंथावर सर्वांगपरिपूर्ण अशीं सुलभ व सुबोध भाष्ये लिहून, जगाला थक्क करून कायमचे ऋणी करून ठेविले आहे! अर्थात् तीं कशीं व केव्हा लिहिलीं गेलीं याचा त्या त्या ग्रंथातून छडा घेत त्याप्रमाणें भाष्यलेखनाचा क्रम व हेतु देत जातो

प्रथम भाष्यलेखनास हात घातला, तो यजुर्वेदापासून घातला याचें कारण असें कीं, तो अध्वर्यूचा कर्मप्रधान वेद आहे कर्मकांडांत-म्हणजे यज्ञोपासनेंत-चारहि वेदात यजुर्वेदासच प्रमुख स्थान असून, अध्वर्यु हा त्याचा विश्वस्त आहे यज्ञात जें कर्म सांगितलेलें असतें, तें यजुर्वेदोक्तच करावयाचें असतें ऋग्वेद व सामवेद हेहि महत्वाचे वेद आहेत, हें खरें. पण ते यज्ञकर्मांचे अवयवस्थानीं आहेत ऋग्वेदाला वाणीचें स्थान दिलें, तर यजुर्वेदाला मनाचें स्थान दिले पाहिजे, व तसा वेदाचा आदेश आहे. (वागेवर्चश्च सामानिच मन एव यजूंषि श प ४-६-७-१९)

हेंच दुसऱ्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे ऋग्वेदाने होतृकर्म करावें आणि सामवेदानें उद्गीथ व यजुर्वेदानें आध्वर्यव करावें (ऋग्वेदेनैव होत्रमकुर्वत। यजुर्वेदेनाध्वर्यवं सामवेदेनोद्गीथम्' श. प ११-५-८-४) म्हणून जे यजुर्वेदाचे अध्ययन करतात, ते अध्वर्यु मनोरूप असून, त्यानी

प्रैष-म्हणजे आज्ञा-दिल्याशिवाय इतर कोणतेंहि म्हणजे होतृ व उद्गातृकर्म केलें जात नाहीं ('ये यजुषा चरन्ति मनस्ते भवन्ति। तस्मान्नानभिप्रेषित-मध्वर्युणा किंच न क्रियते।' श प ४-६-७-१९), अशी यज्ञकार्यांतील व्यवस्था असल्यामुळ यजुर्वेदास तेथें प्रधान स्थान मिळालें आहे आणि म्हणून सायणाचार्यांनी यजुर्वेदांतर्गत तैत्तिरीय संहितेवर भाष्य लिहिण्यास प्रथम सुरवात केली आणि ते योग्यच झालें

शिवाय दुसरे कारण असें कीं, ते आचार्य कृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीय शाखेचे असल्यामुळें त्या आपल्या वेदाला अग्रपूजेचा मान दिला, हेंहि यथायोग्यच झालें अर्थात् या कामीं त्यानी आपल्या वडील भावाची म्हणजे माधवाचार्यांची मदत घेतली नसेल, असें म्हणणें व मानणें हें योग्य होणार नाहीं- पण भाष्यकर्त्यांचा अग्र-मान सायणाचार्यांसच दिला पाहिजे व खरोखर तो त्यांच्याच आहे याविषयीं थोडा खुलासा करणे अवश्य आहे पण तो येथें न करता पुढे केव्हातरी प्रसगानुरूप करू

याप्रमाणे तैत्तिरीय संहितेवर भाष्य लिहून पूर्ण झाल्यावर दुसरा ग्रंथ घेतला, तो तैत्तिरीय ब्राम्हण हा होय ही गोष्ट त्याच्या या पुढील वचना-वरून उघड होते

'व्याख्याता सुखबोधाय तैत्तिरीयक संहिता।
तद् ब्राम्हणं व्याकरिष्ये सुखेनार्थविबुद्धये॥'

हें वचन तैत्तिरीय ब्राम्हण भाष्याच्या प्रारंभीच लिहून, ग्रंथ लेखनाचा क्रम स्पष्ट करण्यांत आला आहे

हें ब्राम्हण भाष्य लिहून झाल्यावर मग ते तैत्तिरीय आरण्यकाकडे वळले आणि त्यावरहि भाष्य लिहून यजुर्वेदाची वाङ्मय सेवा पूर्ण केली याविषयीं आधार सांपडतो तो असा —

'व्याख्यायता सुखबोधार्थं तैत्तिरीयक संहिता।
तद्ब्राम्हण च व्याख्यातं शिष्टमारण्यक तथा॥'

यावचनारून असे म्हणण्यास आता हरकत नाहीं कीं, प्रथम त्यांनी संहिता, मग ब्राम्हण आणि नंतर आरण्यक अशा क्रमाने ग्रंथ घेऊन, त्यावरील भाष्यें लिहून काढलीं

हे ग्रंथ त्यांच्याच हातचेच आहेत, असे स्पष्ट मानण्याला त्या त्या ग्रंथाच्या शेवटीं त्यांनी जो शेरा मारला आहे, तो सर्व संशय दूर करणारा आहे तैत्तिरीय संहितेच्या प्रत्येक अनुवाकाच्या शेवटीं शेरा आहे तो असा -

'इति श्रीसायणाचार्य विरचिते माधवीये वेदार्थप्रकाशे कृष्ण-यजुर्वेदीय तैत्तिरीय संहिताभाष्ये प्रथमखंडे प्रथम-प्रपाठके चतुर्दशोऽनुवाक ॥'

हा झाला संहितेचा शेरा त्यानंतर ब्राम्हण ग्रंथाच्या शेवटीं आढळतो तो असा —

'इति श्रीमद्वीरबुक्कणसाम्राज्य-धुरधर-श्रीमत्सायणाचार्य विरचिते माधवीये वेदार्थप्रकाशे कृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीयब्राम्हण भाष्ये प्रथमकाण्डे प्रथमप्रपाठक समाप्तः

आणि आरण्यकावरील शेरा आहे तो असा —

'इति श्रीमत्सायणाचार्य विरचिते माधवीये वेदार्थप्रकाशे कृष्णयजुर्वेदीय तैत्तिरीयारण्यके प्रथमप्रपाठके प्रथमोऽनुवाक ।'

हे जे वरील तीन शेरे आहेत, त्यातील 'श्रीमत्सायणाचार्यविरचिते' हे शब्द तीनहि ग्रंथावर भाष्यलिहिणारे हे श्रीमत्सायणाचार्य हेच होत, याचे स्पष्ट द्योतक नाहींत काय? मग आता संशयाला जागा कोठें राहिली? सायणाना हा मान न देणारे जे काही उथळ विचाराचे विद्वान पंडित आहेत, त्यांचे या शेऱ्याकडे मुळींच लक्ष गेलें नाहीं, ही मोठ्या आश्चर्याची व खेदाची गोष्ट होय सायणानी आपल्या भाष्याला 'वेदार्थ-प्रकाश' हें नाव दिलें आहे, हेंहि त्यावरूनच स्पष्ट होतें

याप्रमाणें यजुर्वेदावर म्हणजे संहिता-ब्राम्हण-आरण्यक या ग्रंथावर-भाष्य लिहून झाल्यावर मग त्यांनी बुक्करायाच्या इच्छेप्रमाणें ऋग्वेदावर भाष्य लिहिण्यास हातीं घेतलें ही गोष्ट ऋग्वेद भाष्याच्या प्रस्तावनेंत त्यानी स्पष्ट केली आहे ती अशी —

'आध्वर्यवस्य यज्ञेषु प्रधान्याव्द्याकृतः पुरा।
यजुर्वेदोऽथ होत्रार्थमृग्वेदो व्याकरिष्यते ॥

(ऋग्वेद-भाष्य, प्रस्तावना)

या वचनावरून यजुर्वेदानंतर ऋग्वेदभाष्य लिहिण्यास प्रारंभ केला, हें निर्विवाद स्पष्ट झाले

याचें कारण असे कीं, अध्वर्यूच्या नतर यज्ञानुष्ठानांत होतृकर्मास महत्वाचें स्थान आहे ऋग्वेदाचा प्रतिनिधि जो 'होता' पुरोहित, त्यानें देवांना पाचारण केल्याशिवाय देव यज्ञांत उपस्थित होतच नाहींत व त्यानें त्याची प्रशंसा व गुणगान केल्याशिवाय प्रसन्न होत नाहींत आणि हें होतृकर्म ऋग्वेदाचा विषय असून. देवाना आवाहन, त्याचे स्तुतिस्तोत्र व त्याची प्रार्थना या गोष्टी ऋग्वेदाच्या क्षेत्रात मोडतात अर्थात् हें होतृकर्म ऋग्वेदानेंच करावयाचें असते ('ऋग्वेदेनैव होत्रमकुर्वत' श प ११-५-८-४) म्हणून यजुर्वेदानंतर ऋग्वेद घेतला, हें परिपाठाच्या दृष्टीनें ठीकच झालें

हें ऋग्वेद भाष्यहि सायणाचार्यांनीच लिहिलें, या गोष्टीचा पुष्टिपुरावा या पुढील वचनावरून स्पष्ट शाबीत होतो वाचकाच्या माहितीसाठीं आम्हीं तो येथें खाली देतो उपक्रम व उपसहार ही दोन्हीं वचनें अशीं आहेत. प्रस्तावनेतला मजकूर आहे तो असा —

यत्कटाक्षेण तद्रूपं दधद्बुक्कमहीपतिः।
आदिशन्माधवाचार्यं वेदार्थस्य प्रकाशने ॥ ३ ॥
स प्राह नृपतिं राजन् सायणार्यो ममानुजः।
सर्वं वेत्त्येष वेदानां व्याख्यातृत्वेन युज्यताम् ॥ ४ ॥
इत्युक्तो माधवार्येण वीरबुक्क महीपतिः।
अन्वशात् सायणाचार्यं वेदार्थस्य प्रकाशने ॥ ५ ॥
ये पूर्वोत्तरमीमांसे ते व्याख्यायातिसंग्रहात्।
कृपालुः सायणाचार्यो वेदार्थं वक्तुमुद्यत. ॥ ६ ॥

आध्वर्यवस्य यज्ञेषु प्राधान्याव्द्याकृतः पुरा ।
यजुर्वेदोऽथ होत्रार्थमृग्वेदो व्याकरिष्यते ॥ ७ ॥
एतस्मिन् प्रथमोध्याय. श्रोतव्य संप्रदायतः ।
व्युत्पन्नस्तावता सर्वं बोद्‌धु शक्नोति बुद्धिमान् ॥ ८ ॥

ही प्रस्तावना झाली पुढें ग्रंथ सपल्यावर प्रत्येक अष्टकाच्या शेवटीं हा पूढील शेरा पहावयास मिळतो.

'श्रीमद्राजाधिराज–परमेश्वरवैदिकमार्गप्रवर्तक–श्रीवीरबुक्क भूपाल साम्राज्यधुरंधरेण सायणाचार्येण विरचिते माधवीये वेदार्थप्रकाशे ऋकसहिताभाष्ये प्रथमाष्टकेऽष्टमोध्याय ॥'

हीं दोन वचने— विशेषत शेवटचें वचन–विचारात घेतलें म्हणजे सायणाचार्यांच्या भाष्यकर्तृत्वाबद्दल संशय मुळींच राहत नाहीं.

ऋग्वेदाचें भाष्य लिहून झाल्यावर मग सायणाचार्य सामवेदाकडे वळले त्यानी स्पष्टच म्हटलें आहे कीं–

'यज्ञं यजुभिरध्वर्युर्निमिमीते ततो यजुः ।
व्याख्यातं प्रथमं पश्चाद्दचां व्याख्यानमीरितम् ॥
साम्नामृगाश्रितत्वेन सामव्याख्याऽथ वर्ण्यते ।
अनुतिष्ठासु जिज्ञासावशाद् व्याख्याक्रमोद्ययम् ॥ ११ ॥
(वे भा. भू सं पृ ६२)

यावचनावरून ऋग्वेदानंतर सामवेद घेतला, याला आणखी निराळा पुरावा नको हें झाल्यावर सामवेदीय ब्राम्हण ग्रथाकडे त्यांची लेखणी वळली,

'व्याख्यातावृग्यजुर्वेदौ सामवेदोऽपि संहिता ।
व्याख्याता, ब्राम्हणस्याथ व्याख्यानं संप्रवर्तते ॥
(वंश–ब्राम्हण–भाष्य)

याप्रमाणे सामवेदाचा परामर्श घेतल्यावर पुढें शुक्ल यजुर्वेदीय काण्व-संहिताकडे दृष्टि वळली त्याच्या पूर्वी माध्यदिन संहितेवर उवट आचार्यांचें भाष्य लिहून प्रसिद्ध झाले होते काण्वसंहितेवर मात्र नव्हते. म्हणून त्यानी आता काण्वसहितेवर भाष्य लिहिण्यास प्रारंभ केला पण दुर्दैवानें ते पूर्ण झालें नाही फक्त पहिल्या वीस अध्यायावरच त्याची समाप्ती झाली

'व्याख्याता काण्वशाखीया सहिता पूर्वविंशति ।
सायणाचार्येण स्पष्टी कृत्य न चोत्तरा ॥'

(काण्वभाष्य)

याश्लोकावरून काण्वभाष्य अर्धेच राहिले, असे म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं याप्रमाणे बुक्कराजाच्या आमदानींत सायणाचार्यांनी एकदर वेदग्रंथांवर भाष्य लिहून संपविलें, त्याचा तपशील खालील प्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| १ तैत्तिरीय सहिता | ९ षड्विंशब्राम्हण |
| २ तैत्तिरीय ब्राम्हण | १० सामविधान ब्राम्हण |
| ३ तैत्तिरीय आरण्यक | ११ आर्षेय ब्राम्हण |
| ४ ऋग्वेद सहिता | १२ देवताध्याय ब्राम्हण |
| ५ ऐतरेय ब्राम्हण | १३ उपनिषद् ब्राम्हण |
| ६ ऐतरेय आरण्यक | १४ सहितोपनिषद् ब्राम्हण |
| ७ सामवेद सहिता | १५ वश ब्राम्हण |
| ८ ताड्य ब्राम्हण | १६ काण्वसहिता |

याप्रमाणें एकदर सोळा ग्रथावर सुंदर व विस्तृत असें विद्वत्ताप्रचुर महाभाष्य बुक्करायाच्या कारकीर्दींत लिहून पूर्ण करण्यात आलें सायण हे प्रथम इ स १३६४-१३६५ मध्यें उदयगिरीहून बुक्कराजाच्या दरबारात मत्री या नात्यानें आले तेथें आल्यावर वेदमार्गप्रवर्तक धर्मजिज्ञासु बुक्क-नरेशाच्या प्रोत्साहनाने व ज्येष्ठबधु पतअमात्य माधवाचार्य याच्या प्रेरणेनें मंत्रीपद संभाळून, वेदासारख्या महत्वाच्या दुर्बोध ग्रंथावर सुलभ व सुबोध

भाष्य लिहिण्याचे महाप्रयासाचे महत्कार्य अंगावर घेऊन, ते सतत उद्योग व दीर्घपरिश्रम करून, जवळ जवळ सोळा वर्षांच्या अल्पावधीत उपनिर्दिष्ट वैदिक साहित्याचा प्रचंड वाङ्मय मेरु यशस्वीपणे रचून ठेवण्यात आला !! आणि वेदजिज्ञासु जगाला दिव्य ज्ञानाचे मधुर अमृत पाजून, त्याला अखंड व उदंड ऋणी करून ठेविलें !! अशा कृपाळु आचार्य देवाचें कौतुक व पुण्यस्मरण न करण्यासारखा कृतघ्न प्राणी असा कोण आहे ?

इतकेंच नव्हे तर त्या अवधीतच 'पुरुषार्थ सुधानिधि' या नावाचा एक महत्वाचा पौराणिक ग्रंथहि लिहून काढला हा ग्रंथ बुक्क राजाच्या विनंतीवरून सामान्यजनाच्या उपयोगार्थ लिहिण्यात आला असून, त्याबद्दल आचार्य लिहितात ते असे.—

'तं सर्वविद्यानिलयं तत्वविद् बुक्क-भूपतिः ।
सत्कथाकौतुकी हर्षादपृच्छत् राजशेखरः ॥
श्रुतानि त्वन्मुखादेव शास्त्राणि विविधानि च ।
पुराणोपपुराणानि भारतं च महामते ॥
सर्वाण्येतानि विप्रेन्द्र गहनान्यल्पमेधसाम् ।
ज्ञातुं कच्चिन्नशक्यन्ते पुरुषार्थार्थिनामपि ॥
तस्माद्व्याख्यानरूपेण सुखोपायानि सुव्रत ।
पुरुषार्थोपयोगीनि व्यासवाक्यानि मे वद ॥
तस्य तद्वचनं श्रुत्वा युक्तार्थं बुक्कभूपतेः ।
प्रशस्य तं मुदा युक्तो माधवः प्रत्यभाषत ॥
'शृणु त्वं भव्यया बुद्ध्या वाचं मे पुरुषार्थदाम् ।
अयं हि कृतिनामाद्य सायणार्यो ममानुजः ॥
पुराणोपपुराणेषु पुरुषार्थोपयोगिनीः ।
उपदिष्टा मया राजन् कथास्ते कथयिष्यति ॥
'इति प्रसाद्य राजानं सायणाचार्यमुदीक्षत ।
सायणार्योऽग्रजेनोक्तः प्राह बुक्कमहीपतिम् ॥

साधु साधु महाप्राज्ञ बुद्धिस्ते धर्मदर्शिनी।
वदामि व्यासवाक्यानि लोकानां हितकाम्यया॥

या ग्रंथाचे एकदर चार विभाग असून पहिला धर्मस्कंध असून, त्यात अठ्ठेचाळीस अध्याय आहेत दुसरा विभाग अर्थ विषयावर असून, त्यात तेवीस अध्याय, तिसरा काम असून त्यात चौदा अध्याय, व चौथा मोक्षपर असून, त्यात सतरा अध्याय आहेत म्हणजे एकदर १०२ अध्याय असून, तीस विषयावर विवेचन आहे हा ग्रंथ धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारहि पुरुषार्थविषयावर लिहिलेला असून तो इतका उत्तम व बोधप्रद झाला की, बुक्करायाला तो श्रवण करून अत्यंत हर्ष व मोठी धन्यता वाटली! त्या प्रसंगी त्याच्याकडून हे खालील धन्योद्गार आपोआपच निघाले त्याचे शेवटचे उद्गार त्या महाग्रंथाविषयीं हे असे आहेत

श्रुत्वा त्वयोदितं विद्वन् पुरुषार्थसुधानिधिम्।
कृतार्थोस्मि द्विजश्रेष्ठ इति राजा तमब्रवीत्॥
य इदं शृणुयान्नित्य पुरुषार्थसुधानिधिम्।
अनायासेन तस्यैव करस्थाः सर्वसिद्धयः॥

पुरुषार्थ-सुधानिधि

यावरून हा ग्रंथ झाला तरी सायणाचार्यांनीच बुक्काच्या इच्छेवरून लोककल्याणार्थ रचला, याविषयी आता अधिक लिहिण्याची जरूरी नाहीं एकदरींत सांगावयाचा मुद्दा हा की बुक्कराजाच्या कारकीर्दींत वेदशास्त्रावर व पुराणोपपुराणावर सायणाचार्यांनी अनेक महत्त्वाचे व उद्बोधक ग्रंथ लिहून, केवळ बुक्कनरेशालाच नव्हे तर सर्व वेदप्रेमी व धर्मजिज्ञासु जगाला उदंड उपकृत करून ठेविले आहे, याविषयी कोणी वाद माजवील असं आम्हास वाटत नाहीं

---

## प्रकरण १७ वे

# दक्षिण दिग्विजय

'ततोभूद्बुक्कभूपाल सर्वभूपकुलाग्रणी. ।
यत्प्रतापानले सर्वे पतगंत्यरिभूभृत ॥ ७ ॥
कर्नाटकलक्ष्मी' सविलासमास यस्मिन्महीपे महनीयकीर्तौ।
भूमिस्तथैवाप वसुधरात्वं स्थिरेति नाम
प्रथमं गुणौघै. ॥ ८ ॥

(एपि इंडिका, खंड १७, नं १४, पृ ११८)

माधवाचार्य ही मोठी अलौकिक विभूति खरी त्याची दृष्टि विशाल असून, अवधान सर्वत्र असे राजकारणात उदड जागृत राहून, राज्यात व बाहेर कोठें काय चालले आहे याची बित्त बातमी काढण्यासाठीं त्याचे विश्वासूक गुप्त हेर सचार करून, त्याना दररोज बातमी पुरवीत असत माध्वमताचे अक्षोभ्यतीर्थ व श्रीवैष्णपथाचे वेदाततीर्थ व इतर प्रमुख व वजनदार आचार्य याचे त्याना चागलें पाठबळ लाभलें होते या काल-खडात धर्मपीठाच्या आचार्यांचे समाजावर हुकमी वर्चस्व होतें यासर्व आचार्यवर्यांनी मुसलमानांविरुद्ध हिंदुसमाजाची अभेद्य फळी निर्माण करण्यांत माधवाचार्यांना पाठिंबा दिल्यामुळे, विजयनगरात प्रबल हिंदुराज्य निर्माण करण्यात त्याना फार मोठे यश लाभलें, यात तिळप्राय संदेह नाहीं.

उत्तरेकडच्या मुसलमानाना कृष्णेच्या पलीकडे रोखून ठेविल्यामुळें त्यांची भीति सर्वस्वी नाहीं, तरी आता पुष्कळच कमी झाली होती पूर्वेकडचा उदयगिरीचा रस्ताहि रोखून धरल्यामुळें वारंगळच्या पठाणांना तो मार्गहि बंद झाला असून, त्याच्या पुंडखोर आक्रमणाला चांगलाच पायबद बसला होता

खाली दक्षिणेत मात्र अजून राक्षसी सुलतानशाही धुडगूस घालीत होती तेथला मदुरेचा सुलतान माजला असून, त्याचा जाच व जुलूम जनतेला असह्य झाला होता त्याची तेवढी उचल बागडी झाल्यास कृष्णेखालचा सगळा दक्षिणेचा प्रात सलग विजयनगर साम्राज्यात मोडणार होता माधवाचार्यांचा डोळा आता त्या प्रदेशावर जडून, योग्य प्रसगाची ते मार्गप्रतीक्षा करीत होते

इतक्यात सुदैवानें तो प्रसंगहि आला इ स १३६९-७० सालची गोष्ट त्यावेळी मदुरेत अल्लाउद्दीन शिकंदर हा सुलतानाच्या तक्तावर असून, त्यानें राज्यात हिंदूचा अनन्वित छळ करून मोठा अनर्थ माजविला होता

देवळातील देवपूजा बद पाडली होती आणि वेदघोषाला प्रतिबंध करण्यात आला होता हिंदूना सक्तीने बाटविण्याची मोहीम जोरात चालली असून, दिनेदिने जुलुमाचे नवीन नवीन फर्मानें निघत होतीं तेथील प्रजा फार त्रासली असून, हिंदूचे जिणे अत्यंत केविलवाणें झाले होते मदुरेच्या तक्रारी रोज माधवाचार्यांच्या कानावर येऊ लागल्या देवधर्मावर चाललेला सुलतानी छळ व जुलूम याना पायबद घालण्याचे माधवाचार्यांच्या मनांत राहून राहून डोकावू लागले

त्याचवेळेस चोळ देशच्या शंभुवराय राजाने विजयनगरा विरुद्ध गडबड उठविली होती मागे एकदा उदयगिरीच्या महामंडलेश्वराने-म्हणजे सायणाचार्यांनी - त्याचा खरपूस समाचार घेतला होता तरी त्याची खुमखुम पूर्ण जिरली नव्हती अलीकडे पुन त्याने डोके वर उचलून, विजयनगरच्या सीमाप्रदेशात गोंधळ व गडबड उठविली

या शभुवरायाच्या फुसलावणीने त्याच्या शेजरच्या वन्यराजानेहि पुंडाई माजविली या सर्व गोष्टी माधवाचार्यांच्या कानावर आल्याबरोबर त्यांनी भावी संकट ओळखून, सायणाचार्यांच्या सल्ल्याप्रमाणे वेळींच त्याचा बदोबस्त करण्याचें मनांत योजून, त्याप्रमाणे राजास सल्ला दिला व विश्व प्रयत्न करून सुलतानाचा काटा काढून टाकण्यास मोठ्या आग्रहानें सुचविलें

बुक्कराजासहि ती गोष्ट पटली व त्यानी आपल्या कम्प नावाच्या शूर

मुलास त्याप्रमाणे हुकूम दिला कम्पराय हा त्यावेळीं कोलार प्रांताच्या सुभेदारीवर असून, मूळबागल येथे रहात होता तो मोठा शूर व कडवा लढवय्या असून, त्याच्या दराऱ्यानेच सुलतान जरा दचकून व वचकून होता बुक्करायाने शंभुवराय, वन्यराज व शेवटीं मदुरेचा सुलतान या तीघावरहि चाल करून, त्याची नांगी जिरविण्यास फरमाविलें व त्याच्या मदतीला विजयनगरचे प्रचंड सेनाबल उभे केले व मोहिमेचीं महत्वाचीं सूत्रे विजयनगरहून सायणाचार्यांच्या मार्गदर्शनानुरूप हलू लागलीं

कम्पवडेयरच्या अध्यक्षतेखालीं व सायणाचार्यांच्या मार्गदर्शनानुरूप विजयनगरची मोहीम दक्षिणेकडे हलली प्रथम कांजीवरमच्या शंभुव-रायावर हल्ला चढवून, त्याचा रणांत पार धुव्वा उडवून, मुठींत जीव धरून त्यास शरण यावयास लावले याखेपेस शंभुवरायची हड्डी चांगली नरम झाल्यामुळे पुढें तो कायमचा लुला पडला त्यानंतर वन्यराजालाहि जेरीस आणून त्याचीहि खोडकी जिरविली या दोन पुंडखोर राजाचा पक्का मोड करून, नीट बंदोबस्त केल्यावर, विजयनगरचा विजयी मोर्चा आता मदुरेच्या वाटेस लागला

या मोहिमेत वाघासारखा पराक्रम करणारा सिंहाच्या छातीचा कम्प शार्दूल हा त्या मोहिमेचा सेनानायक असून. त्याच्या दिमतीस त्याच्याच तोडीचे चांगले युद्धतंत्रांत कसलेले वीर गोपणार्य व मंगप्पा दनायक हे होते शिवाय विजयनगरच्या सैन्यांत याखेपेस ज्या शिपायांचा समावेश करण्यांत आला होता, ते सर्व चांगले रणयोद्धे असून, त्याच्यात प्रचंड रणोत्साह मुसमुसत होता

मदुरेवर विजयनगरचें सैन्य चाल करून येत आहे, ही बातमी अल्लाउद्दीन शिकंदर शहास लागताच तोहि मोठी तयारी करून सामोरा आला दोघांची मदुरेच्या शेजारीच गांठ पडली तेथें जी रणचंडी भडकली, ती सांगून पुरवत नाही हिंदू या खेपेस इतक्या धैर्यानें व निकरानें लढले की, त्या युद्धाला राम-रावण युद्धाचीच उपमा शोभेल कडव्या तुरुकांनी प्रथम मोठ्या निकराचा हल्ला चढविला. पण त्यांचा मारा

या खेपेस विजयनगरच्या सैन्यापुढे फार फिक्का पडला ! शौर्याची शर्थ केली तुरुष्कांनी, पण सगळे पडले पालथ्या घागरीवर पाणी ! हिंदूंची व तुरुष्कांची मोठी झुंज लागली ! तलवार तलवारीस भिडली ! रणचंडी भडकली ! वीरश्री उफाळली ! कोणी कोणास दाद देईना! रणदेवतेनं उग्र स्वरूप धारण केलं आणि रक्ताचे पाट वाहू लागले !

याप्रमाणें तुम्मळ संग्राम चालला असता, अकस्मात चमत्कार झाला ! हिंदूंनी मुसलमानांची फळी फोडली ! आणि वाघाच्या छातीने आंत धुमकून, सुलतानी सैन्याची लांडगेतोड चालविली ! यावेळेस हिंदू सैन्यात प्रचंड वीरश्रीने संचार केला होता ! हिंदूंचा मारा सहन न होऊन मदुरेचे सैन्य जीव घेऊन अखेर सैरावैरा पळत सुटले ! आणि विजयनगरचा जय झाला ! मदुरा पडली ! व विजयनगर विजयी झाले !!! दक्षिणेतील सुलतानशाहीचा अंत झाला !! व विजयनगर साम्राज्याला भरती चढली !!!

या चकमकींतून अल्लाउद्दीन सुलतानने तें सर्व रणदृश्य पाहून, आपला जीव वाचविण्यासाठी पळून जाण्याचा प्रयत्न केला पण त्याचे नशीब भरून आलें होतें त्याला अल्ला काय करणार ? तो जीव घेऊन पळत असतां मंगप्पा दण्डनायकानें त्याचा पाठलाग करून त्यास गाठलें ! व घोड्यावरून खाली खेंचून, त्यास आपल्या तलवारीचे प्रखरपाणी पाजले !!

सुलतान मरून खालीं पडला ! आणि तेथे दक्षिणेत धुडगूस घालणाऱ्या सुलतान-शाहीला मूठमाती देण्यात आली !! द्वारसमुद्राच्या वीर बल्लाळास ठार मारणाऱ्या सुलतानाचा तशाच रणकंदनात बळी घेतला जाऊन, पक्का सूड उगविण्यात आला ही इतिहासप्रसिद्ध लढाई इ स १३७१ सालीं लढण्यांत आली

पुढे विजयनगरचा विजयी झेंडा आता मोठ्या वैभवाने व समारंभानें मदुरेंत शिरून, तेथील सुलतानाच्या राजवाड्यावर मोठ्या संभ्रमानें फडकविण्यात आला ! हिंदु प्रजेचा केवढा उत्साह तो ! आनंदाला नुसता ऊत आला होता ! नरकवास सुटून, सुखैकधाम स्वर्गाचें मंगल दर्शन घडलें !! इ स १३२४ साली तुरुष्कांच्या जबड्यात सापडलेली मदुरा इ स

१३७१ सालीं मगर मिठीतून मुक्त झाली आणि विजयनगरचा प्रभावी झेंडा रामेश्वरास जाऊन भिडला !!!

मदुरेतील शिव व विष्णु या देवालयांतील पूजा–अर्चा सुलतानशाहीत बद पडून, देवळाला कुलुपे ठोकण्यांत आलीं होतीं ती कम्परायानें तोडून काढून, देवालयाची दारे उघडून पुनः देवाची पूर्वीप्रमाणे पूजा-अर्चा करण्यास मोकळीक करून दिली आणि सर्व धार्मिक विधींना पुनः नवचैतन्य मिळाले !!

ही मदुरेची मोहीम एवढ्यावरच थावली नाहीं अजून श्रीरंगपट्टण मुसलमानाच्या ताब्यात होते तें मुक्त केल्याशिवाय दक्षिण दिग्विजयाला पूर्णत्व येण्यासारखें नव्हतें आता विजयनगरची दृष्टि रंगनाथाकडे वळली· कर्मधर्मसंयोगाने कम्पराजाचा सरसेनापति गोपाणार्य नावाचा श्रीवैष्णव ब्राम्हण होता· तो मोठा शूर व धाडसी रणझुंजार असून, त्याची नेमणूक त्यावेळीं जिंजी प्रातावर सुभेदार म्हणून करण्यात आली होती तो भारद्वाज गोत्री असून आपस्तंब हें त्याचें सूत्र होतें· तो या मदुरेच्या लढाईत जातिनिशी हजर होताच श्रीरंगपट्टणाचे महत्व श्रीवैष्णवाना अत्यंत श्रेष्ठ असें असून, तें श्रीवैष्णव धर्माचें मूळ पीठ होतें हें क्षेत्र इ स १३२७ सालीं मदुरेच्या सुलतानानें जिंकून आपल्या ताब्यात घेतलें होते त्यावेळी तेथील रगनाथ भक्तानी तेथील मूर्ति उचलून ती तिरुपति येथें सुरक्षित नेऊन ठेवली होती अर्थात् मुसलमानाची त्यावर सावली पडली नव्हती

मदुरेचा पराभव होऊन सुलतानी तक्त कोलमडून पडल्यामुळें, पुढें क्षणाचाहि विलंब न करता, श्रीरंगपट्टणवर तावडतोब धडक मारून गोपणार्यानें तेथील तुरुष्काना गाठलें व त्याच्याशी मोठ्या शौर्यानें लढून, त्यांना तेथून पिटाळून लावलें! हिंदूची सरशी होत आहे असा रग दिसताच तेथील मुसलमानाचें धैर्य खचलें व त्यानी पुढे टिकाव न धरता 'य पलाय स जीवति' या सुभाषिताची कास धरली व सैरावरा पळत सुटले !

गोपणार्य विजयी झाले व विजयनगरचा विजयी ध्वज श्रीरंगपट्टणातून मिरवीत नेला ! लवकरच श्रीरगनाथाची मूर्ति तिरुपतिहून पुन घरीं

आणून, त्याची देवळात पूर्वस्थळीं मोठ्या समारंभाने स्थापना केली ! हा विजयनगर-साम्राज्याचा दक्षिणेचा फार मोठा विजय होय. हा विजय पाहून बुक्क भूपालास परमावधीचा आनंद झाला व माधवाचार्यांच्या अंगीकृत कार्याचें साफल्य होऊन, त्याचा जन्म धन्य व कृतकृत्य झाला !!

गोपणार्यांचा हा ऐतिहासिक पराक्रम भावी पिढीच्या स्मरणातून जाऊ नये, म्हणून रंगनाथ देवळाच्या महाद्वारावर तो श्लोकरूपाने पुढील प्रमाणे कोरून ठेवण्यात आला असून, आज मितीसहि तो तेथे पहावयास सापडतो श्लोक आहे, तो असा —

'आनीयान'ल-शृंगद्युतिरचित-जगद्रञ्जनाऽञ्जनाद्रेः ।
चेञ्च्यामाराध्य कंचित् समयमथ निहत्योद्भवनुष्कान्
तुलुष्कान् ॥
लक्ष्मीक्ष्माभ्यामुभाभ्या सह निज निलये स्थापयन्
रंगनाथम् ।
सम्यग्वर्या सपर्या कुरुत निजयशो दर्पणो गोपणार्य ॥
(एपि इंडिका, खंड ६ वा, नं ३३, पृ ३२३)

गोपणार्यांची ही महनीय वीरकृति खरोखर अविस्मरणीयच खरी ! आणि ती अभिनव भारताला–उदयोन्मुख राष्ट्रभक्ताना–आदरणीय व अनुकरणीय नाहीं, असें कोण म्हणेल ? राजकारणात शत्रूंशी कसे वागावें याचे शिक्षण विजयनगरपासून घेण्यासारखे नाहीं, असे विचक्षण मुत्सद्दी कसे म्हणतील ?

माधवाचार्यांनी राज्यांत कडेकोट बंदोबस्त, चोख व्यवस्था व कमालीची शिस्त ठेविली होती नाहींतर विजयनगरचा विशाल साम्राज्यवृक्ष कसा वाढला व फोफावला असता ? कोठे खट् खुट् झाल्याची बातमी लागताच, तावडतोब कडक उपाय योजना करून, त्याचा तेव्हाच नायनाट करण्यात ते सदैव दक्ष असत यामुळे विजयनगरची प्रजा फार सुखी व निर्भय होती जस जसा विजयनगरचा लौकिक वाढत चालला व त्याचे

पावलावर पाऊल पुढें पुढे सरकत चाललें, तस तशी ओसपडलेलीं गावें व शहरें पुन हळु हळु भरत व सुधारत चालली

वेदविद्येला चागला राजाश्रय मिळून राज्यात ठिकठिकाणीं पाठशाळा स्थापन होऊ लागल्या आणि तसेच देशी भाषेलाहि प्रोत्साहन मिळून, कानडी, तेलगू व तमिळ भाषातहि सुदर सुंदर ग्रंथनिर्मिति होण्याला अनुकूल वातावरण निर्माण झालें राज्यात रस्ते, विहरी, तळी, व कालवे खोदण्यात येऊं लागल्यामुळे प्रजेच्या सुख-सौकर्यांत दिने दिने भर पडत चालली व्यापाराची अभिवृद्धि होऊन, कलाकौशल्यास भरपूर उत्तेजन मिळत चालले देश सगळा सुरक्षित व व्यवस्थित होऊन तेथे शाततेचें व सपन्नतेचें वातावरण नादू लागलें

थोडक्यात म्हणजे माधवाचार्यांच्या अखंड जागृतीने व उदड परिश्रमाने राज्याची घडी नीट व्यवस्थित बसून, श्री बुक्क भूपालाची कारकीर्द विजयनगरच्या प्रजेला अत्यत सुखकारक व हितकारक व म्हणून लोकप्रिय होत जाऊन, त्याचा यशोदुंदुभि दशदिशात दुमदुमू लागला ! व कर्नाटक राजलक्ष्मीचा मनोहर चेहरा दिव्य कातीनें विलसू लागला ! यात काही मात्रहि अतिशयोक्ति नाहीं. तेथे लोकशाही नव्हती पण लोक-कल्याणराज्य मूर्तिमंत वावरत होतें ! हिंदुधर्मराजाचे वैशिष्ट्य तें हेंच ! हें लोक कल्याण !! हें प्रजावात्सल्य !!!

त्यावेळचे त्याचें वर्णन पाहिलें म्हणजें आमच्या विधानाच्या सत्यतेची साक्ष पटणार आहे म्हणून त्यावेळचें त्याचे वर्णन कसें करण्यात येत होतें, याचा एक नमुना म्हणून मुळबागल येथील शिला-लेखाचा उतारा येथें जशाचा तसा देत आहो.

तो उतारा हा असा आहे —

## बुक्कराजाचें थोडक्यांत वर्णन

आसन् हरिहर. कम्पो बुक्करायमहीपतिः ।
मारपो मुद्दपश्चेति कुमारास्तस्य भूपतेः ॥

पञ्चाना मध्यगस्तेषां प्रशास्ते बुक्कभूपतिः ।
प्रचण्डविक्रमो मध्ये पाण्डवानामिवार्जुनः ॥

भंगा· कलिंगाऽमित-शौर्य-वृत्ते
वंगा विभन्नांग-विघूर्णनेत्रा. ।
आन्ध्राश्च रध्राणि विशन्ति यस्य
बाहुप्रखड्गेण विशीर्यमाना ॥

तुरुष्काः शुष्कवदना पाण्ड्यभूपा. पलायिता. ।
स्वभुजार्जिता-वीर्येण तस्मिन् राज्यं प्रशासति ॥
बुक्करायो भवेच्छ्रीमान् भुजार्जितपराक्रम ।
मेदिनी च प्रजा येन स्वपुत्रा इव रक्षिता ॥
राजाधिराराज-तेजस्वी यो राजपरमेश्वर ।
भाषालघित-भूपाल-भुजगम-विहगम ॥
राजराजभुजगो य परराय-भयकर ।
हिंदुराय-सुरत्राण इति एतैरुपशोभित ॥
विद्याभिधान-नगरी विजयोन्नतशालिनी ।
विद्यारण्यकृता तस्यां रत्नसिंहासने स्थित ॥
यस्मिन् षोडशदानानां धरायां परिशोभितम् ।
दानाम्बु-धारया तस्य वर्धते धर्मपादप ॥

(एपि कर्नाटिका, खंड १०, मुळबागल, १५८, पृ १३५)

हें बुक्कराजाचें वर्णन वाचल्यावर त्याभूपतो-विषयीं अधिक गौरवपर लिहिण्याचें आता आणखी काही शिल्लक राहत नाही प्राचीन हिंदुराजे कसे होते व कसे असत, याचें विजयनगरचे राजे हे प्रत्यक्ष उदाहरण होत ती आठवण आम्ही आधुनिक भारतीयांनी बुजविणें हा कृतघ्नपणा तर खराच आणि त्याच वेळेस भारतराष्ट्राच्या अध पतनास मागे पुढे तो एक शापच समजला पाहिजे !

## प्रकरण १८ वें

# विजयनगर कालीन धार्मिक वातावरण

'धर्मेण रक्षति क्षोणीं वीर श्री बुक्कभूपतौ।
निरातंका भयात्तस्मिन्नित्य भोगोत्सवा प्रजा ॥

(एपि इंडिका, खंड ३ नेल्लूर १९)

विजयनगर साम्राज्याचा जन्म झाला, त्यावेळी तेथे अनेक मतमतांतराचे कर्नाटकात प्रस्थ माजून राहिले होते त्यातल्या त्यात शैव, माध्व, श्रीवैष्णव व जैन हे पंथ उल्लेखनीय आहेत या सर्वांत प्रामुख्यानें वावरणारा सर्वसामान्य पंथ म्हणजे शैवपंथ हा होय दक्षिणेंत चोळ, होयसळ, पाड्य, केरळ हे सर्व राजे बहुतेक शैवपंथीच होते शैवमत हे अद्वैत पंथाचे असून, त्याचे मुख्य पीठ म्हणजे शृंगेरी हे होय श्रीमच्छंकराचार्य हे या अद्वैतपंथाचें आद्य संस्थापक व मुख्य प्रवर्तक असून, कर्नाटकातील बहुजन समाज या पंथाचा अनुयायी होता, व आहे

द्वारसमुद्राचे राजे वीरबल्लाळ, विचयनगरचे हरिहर बुक्क, आनेगोंदीचे राजे जबुकेश्वर, चोल देशचे राजे शंभुवराव वगैरे नरेश शृंगेरी पीठाचे उपासक व अनुयायी होते. हरिहर बुक्काचे कुलदैवत हंपी येथील विरूपाक्ष हें होतें विरूपाक्ष हें नाव शिवाचेंच असून, त्यावेळीं या हंपी क्षेत्राला मोठे महत्व प्राप्त झाले होते तेथील भुवनेश्वरी हें माधवाचार्यांचें कुलदैवत असून, ती देवता त्याना प्रत्यक्ष प्रसन्न झाली होती

त्याचप्रमाणें या शैवमताच्या जोडीला आणखी एक सांगण्यासारखा पंथ म्हणजे वैष्णवपंथ होय. हा पंथ श्रीमदानंदतीर्थ मध्वाचार्य यानी प्रस्थापित केला असून, उडपी येथें मुख्यपीठ स्थापन करून, तेथून माध्वसांप्रदायाचा प्रचार व प्रसार चालविला होता

हे आचार्य कट्टर द्वैतमतवादी असून, शंकराचार्यांच्या अद्वैतमताला त्याचा कसून विरोध होता, व आहे हे अस्सल कर्नाटकी असून, संस्कृत भाषेवर त्याचे प्रभुत्व नावाजण्यासारखें होतें हा पंथहि विजयनगर-साम्राज्यकाळीं आपला लौकिक चांगला संभाळून होता पुष्कळ लोकांनी या मताची दीक्षा घेतली असून, त्याचे वर्चस्वहि चांगले होतें

या माध्व सांप्रदायाचे सायण–माधव कालीन प्रख्यात द्वैताचार्य म्हणजे अक्षोभ्यतीर्थ हे होत त्याच्या जोडीला वेदांत–भूषण जयतीर्थाचार्य याचाहि उल्लेख अवश्य करण्यासारखा आहे हे दोघेहि पंडितवर्य द्वैतमताचे महारथी असून, त्यापैकीं अक्षोभ्यतीर्थ व विद्यारण्य (माधवाचार्य) स्वामी यांच्यामध्ये वेदांतदेशिक यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या चुरशीचा व मोठ्या कडाक्याचा वाद होऊन त्यांत अक्षोभ्यतीर्थांनी विद्यारण्यास पराभूत केलें, असा लोकप्रवाद गाजला

हा वाद मुळबागल येथे झाला असून, या प्रसंगाच्या संस्मरणार्थ म्हणून तेथील एका स्तंभावर हा पुढील श्लोक कोरून ठेविलेला आढळतो तो श्लोक असा.—

असिना तत्त्वमसिना परजीवप्रभेदिन ।
विद्यारण्यं महारण्यमक्षोभ्यमुनिरच्छिनत् ॥

हा मजकूर अद्वैतवाद्यास मान्य न होऊन, उलट त्यांनी आपला विजय जाहीर करण्यासाठीं 'अक्षोभ्यं क्षोभयामास विद्यारण्यो महामति' या वचनाचा डांगोरा पिटविला ! पण खरा प्रकार काय होता, हें श्रीहरीच जाणें ! असो

या द्वैतमताच्या आचार्यांनी आपल्या अलौकिक विद्वत्तेच्या जोरावर जनमनावर द्वैतमताचा चांगलाच पगडा बसविला होता तेव्हां पासून उडपी हें क्षेत्र वैष्णवपंथाची काशी होऊन बसली आहे. अर्थात् हा वैष्णवपंथहि सायणकाळीं आपला बेतांचा प्रपंच थाटून ऐटींत नांदत होता

या मताच्या जोडीला आणखी एका मताचा उल्लेख करणें प्राप्त आहे तें मत म्हणजे विशिष्टाद्वैत मत होय यामताचे जनक श्रीमद्रामानुजाचार्य

हे असून, ते मत 'श्रीवैष्णव' मत या नावाने ओळखिलें जातें या मताचा मुख्य कटाक्ष द्वैतमतावर असून, त्याला त्यानें कसून विरोध केला आहे आणि शंकराचार्यांच्या अद्वैतवादास पुष्टि देऊन एका परी ऊचलून धरलें आहे

मात्र या मतात व शंकराचार्यांच्या मतात थोडासा फरक आहे या श्रीवैष्णवमताला शंकराचार्यांचा मायावाद मान्य नसून, तो टाकून खुद्द वेदवचनांवरूनच त्याने आपला अद्वैतवाद प्रस्थापित केला आहे आणखी एक महत्वाचा फरक सांगावयाचा म्हणजे शांकरमताप्रमाणे जीव व शिव यांचे ऐक्य-म्हणजे तादात्म्य-घडते, तसे या श्रीवैष्णवमताचे नसून, जीव हा प्रत्यक्ष शिवरूप होत नसून, तो त्या शिवाच्या शरीर स्थानी असतो तादात्म्य पावत नाहीं याविषयीं शांकर मत असे कीं शिवस्वरूप-ब्रम्हस्वरूप-हें निर्गुण व निराकार आहे अर्थात् वेदांतात-म्हणजे उपनिषदांत-जीं निर्गुण वचने आढळतात, त्यांना शंकराचार्यांनी प्रधान्य देऊन सगुणवाचक वचनांना गौणस्थान दिलें आहे आणि श्रीवैष्णवमतात-म्हणजे विशिष्टाद्वैत मतात-अगदी याच्या उलट आहे तेथे सगुण वचनांना प्राधान्य देण्यात येऊन निर्गुणवाक्यांना गौणस्थान देण्यात आलें आहे

द्वैत मतानें या दोन्ही मतांना फाटा देऊन जीव व विष्णु हे केंव्हाहि तादात्म्य पावत नसून, ते दोन्ही भिन्न व स्वतंत्रच आहेत व राहतात. म्हणजे जीव हा प्रत्यक्ष विष्णुस्वरूप होत नसून, तो त्या देवाचा दास होऊन पृथकपणें विष्णु सन्निधच राहतो असो

हे रामानुजाचार्य मूळचे चोलदेशचे रहिवासी असून, तेथील चोल राजे शैव असल्याकारणाने, त्यांच्या भयानें व त्रासानें, या विष्णुभक्तांनी तेथून आसन गुंडाळून. म्हैसूर प्रांताचा आश्रय करून श्रीरंगपट्टण येथें त्यांनी आपलें मुख्यपीठ स्थापन केलें होतें अर्थात् श्रीरंगपट्टण हें त्या पंथाचें आदिपीठ होय

पुढें म्हैसूरचा राजा बिट्टिदेव उर्फ विष्णुवर्धन हा प्रथम शैवपंथी असून, रामानुजाचार्यांचा त्याच्यावर प्रभाव पडून, तो नंतर श्रीवैष्णवपंथाचा झाला अर्थात् त्यानें त्या पंथाला उचलून धरून, त्याला चांगला राजाश्रय

दिला श्रीरंगपट्टण हें आदिपीठ ठरल्यावर तेथे श्रीरगनाथाची मूर्ति स्थापन करण्यात येऊन, त्या स्थानाला क्षेत्राचे स्वरूप प्राप्त झालें

या पथाचे प्रसिद्ध आचार्य सायणकाळी लोकाचार्य वेदातदेशिक हे असून, त्याचे वादविवाद द्वैत व अद्वैत या दोन्ही मताच्या आचार्यांशी मोठ्या चुरशीनें होत असत हे मतहि विजयनगर साम्राज्यात आपला प्रभाव गाजवून व वैशिष्ट्य राखून आपला प्रपच साभाळून होतें

आता जाता जाता आणखी एका मताचा निर्देश करून प्रकरण आटपतें घेतों हे मत म्हणजे जैनमत होय हें जैनमत कर्नाटकात फार दिवसापासून मुळीं धरून खोल रुजून राहिलें होतें विक्रमपूर्व तिसऱ्या शतकात उत्तरहिंदुस्थानात फार मोठा दुष्काळ पडला होता त्यावेळीं तेथील जैनाचा एक प्रसिद्ध पुढारी भद्रबाहु या नावाचा असून, त्याच्या नेतृत्वाखालीं दुष्काळ पीडित जैन पंथीय लोकाची एक भली मोठी टोळी दक्षिणेत उतरून, कर्नाटकात येऊन तेथे स्थिरस्थावर होऊन राहिली होती तेव्हा पासून त्यानी आपल्या धर्मप्रसाराचे कार्य जोरानें चालू करून, तेथील लोकाना जैनपंथात सामील करून घेणेचा प्रचड उद्योग चालविला होता व त्यांच्या प्रयत्नाला दिसदीस यशहि येत चाललें होते

कर्नाटकात त्याचा मुख्य अड्डा म्हैसूर प्रातातील श्रवणबेळगोळ येथें असून, भद्रबाहूचे ते निवासस्थान होते होयसल नरेश भीमराय याची प्रथम पत्नी भीमदेवी ही प्रसिद्ध पडित जैनाचार्य अभिनव चारुकीर्ती याची शिष्या असून, तिने बेळगोळ येथे जैनाचा एक तीर्थंकर शातिनाथ, त्याच्या मूर्तीची स्थापना केली, असे एपि ग्राफिया कर्नाटिका खड २, यावरून सूचित होते

या जैनाचार्यांची सांगावयाची मुख्य गोष्ट म्हणजे कानडी भाषेत त्यानी उत्तमोत्तम ग्रंथ निर्माण करून कन्नड वाङ्मयाची फार मोठी सेवा केली, ही होय कानडींत ग्रथ लिहिण्याचा अग्रमान हा त्याचाच आहे सस्कृत वाङ्मयांतहि त्याचें स्थान श्रेष्ठ व प्रशंसनीय आहे पण कन्नड भाषेत केलेली त्याची सेवा अभिनव असून फार मोठी आहे

अर्थात् कन्नडवाङ्मयाच्या इतिहासात आद्यस्थान व मान हा या जैन पंडिताकडेच जातो त्याच्यातील तत्कालीन विद्वान म्हणजे विद्याचक्रवर्ती, विद्यानाथ, मल्लिनाथ, नेमिनाथ, शिशु मायण, मल्लिकार्जुन इत्यादि अनेक नामांकित पंडित होत कन्नड वाङ्मयात या जैनपंडितानी फार मोठी भर घातली आहे, हे लपवूं म्हणजे आता लपण्यासारखे नाही असो

या प्रमाणे बुक्कराजाच्या वेळी शैव, वैष्णव, श्रीवैष्णव व जैन इत्यादि मतमतांतरांचें कर्नाटकात मोठे प्रस्थ व गलबला माजून राहिला होता तथापि शैवमताचे प्राबल्य सर्वांत अधिक होते कारण दक्षिणेतील बहुतेक राजे शाकरमताचे अनुयायीच असल्यामुळे त्याचे वर्चस्व सर्वांत प्रभावी ठरावें, हें सहजीकच आहे

हा, आणखी एक गोष्ट सागावयाची राहून गेली ती म्हणजे वीरशैव मत ही होय या मताचा प्रमुख प्रचारक बसवेश्वर हा असून त्या पंथाचे आचार्यहि मतप्रसारार्थ समाजात चुळबुळ करीत असत हा वीरशैव पंथहि कर्नाटकात हातपाय पसरीत चालला होता म्हैसूर प्रातात श्रीशैल्य येथें त्याचें मुख्य पीठ असून, जैन धर्मावर हल्ला चढवून व हिंदुधर्मावर आक्रमण करून, त्याचा समाज पोखरून आपल्या चिमुकल्या समाजात भर घालण्याची कारवाई त्यानें चालविली होती

त्याधर्माला स्वतत्र असें तत्त्वज्ञान नसून, फक्त आचारधर्मावरच व नीतिवचनावरच त्याची सगळी मदार आहे तो कट्टर शिव-भक्त असून, गळ्यांत नेहमी लिंगधारण करणे हेंच त्या धर्माचे मुख्य गमक व पवित्र कर्तव्य गणले जाते या वीरशैव उर्फ लिंगायत धर्माची सागण्यासारखी गोष्ट म्हणजे यातील विद्वान पंडितानीहि जैनाप्रमाणेंच आपले धर्मग्रंथ कानडींत लिहून कन्नडवाङ्मयाची बहुमोल सेवा केली आहे सायणकाळीं ही अशी कर्नाटकातील धार्मिक परिस्थिति होती

विजयनगर साम्राजाचा जन्म व अवतारकार्य म्हणजे हिंदु धर्माचें संरक्षण, सपोषण व संवर्धन करणे हें असून, त्यासाठीं विजयनगर नराधिपतींनी तनमनधनानें अहर्निश झटून, त्यात नवचैतन्य ओतलें व

त्याला सर्व प्रकारे उत्तेजन देऊन, जगात अजरामर स्थान प्राप्त करून दिलें आहे, ही गोष्ट खरी पण म्हणून ते केवळ हिंदुधर्माचेच फक्त अभिमानी व सरक्षक होते, असा मात्र त्याचा अर्थ नव्हे सर्व धर्मांवर त्याची सारखीच समदृष्टि व उदार व आदरबुद्धि होती

याची साक्ष म्हणून आम्ही येथे एकच उदाहरण उद्धृत करतो भारत हा देश प्रामुख्याने वैदिक धर्माभिमानी होता, तरी तेथें विजयनगर साम्राज्यकाळीं अनेक पंथ अकुरून आपापला चिमुकला ससार थाटून सुखानें नादृत होते सर्व धर्माला व सर्व पंथाला यथायोग्य व यथान्याय आश्रय देऊन, त्याविषयीं सहिष्णुबुद्धि व आदरभाव बाळगणे हें हिंदुधर्माचे दिव्य वैशिष्ट्यच आहे !

आता प्रसगच आला म्हणून एक गोष्ट आम्ही येथे नमूद करतो जैन व श्रीवैष्णव याच्यात काही कारणावरून वाद उपस्थित होऊन, प्रकरण दिवसेदिवस पेट घेत चालले जैनावर जुलूम, छळ व अत्याचार होण्या-पर्यंत मजल गेली प्रसगी त्याचे खूनहि पडत श्रीवैष्णवापुढे टक्कर देण्याची त्यांच्यात सामर्थ्य व धैर्य नव्हते पण स्वस्थ बसून रोग जाण्यासारखा नव्हता म्हणून त्यानी आपलें व आपल्या धर्मांचे रक्षण करण्याविषयीं दाद मागण्यास म्हणून बुक्क भूपालाकडे धाव घेतली बुक्क भूपालानी त्याचे सर्व म्हणणे साद्यंत व सहानुभूतिपूर्वक ऐकून घेतले

तसे सागावयाचे म्हणजे बाब काही तितकी महत्त्वाची नव्हती वाद्यें वाजविण्याविषयीचा तो प्रश्न होता हिंदूच्या देवळात व जैनाच्य बस्तींत पूजा-अर्चेच्या वेळीं काही वाद्य वाजविण्याची प्रथा असून, ती नवीन नसून प्राचीन कालापासून चालत आली होती पचवाद्य ही फक्त श्री-वैष्णवांचीच मिरासदारी असून, त्याचा इतराना म्हणजे जैनाना उपयोग करण्याचा हक्क व अधिकार नाही, असा श्रीवैष्णवाचा दावा त्यावर जैनाची कैफियत अशी कीं आमच्यात सुद्धा ती वाद्ये वाजविण्याचा वूर्वापार परिपाठ आहे बुक्कानी दोघाचे म्हणणे ऐकून घेऊन, त्यावर निस्पृहपणें व समतोल दृष्टीने विचार करून अखेर निर्णय दिला तो असा.–

पण निकाल देण्यापूर्वीं जेन व श्रीवैष्णव प्रमुखांना आपल्याजवळ बसवून घेऊन जैनाचा हात धरून तो श्रीवैष्णवाच्या हातात दिला आणि मग म्हटले की, हे पहा, आमच्या राज्यात जैन व वैष्णव असा न्यायदानात पंथभेद पाळला जात नाहीं सर्व धर्म आम्हास सारखेच पूज्य व आदरणीय असून, त्याचे सरक्षण करणे हे आमचे ब्रीद आहे! म्हणून आमचे फर्मान असें कीं जैनाच्या पूर्वापार पद्धतीप्रमाणे सात बस्तीमध्ये पाचहि वाद्यें वाजविण्याचा त्याना हक्क व अधिकार आहे त्याला कोणी अडथळा करू नये त्यासाठी भाडण-ताडणहि करू नये त्या धर्मावरील आक्रमण म्हणजे प्रत्यक्ष श्रीवैष्णवपथावरील आक्रमणासारखेच आहे आणि हें आमचें शासन श्रीवैष्णवानी आमच्या राज्यातील जैनाच्या सर्व बस्तींमध्यें लावून जाहीर केलें पाहिजे

इतकेंच नव्हे, तर यावच्चंद्रदिवाकरौ श्रीवैष्णवपथी लोकानी जैनपथीय लोकाचें व धर्माचें रक्षण केले पाहिजे वैष्णव व जैन हे आमच्या मतें भिन्न नाहींत! तर एकाच देहाचे भिन्न घटक आहेत! त्याच्या त्याच्यात धर्ममूलक भिन्नभाव मानण्याचे कारण नाहीं तिरुपतीचा तातय्या यानें आमच्या राज्यातील जैनाच्या घरातून वसूल केलेल्या कराच्या रकमेतून वीस धर्मरक्षक नेमून, त्याची योजना बेळगोळ येथील देवाच्या रक्षणाकडे करावी आणि जैनाचीं जी जीं धर्ममदिरें-अर्थात् बस्ती-उध्वस्त करण्यांत आलीं असतील, त्याची पूर्ववत् दुरुस्ती करून देण्यात यावी. जो या आमच्या शासनाचा व हुकुमाचा भग अगर अतिक्रमण करील, तो राजद्रोही समजला जाईल! व तसाच तो संघाचा व समुदायाचाहि दोषी ठरेल!

(म्हैसूर ग्याझेटीर, खड २, भाग २, प्रकरण ११, पृष्ट १४८३) व
(एपि कर्नाटिका, खड २ श्रवणबेळगोल नं १३६)

पहा, हिंदू राजाची केवढी ही थोर न्यायबुद्धि, उदारधोरण व धार्मिक समतापालन!! हिंदूचे राज्य हें निधर्मी राज्य नसलें तरी तें

धर्मराज्य असून व राहून, निधर्मी राज्याला लाजवील अशीच त्याची कृति व धोरण होते आणि हे बाळकडु कुलगुरु माधवाचार्यांनी विजयनगर नरेशास योग्यवेळीच पाजले होते हिंदु राज्य हे खरोखर धर्मसमतेचे व परधर्मसहिष्णुतेचे सुराज्य आहे! याची ग्वाही भारतीय इतिहास हा आजपर्यंत मुक्तकठाने जगाला देत आला आहे मग त्या धर्मभूमीत-पुण्यभूमींत-निधर्माची टिमकी वेळी अवेळी वाजविण्यात अर्थतरी काय? असो



## प्रकरण १९ वे

# बुक्क भूपालाची राज्य व्यवस्था

'युक्ति मानवती विदान्स्थिरमतिर्भेदे विशेषार्थभाक्-।
गाम्भोह. क्रमकृत्प्रयुक्तिनिपुणः श्लाघ्याति देशोन्नति ॥
नित्यस्फूर्त्यधिकारवान्गतसदाबाध स्वतन्त्रेश्वर.।
जागर्ति श्रुतिमत्प्रसगचरित श्रीबुक्कणक्ष्मापति ॥

(जैमिनिन्यायमालाविस्तर)

कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् ।
इति ते सशयो मा भूत् राजा कालस्य कारणम् ॥

(महाभारत)

राष्ट्राची उन्नति अगर अवनति-सुगति अगर दुर्गति-सपन्नता अगर विपन्नता-याचे मूळकारण राष्ट्राची राजकीय सूत्रे हलविणाऱ्या प्रमुख राष्ट्रपतीवरच सर्वस्वी अवलबून आहे, हा त्रिकालाबाधित सिद्धात प्रथम भारतीयानीच हेरून धरला आहे व तो राज्यसूत्रे हलविणाऱ्या राष्ट्रपतीनें सतत डोळ्यापुढे ठेवूनच राज्यशकट हाकला तरच तो राष्ट्राला उपकारक व हितकारक होतो, हे सत्य सर्वकाली व सर्वस्थली सारखेच प्रभावी आहे ही गोष्ट लक्षात घेऊन आता आपण विजयनगर राज्याकडे वळू

या बुक्क भूपालाच्या यशस्वी कारकीर्दीत विजयनगर राज्याची घडी व जम नीट व्यवस्थित बसत जाऊन, राज्यात सर्वत्र शातता, सुबत्ता व सुव्यवस्था याचे सुराज्य नादू लागले होते राज्यकारभार सुरळीत व सुयत्रित चालण्यासाठीं साम्राज्याचे लहान मोठे असे निरनिराळे प्रात अगर सुभे पाडण्यात येऊन, त्यावर एकेक प्रातपाल अगर सुभेदार नेमण्यात आला होता

अर्थात् हे सर्व सुभेदार बुक्काच्या खास नात्यागोत्यातील व विश्वासातील लायख पुरुष असून, त्या त्या प्रांताची राज्यकारभाराची जबाबदारी त्या त्या सुभेदारावर टाकण्यात आली होती हे सर्व अधिकारी माधवाचार्य व सायणाचार्य यांच्या तालिमेत पढून राजकारणात चांगले तयार झालेले असे राजनीति-निपुण असून, कर्तव्यतत्पर व लोक-हितदक्ष असे अधिकारी पुरुष होते अर्थात् हे सर्व अधिकारी बुक्कभूपतीच्या जवळच्या, नात्यागोत्यातीलच होते, हे निराळे सांगावयास नकोच

बुक्कभूपालाला अनेक बायका असून, त्यात मुख्य अशा तीन होत्या पहिली राणी होन्नायी, दुसरी गौराम्बिका आणि तिसरी देवायी अशा तीन राण्या असून, त्यात होन्नायी ही वडील व सर्वांत राजाची फार लाडकी राणी होती तिच्या पोटी तिप्पण्णा हा जन्मला दुसरी जी गौराम्बिका तिच्या पोटीं हरिहर (द्वितीय) हा झाला तिसरी जी देवायी, तिच्या पोटीं कंप (द्वितीय)-याला हिरिय कंप असे म्हणत – आणि संगम व चिक्क कंप असे तीन मुलगे जन्मले शिवाय विरूपाक्ष ऊर्फ विरपण्णा वडेयर, मल्लीनाथ ऊर्फ मल्लप्पा वडेयर, राजेंद्र वडेयर, भास्कर बहादूर, व सायण्णा वडेयर, याप्रमाणे बुक्कास एकंदर दहा चिरंजीव होते पण शेवटचे जे पांच पुत्र, त्यांच्या आईचा मात्र उल्लेख सांपडत नाहीं.

(म्हैसूर ग्याझिटीर, खंड २, भाग ३, प्रकरण ११)

हे सर्व राजपुत्र चांगले वयात आले असून, ते कर्ते पुरुष होते राजाने या सर्व मुलांची राज्यात योग्य अधिकारावर नेमणूक केली होती त्यात बुक्काचा वडील मुलगा म्हणजे तिप्पण्णा वडेयर यास द्वारसमुद्राच्या सुभेदारीवर नेमला जाऊन तो प्रांत त्याच्या ताब्यांत देण्यात आला होता हरिहर हाहि त्याच्या बरोबरच होता तिसरा मुलगा विरूपाक्ष ऊर्फ विरुपण्णा वडेयर हा यदुगिरी येथें सुभेदारीचे काम पहात असे यदुगिरि हा उदयगिरि याचा अपभ्रंश असून येथे इ स १३७९ साली तो प्रांताधिकारी होता, असा उल्लेख आहे नंतर बुक्काचा चौथा मुलगा मल्लिनाथ ऊर्फ मल्लण्णा वडेयर हा खुद्द बुक्काच्या हाताखालीं राहून, त्याला मदत करीत

असे पाचवा मुलगा कप ऊर्फ हिरिय कपण्णा वडेयर हा मुळवागल प्रांतावर राज्यपाल म्हणून कारभार करीत होता त्याचा धाकटा भाऊ चिक्क कपण्णा हा म्हैसूर सुभ्याचा सुभेदार होता बुक्काचा सातवा मुलगा राजेंद्र वडेयर हा मुळबागलच्या एका भागावर हुकमत चालवीत असे आठवा मुलगा भास्कर बहादूर हा उदयगिरीच्या पूर्वभागावर प्रांताधिकारी म्हणून नेमला गेला होता नववा मुलगा सावण्णा वडेयर हा अरकाट व तंजावर येथील राज्यकारभार पहात असे बुक्काच्या भावाचा म्हणजे मारप्पा वडेयर याचा मुलगा सोवण्णा वडेयर हा शिमोगा प्रांतावर देखरेख करीत असे याप्रमाणे बुक्क राजाने आपल्या राज्याचे लहान मोठे सुभे पाडून, त्यावर कारभार करण्यास खुद्द आपल्या मुलाची व नातलगाची योजना केली होती

(म्हैसूर ग्याझिटीर, खंड २, भाग ३रा, प्रकरण ११वे पृ १४८०)

बुक्काची सांगण्यासारखी आणखी एक महत्वाची गोष्ट म्हणजे विजयनगरची विस्तृत व आखीव रचना व सर्वांग सुंदर उभारणी ही होय विद्यानगरची आखणी हरिहराच्या कारकीर्दीतच तयार झाली होती पण वाढत्या लोकसंख्येला ती अपुरी पडू लागली शिवाय ती रचनाहि घाई-घाईनें आखण्यांत आली असल्यामुळे ओबड धोबड होती. शिवाय सुरक्षतेच्या दृष्टीनें तिला तितके बंदिस्त स्वरूप नव्हते. बुक्कानें त्या शहराला नीट व्यवस्थित, विशाल व मोहक असे आखीव रूप देण्याचें कार्य हाती घेऊन, त्याप्रमाणे जोराने व धडाडीने कामगिरी चालू केली

गावात पाण्याची सुखसोय करण्यासाठी तुंगभद्रेचे कालवे काढून शहरात सर्वत्र पाणी खेळविण्यात आलें रस्ते वाढवून सरळ व रुंद करण्यात आले गावासभोवती भक्कम तटबंदी उभारण्यात येऊन, शत्रूला ते स्थान दुर्गम करून ठेविलें गावात ठिकठिकाणी गोपुरें, सुंदर सुंदर देवळे, उंच उंच शिखरें व राजमंदिरे व दरबारी इमारती बाधून व बाग बगीचे थाटून शहराला उत्तम शोभा आणली मोठमोठे हत्तीखाने उभारले, गोशाळा बांधल्या, ठिकठिकाणी कमानी उभारल्या, अश्वशाला उठविल्या विद्यापीठें

स्थापन केली, हपी येथील आपल्या कुलदेवतेचे विरुपाक्ष देवालय पुन नवीन बाधून, ते अत्यत सुदर, भव्य व प्रेक्षणीय करून ठेविलें

आणि या प्रमाणे हरतऱ्हेने राजधानीचे वैभव व सौंदर्य डोळ्यात भरेल, अशाप्रकारची सर्व तजवीज करून, त्या विद्यानगराला अमरावतीचें सर्वांग सुदर स्थान प्राप्त करून दिले हजारो मजूर, शेकडो कारागीर व अनेक कलावंत वर्षांची वर्षे रात्रंदिवस खपून, त्या राजधानीच्या रचनेंत व सौंदर्यांत भर घालण्यात गढून गेले होते पुढे इ स १३७३ साली शहर-रचनाकार्य सपूर्ण झाल्यावर दक्षिणेतील महान् दिग्विजय संस्मरणार्थ त्याला विजयनगर हें नाव कायम करण्यात येऊन, तेव्हापासून पूर्वीचें विद्यानगर हें आता पुढे विजयनगर या नावाने सर्वांस मिरवूं लागलें

आता हें विजयनगर कसें होते याची कल्पना वाचकांस थोडक्यात आणून देण्यासाठीं, बुक्कराजाची विदुषी स्नुषा-कप वडेयरची पत्नी-गंगादेवी हिने ‘मदुरा विजय’ या काव्यात सविस्तर वर्णन केलें असून, त्यातील काही भाग येथें देतो म्हणजे बुक्क कालीच ते शहर कसे सजलें होतें, याचा अदाज करता येईल

गगादेवीनें त्यावेळीं केलेल्या विजयनगरचें वर्णन पुढील प्रमाणें आहे: —

‘तस्यासीद्विजयानाम विजयार्जितसम्पद ।
राजधानी बुधै श्लाघ्या शक्रस्येवामरावती ॥
सुरलोकान्तसक्रान्तस्वर्णदीमत्सरादिव ।
परिखारतां यान्त्या परीता तुङ्गभद्रया ॥
लक्ष्मीलतालवालेन क्ष्मावधूनाभिशोभिना ।
चक्राचलप्रकारेण प्राकारेण परिष्कृता ॥
स्फुरन्माणि-प्रभाहूत पुरूहूत शरासनै ।
सुमेरुश्रृंगसंकाशै· गोपुरैः उपशोभिता ॥
उत्फुल्लचम्पकाशोकनागकेसरकेसरै ।
वसन्तवासभवनै· आरमै अभितो वृता ॥

कस्तूरी–हरिणाक्रान्तकर्पूरकदलीतलैः ।
मनोभव-महादुर्गै महिता केलिपर्वतै ॥
कमलामोदमधुरै॰ कलहसकुलाकुलैः ।
क्रीडासरोभि सहिता मणिसोपानमञ्जुलै ॥
यशस्तोमैरिवाशेषनगरीविजयार्जितै ।
सोधै॰ प्रकाशितोत्सेधा शरदम्भोदपाण्डरैः ।
विकसद्वनितावल्ली विलासवनवाटिका ।
दक्षिणाशासरोजाक्षीफाललीलाललाटिका ॥
द्विजराजसमुल्लास-नित्यराका निशीथिनी ।
गन्धर्वगणसानिध्य नव्यदिव्य वरूथिनी ॥
भुजङ्गसङ्घसंवास भूतेशमुकुटस्थली ।
सुमनस्तोम संचार सुवर्णगिरिमेखला ॥
लिलेव दिष्टिबुद्धीनां शालेव सकलश्रियाम् ।
मालेव सर्वरत्नानां वेलेव सुकृताबुधे ॥
यस्यां प्रासादशृंगेषु लग्नं मार्ताडमण्डलम् ।
सन्धत्ते वीक्षमाणानां सौवर्णकलशभ्रमम् ॥
यत्सौधचन्द्रशालासु विहरन्त्यो मृगेक्षणा ।
शशांकमवलम्बन्ते मुक्ताकंदुक शकया ॥
यत्र सौधेषु सगीतमृदगप्रतिनादिषु ।
अकाण्डे ताण्डवारम्भ वितन्वन्ति शिखण्डिनः ॥
पद्मरागोपलोत्कीर्णप्रासादप्रान्तवर्तिनः ।
सन्तत यत्र दृश्यन्ते सान्ध्या इव बलाहकाः ॥
सन्ध्यासु यत्र निर्यान्ति जालेभ्यो धूपराजय ।
अन्त प्रदीपिकालोकचकितध्वान्तसन्निभा ॥
यद्दीर्घिकासु माणिक्कामय–सोपानचारिभि॰
क्षणदास्वपि चक्राह्व विरहो नानुभूयते ॥

यदङ्गनामुखाम्भोज लावण्यालाभलज्जित ।
कलङ्कच्छद्मना चन्द्रो व्यनक्ति हृदयव्यथाम् ॥
यत्र स्त्रीणां कटाक्षेषु यूनां हृदयहारिषु ।
पुष्पास्त्रसचये वाञ्छा मुञ्चते पञ्चसायक ॥
मरालै॰ मञ्जुमञ्जीरशिञ्जिताकृष्टमानसै ।
लीलागतिमिव प्राप्तु सेव्यन्ते यत्र योषित ॥
यत्रावलग्न सादृश्यंवाञ्छाविमतमम्बरम् ।
प्रायः पयोधरोत्सेधैः निरून्धन्ति पुरन्ध्रय ॥
यत्र वामभ्रुवामेव काठिन्यं स्तनमण्डले ।
कौटिल्यं कबरीभारे कार्श्यं मध्येच दृश्यते ॥

(मदुराविजयम्, *IVV. 43*)

*(Social & Political life in Vijayanagar Empire, Part I, P 12)*

विजयनगरची राजस्नुषा विदुषी गगादेवी, तिचे हें 'मदुरा विजयम्' मधील सुरस काव्य किती सुंदर, किती मधुर व किती प्रसादपूर्ण आहे बरें ! प्राचीन भारतीय महिला कशा विद्यासपन्न होत्या, त्याचे ही सुविद्य कवियित्री गगादेवी एक प्रतीकच आहे, असें म्हटले तर त्यात काही बिघडणार नाही तिचें सस्कृत भाषेवरील प्रागाढप्रभुत्व वरील काव्यातून नितात ओथबलेलें सहज दिसून येते, हें निराळें सागावयास नकोच ही गगादेवी तत्कालीन सुप्रसिद्ध काशीविलास क्रियाशक्ति याचा शिष्य त्र्यबक क्रियाशक्ति या विद्वान पंडिताच्या हाताखाली शिकून तयार झाली होती वरील विजयनगर वर्णनावरून विजयनगरचें स्वरूपसौंदर्य त्याकाळीं कसे होतें, याचे निराळे वर्णन करण्याचें कारण नाही तें वरील काव्यात अप्रतिम उतरलेलें असून, त्यावेळचे अवशेष आजहि अधुक अधुक पहावयास मिळतात या वैभवशाली राजधानीचे सविस्तर व सुरस वर्णन आणखी पुढे प्रसगानुसार करण्यात येईल

या बुक्क भूपालाची राजवट विजयनगरच्या इतिहासात अत्यंत स्पृह-णीय व संस्मरणीय असून, विजयनगरच्या प्रजेला ती मोठी सुखावह होऊन, फार लोकप्रिय झाली मुसलमानाचा धाक व दरारा नाहीसा होऊन, लोक निर्भय व निर्धास्त झाल्यामुळे उद्योगधंद्याला तेजी चढली, व बाजारपेठा भरभराटूं लागल्या कलावंताना व कारागिराना राजाश्रय मिळून, कला-कौशल्याची वाढ होत चालली देशोदेशीचे व्यापारी व उद्योग धंदेवाले विजयनगरचा लौकिक ऐकून, तेथे येऊन आपला व्यापार धदा थाटून बसू लागले राज्यात शिस्त व सुव्यवस्था नांदू लागून, प्राण व वित्त याना स्थैर्य व अभय लाभले एकदरीत बुक्क भूपालाची त्याच्या कुशल व्यवस्थेमुळें कारकीर्द प्रजेला मोठी सुखावह व हितावह होऊन, त्याचा बोलबाला व जयजयकार सर्वत्र घुमूं लागला यावेळी खरोखर विजयनगरला अमरावतीची दिव्य कळा व शोभा आली होती !

बुक्कनरेश लोकाना इतके प्रिय झाले होते की, त्याच्या नावाचा उल्लेख निरनिराळ्या शिलालेखात, ताम्रपटात, व शासन पत्रात निरनिराळ्या गोड नावाने करण्यात आला असल्याचे दिसून येते कोठे त्याना 'बुक्कराय वडेयरु' म्हटले आहे, तर कोठे 'बुक्कराय महाराय' म्हटले आहे कोठें 'हिंदुराय-सुरत्राण' तर कोठें 'वीर बुक्कण्ण रायरु', कोठे 'परराज भयकर', तर कोठें 'अभिनव बुक्कराय', कोठें 'अरियराय विभाल तर कोठे 'भाषेगे तप्पुव मूरु रायर गड', कोठे 'नवखड पृथ्वीश्वर' तर कोठे 'पूर्वपश्चिमसमुद्राधीश्वर', कोठें 'राजाधिराज राजपरमेश्वर' तर कोठे 'विरुपाक्षदेव-दिव्य श्रीपादमाराधक', याप्रमाणें मोठ्या गौरवानें त्याच्या नावाचा ठिकठिकाणी प्रसगोचित उल्लेख करण्यात आला आहे (एपि कर्नाटिका, खड ३ मळवल्लि तालूक, २२)

खुद्द माधवाचार्यांनी त्याना 'पराशर-माधव' ग्रथामध्ये 'महाराजाधि-राज' असें म्हटलें असून, सायणाचार्यांनी त्याचे 'राजाधिराज वीर श्री बुक्क भूपाल' असें वेद भाष्यात वर्णन केले आहे शेवटी जाता जाता गंगादेवीनें त्याचें वर्णन केले आहे, तो श्लोक येथें उद्धृत करून प्रकरण आटपतें घेतो राजस्नुषा गगादेवीचा 'मदुराविजयांत' श्लोक आहे तो असा —

'कर्नाटकलोकनयनोत्सवपूर्णचन्द्र ।
साकं तया हृदयसंगमतया नरेन्द्र ॥
कालोचितान्यनुभवन् क्रमशः सुखानि।
वीरश्चिराय विजयापुरमध्यवासीत् ॥

भावार्थ — बुक्क नरेश हा कर्नाटक लोकाच्या नयनाला आनंद देणारा जणु काही पूर्णचंद्रच होय ! असो

यावरून बुक्काचे संगम घराणे हे अस्सल कर्नाटकी घराणे असून ते प्रजाहितैकदक्ष होते, यात सत्यापलाप बिलकूल नाही



# यदुकुलोद्भव पुण्यश्लोक संगमवंश




## कारकीर्द

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | हरिहर | इ स | १३३६—१३५३ |
| (२) | बुक्क | ,, | १३५३—१३७७ |
| (३) | हरिहर (दुसरा) | ,, | १३७७—१४०४ |
| (४) | बुक्कराय (२ रा) | ,, | १४०४—१४०६ |
| (५) | देवराय | ,, | १४०६—१४१६ |
| (६) | विजयराय | ,, | १४१६—१४१९ |
| (७) | देवराय (२ रा) | ,, | १४१९—१४४६ |
| (८) | मल्लिकार्जुन | ,, | १४४६—१४६३ |
| (९) | विरूपाक्ष | ,, | १४६३—१४७८ |

---

## प्रकरण २० वे

# विजयनगरचे महाप्रधान सायणाचार्य

श्रीमद्राजाधिराज परमेश्वर वैदिकमार्गप्रवर्तक श्री हरिहर महाराज साम्राज्य धुरंधरेण सायणाचार्येण विरचिते माधवीये वेदार्थप्रकाशे माध्यंदिनीय-शतपथ-भाष्ये प्रथमप्रपाठके प्रथमाध्याये चतुर्थं ब्राम्हणम् ॥

— शतपथ भाष्य

विजयनगरचे पंत अमात्य श्री माधवाचार्य हे आतां जवळ जवळ ऐंशीच्या पुढे-त्र्याऐंशी त्र्याऐंशीच्या घरी-आले होते अर्थात् या त्यांच्या उतरत्या वयात विजयनगर साम्राज्याचे वाढत्या व्यापाचे व मोठ्या जबाबदारीचे पंत-अमात्यपद पूर्वीप्रमाणे दक्षतेने व यशस्वीपणे निभावून नेणें हें त्यांना जड जाऊं लागले असल्यास त्यात आश्चर्य तें काय ? उतार वयाचा तो स्वभावसिद्ध धर्मच आहे शिवाय त्यांचे अंगीकृत कार्यहि मुळीं धरून आता चांगले रंगरूपास व नाव लौकिकास आले होते

तेव्हा राहिलेले तेवढे आयुष्य राजकारणातून व जगाच्या धकाधकीतून निवृत्त करून एकांतात जाऊन शांतपणे ते अध्यात्मविचारात, धर्मचिंतनांत व ग्रंथलेखनात गुंतविण्याचा विचार करून, त्याप्रमाणे त्यांनी इ स १३७७ सालीं जगाच्या जंजाळातून सुटून आश्रमांतर करून सन्यास दीक्षा घेतली व शृंगेरीस आपल्या गुरूजवळ – म्हणजे भारतीतीर्थांजवळ – जाऊन तेथे कायमचें प्रस्थान ठेविलें ही गोष्ट हरिहर गादीवर आल्यावर झाली

याप्रमाणे पंतप्रधानाची रिकामी झालेली जागा भरून काढणारा तसा योग्यतेचा खंदा पुरुष विजयनगर दरबारात कोणी दिसला नाहीं अगदींच नाही म्हणण्याला एक अपवाद मात्र होता तो म्हणजे माधवाचार्यांचे

बंधु सायणाचार्य हल्ली ते बुक्कराजाच्या मन्त्रीमंडळात होतेच ती तेवढी एक व्यक्ति डोळ्यात भरण्यासारखी होती आणि अखेर ती माळ त्याच्या गळ्यातच पडली ! ही गोष्ट मथळ्यातील वचनावरून स्पष्ट होते

हे सायणाचार्य या हुद्याला काही नवीन नव्हते त्याची पंतप्रधानाच्या जागीं निवड झाली, हे यथायोग्यच झाले त्यावेळीं त्याच्या तोडीचा कसलेला, अष्टपैलू मुत्सद्दी विजयनगर दरबारात दुसरा कोणीच नव्हता, असे म्हटल्यास त्यात अतिशयोक्तीचा भाग मुळीच नाहीं शिवाय आणखी असे कीं, सायणाचार्य मन्त्रीपदास काही नवखे उमेदवार नव्हते ते बुक्काच्या दरबारात मन्त्रीपदावर होतेच

तशात सांगावयाची विशेष गोष्ट म्हणजे बुक्काच्या मन्त्रीमंडळात येण्याच्या पूर्वीं त्यांनी कम्पराजाच्या दरबारात महामन्त्री म्हणून जवळ जवळ दहा वर्षे काम पाहिले असून, पुढें कम्पाच्या मरणानंतर संगमाच्या वेळीहि तें पद संभाळून वर महामंडलेश्वराचे स्थानहि विभूषित केले होते म्हणजे जवळ जवळ एकदर ३५ वर्षांचा त्याना मन्त्रीपदाचा अनुभव होता मग त्याच्या कायखीचा व तोडीचा दरबारात दुसरा कोण असणार ? म्हणून हरिहराने त्यासच पसंत करून, महाप्रधानकीची वस्त्रे त्यानाच अर्पण केली

तसें पाहू गेले तर सायणाचार्यांची गोष्ट माधवाचार्यांपेक्षा जरा निराळी होती माधवाचार्य हे जाडे मुत्सद्दी व तसेच मोठे लेखणीबहाद्दर होते, हें खरे पण तलवार विद्येत त्याचें नांव चमकल्याचे कोठेच नमूद नाहीं त्यादृष्टीनें सायणाचार्यांची निवड ही सरसच होती व झाली असेंच म्हटलें पाहिजे

इ. स १३८० साली श्रृंगेरी पीठाधीश श्री भारतीतीर्थ हे ब्रम्हरूप पावले. व त्याच्या जागीं त्याच्या पश्चात् श्रृंगेरी पीठावर शंकराचार्य म्हणून विद्यारण्याची निवड व स्थापना झाली तेव्हापासून विद्यारण्य हे श्रृंगेरी-पीठाचे शंकराचार्य व त्याचे बंधु सायणाचार्य हे विजयनगरचे महाप्रधान होऊन, दोघानी मिळून सहकार्याने व सहविचारानें धर्मकारण व राजकारण उबविणेचा व रंगविणेचा उपक्रम चालविला आणि तो यशस्वीहि झाला

## प्रकरण २१ वे

# महाराजाधिराज हरिहर भूपाल

गौरीसहचरात्तस्मात् प्रादुरासीन्महेश्वरात्।
शक्त्या प्रतीत-स्कन्दांशो राजा हरिहरेश्वर ॥

(सत्यमगल)

विजयी हरिहरभूपः समुद्वहन् सकलभूभारम्।
षोडशमहन्ति दानान्यनिश सर्वस्य तृप्तये कुर्वन् ॥

(अथर्वसहिताभाष्य)

विजिता, राति, व्रातो वीर श्री हरिहरः क्ष्माधीशः।
धर्मब्रम्हाध्वन्य कलिं स्वचरितेन कृतयुग कुरुते ॥

(शतपथ-भाष्य)

सर्ववर्णाश्रमाचारप्रतिपालन-तत्परे।
तस्मिन् चतुः समुद्रान्ता भूमि कामदुघाऽभवत् ॥

(नल्लूर दानपत्र)

हरिहर (द्वितीय) नरेश हे पुण्यश्लोक बुक्क भूपालाचे ज्येष्ट चिरजीव होत बुक्क-भूपाल हे इ स १३७६ सालीं शिवाधीन झाले त्यादिवशीं रविवार होता महिना फाल्गुन, कृष्णपक्ष, उत्तर फाल्गुनी नक्षत्र, शके १२९८ नलनामसंवत्सर त्यावेळेला हरिहरानें दहाग्रामाना 'बुक्कराजपुर' हें नाव देऊन, तें ब्राम्हणाना दान दिले हा मजकूर ज्या दानपत्रात आहे, त्यात 'शिवसायुज्य प्राप्तस्य महाराजाधिराजस्य राजपरमेश्वरस्य स्वपितु श्री वीर-बुक्क-राजस्य ' असा उल्लेख आहे (एपि इडिका खंड १६, नं २, पृष्ट १२) बुक्काचा शूर मुलगा कप हा त्याच्या आधी दोन वर्षामागेंच म्हणजे इ स १३७४ सालीं वारला होता अतएव गादीवरचा जवळचा

हक्क, हरिहराचाच असल्यामुळे इ स १३७६ साली तो विजयनगरच्या गादीवर आला

पुण्यश्लोक बुक्कराजे निवर्तल्यावर माधवाचार्य पुढे फार दिवस मंत्री-पदावर राहिले नाहींत वर्षसहामहिन्यातच मंत्रीपदाला राजीनामा देऊन, राजकारणातून निवृत्त होऊन, श्रीशृंगेरी येथे जाऊन श्रीभारतीतीर्थाकडून त्यांनी सन्यासदीक्षा घेतली व विद्यारण्य हे नाव धारण करून पुढील आयुष्य शृंगेरी येथेंच गुरूजवळ राहून, आत्मचिंतन व ग्रंथलेखन यातच घालविण्याचे ठरविले. अर्थात् ही सन्यास दीक्षा त्यानी इ स १३७७ सालीं घेतली व त्याची रिकामी झालेली जागा सायणाचार्यांनी विभूषित केली हा मजकूर मागें देण्यात आला आहे विजयनगर येथे प्रारभापासून जी एक दिव्य शक्ति व लोकोत्तर चैतन्य स्फुरत होते, त्याला कारण माधव व सायण या बंधुद्वयाचें अष्टावधानी कुशल कर्णधारत्व हे होय

आश्रमातर केल्यावर हरिहर भूपालाना वेळोवेळी जवळ घेऊन हिंदु-धर्माचें विशाल व उदार असे सुदर शिक्षण देऊन व अध्यात्मविद्येचा उपदेश करून, राजाची मनोभूमिका उजळ व उदात्त केली अर्थात् माधवाचार्य-आतां विद्यारण्य मुनि-हे त्याचे अध्यात्म गुरु व सायणाचार्य हे त्याचे राजगुरु होऊन, धर्मकारणात व राजकारणात योग्य सल्ला व मार्गदर्शन करून, त्यानी त्याला धर्मराजाच्या योग्यतेस चढविला त्याच्या योग्य सल्ल्यानें व उपदेशानें हरिहर महाराजाची कारकीर्द फार यशस्वी व भरभराटीची झाली

हरिहर राजाची कारकीर्द सुरू होताच राज्यात काही ठिकाणी पुन गडबड सुरू झाली कोंकणातील कदंब लोकानीं मोठे बंड उठविलें त्याचें स्वातंत्र्य मार्गे मारप्यानें हिरावून घेतले होते, ते पुन मिळविण्यासठी हें बंड होतें त्यानी कोंकणात फार मोठी वावटळ उठविली होती

ही बातमी हरिहरास लागताच इ स १३७९ साली तो सैन्य घेऊन कोंकणात उतरला व तावडतोब जालीम उपाय योजून, अखेर बडखोराचें रि-पत्य केलें, आणि देशात पुन शातता व सुव्यवस्था प्रस्थापित केली

याप्रसंगी वीरवसंत माधवराय याचा मुलगा बचप्पा वडेयर यानें पुढाकार घेऊन, कोकणिकाचीं हाडें चागलीं नरम केलीं अखेर कोकणिकाचा जालीम उपाय योजून नीट बदोबस्त करण्यात आला

(एपि इ खंड १५, न २ पृष्ठ १२)

त्यानंतर वारंगळमध्ये आंध्रांनी उचल खाऊन, त्या भागात बराच गोंधळ माजविला पण हरिहराने त्याचें काही चालू दिलें नाही वेळींच सैन्य पाठवून, त्याची बडाळी मोडून, तेथे पूर्ववत् शातता प्रस्थापित केली आंध्राचा इकडे बदोबस्त होतो न होतो, तो इतक्यात दक्षिणेत चोळ राजाने चुळबुळ चालविली हा चोल राजा जवळ जवळ विजयनगरचा उभा शत्रूच दिसतो सायणाचार्य उदयगिरीचे महामंडलेश्वर असताना चोलच्या चम्प उर्फ शंभुवराजाने प्रथम गडबड उठविली होती, तेव्हा सायणाचार्यांनी स्वत त्याच्यावर चाल करून त्याची खोडकी जिरविली होती त्यानतर बुक्कराजाच्या काळीं पुन सधि साधून त्यानें अशीच उचल खाल्ली पण बुक्काचा शूर मुलगा कम्पण्णा वडेयर याने त्याच्यावर स्वारी करून, त्याची खोडकी जिरविली आता या हरिहराच्या कारकीर्दीतहि पुनः मागचाच कित्ता गिरवून, तेथील राजानें राज्यात पुडाई माजविली ही बातमी विजयनगरास येऊन पोंचताच, हरिहराने तावडतोब त्यावर चढाई करून त्याचा पुरा नीमोड केला त्याच वेळेस पाड्य राजानेंहि बड उभारलें पण तो लगेच नरम पडला या सर्व प्रसंगातून व कटकटींतून हरिहररायानें मोठ्या चातुर्यानें व पराक्रमाने यशस्वी होऊन, राज्यातील असतुष्ट व महात्वाकांक्षी लोकांचें कडक पारिपत्य करून, राज्यात पूर्ववत् सगळीकडे शांतता व सुव्यवस्था स्थापन केली

पुढे इ स. १३८० साली श्रृंगेरी पीठाचे भारतीतीर्थ हे ब्रम्हीभूत झाले. आणि त्याच्या जागीं श्री विद्यारण्यमुनि याची योजना झाली व मोठ्या थाटाने व समारभानें त्याचा पीठारोहण महोत्सव साजरा करण्यांत आला तेव्हां पासून ते पुढील शकराचार्यांच्या बिरुदावळीनें मंडित झाले त्यांची बिरुदावळ ती अशी.— श्रीमत् परमहस परिव्राजकाचार्य-

पद्वाक्य प्रमाण पारावारपारीण – यमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यान-धारणासमाध्यष्टागयोगानुष्ठाननिष्ठागरिष्ठ– तपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपरा-प्राप्तषड्दर्शनस्थापनाचार्य-व्याख्यानसिंहासनाधीश्वर – सकलवेदार्थप्रकाशक-साख्यत्रय्यीप्रतिपालक- सकलनिगमागमसारहृदय -वैदिकमार्गप्रवर्तक–सर्वतंत्र-स्वतंत्रादिराजधानी–श्रीमद्विद्यानगर महाराजधानी- कर्नाटक सिंहासन प्रष्ठाप-नाचार्य–तुंगभद्रातीरनिवास- ऋष्यश्रृंगपुराधीश्वर .

हिंदुधर्मगुरूचे वैशिष्ट्य हे कीं, ते जरी कट्टर हिंदुधर्माभिमानी व हिंदुत्वनिष्ठ धर्मगुरु असले तरी इतर धर्मांविषयीं त्यांचे धोरण मोठें उदार व सहिष्णु होते आणि हीच शिकवण त्यानी विजयनगरच्या सर्व राजांस मोठ्या कटाक्षानें देऊन, विजयनगर म्हणजे धर्मसमतेचें मोहरघर बनवून ठेविलें

आणि आनंदाची गोष्ट ही की, विजयनगरचे सर्व राजे धार्मिक बाबतींत मोठे उदारमतवादी निघाले उदाहरणार्थ दक्षिणेतील दुष्ट व नष्ट सुलतानशाहीवर शस्त्र उचलून, ती दक्षिणेतून त्यानी उखडून काढली, हें खरें पण मुसलमानी धर्मावर व त्याच्या अनुयायावर कोणत्याच प्रकारची जुलुमजबरदस्ती, व अन्याय-अत्याचार केला नाही ! उलट त्या धर्मास व त्या लोकास त्याच्या त्याच्या इभ्रतीप्रमाणे वागवून, हिंदुप्रजेप्रमाणेंच त्यांचेंहि यथान्याय रक्षण व पोषण केले त्यानी मशिदी पाडल्या नाहींत, तर उलट बांधण्यास मदतच केली ! त्यानी मुसलमानाना लुबाडले व छळलें नाहीं, तर हिंदूप्रमाणेंच त्यांचेहि जीवित व वित्त याचे रक्षण केले ! त्यानी मुसलमानी स्त्रिया पळविल्या नाहीत अगर त्याचा विनयभंग केला नाहीं अथवा त्याच्यांवर अत्याचार केला नाही, तर त्याना स्वगृहीं गुण्यागोविंदानें व अब्रूनें आपापला संसार सुखाने थाटू दिला !!

मागें जैन व वैष्णव याच्यात तटा माजला असता बुक्क नरेशांनी दाखविलेले उदार धोरण व उदात्त न्यायबुद्धि याचें वाचकास इतक्यांत विस्मरण झालें नसेल हे जे सहिष्णुतेचें अलौकिक वैशिष्ट्य आहे, ते फक्त उदार हिंदुधर्माचें व हिंदुराजाचेंच आहे !! तें तेव्हाहि होतें व आजहि

आहे !! याची साक्ष हिंदुस्थान व पाकिस्थान येथे आजहि पहावयास मिळतें !!! असो

मुसलमानाची चुळबुळ अलीकडे मदावली होती हें खरे असलें, तरी ती अगदी थंडावली नव्हती मधुन मधून ते उचल खात असत असाच प्रकार इ स १३८०च्या सुमारास झाला त्यानी अतस्थ कट करून अचानक उदयगिरी किल्ल्यावर घाला घालून, तेथील किल्लेदाराचा पराभव करून, तो किल्ला बळकावला ही बातमी विजयनगरास पोचताच मल्लप्पा वडेयर याचा शूर मुलगा चन्नप्पा याने फौज घेऊन तावडतोब मुसलमानावर चाल करून जाऊन, त्याच्याशी मोठ्या पराक्रमाने लढून किल्ला पुन ताब्यात घेतला या लढाईत चन्नपाने तुरुष्काची हड्डी चागलीच नरम केली हरिहरास ही विजयबातमी कळताच त्यास मोठा आनंद झाला व आपला पुतण्या चन्नप्पा यास तेथील सुभेदार नेमून, त्याची तेथे नेमणूक केली ही गोष्ट इ स १३८० साली घडली याविषयी एपि ग्रापिया इडिका खड १५ मध्ये मजकूर आढळतो तो असा — ಹರಿಹರರಾಯರು ಸ್ಥಿರ ರಾಜ್ಯವನ್ನು ಮಾಡುತ್ತಿದ್ದಲ್ಲಿ ತಮ್ಮ ವಡಹುಟ್ಟಿದ ಶ್ರೀ ವೀರ ಮಲ್ಲಪ್ಪ ವಡೆಯರ ಕುಮಾರನು ಆದವಾನಿಯು ದುರ್ಗವನ್ನು ರಾಜ್ಯವನ್ನು ಸಾಧಿಸಿ ಹರಿಹರರಾಯರಿಗೆ ಕೊಟ್ಟು '*(Ep Ind Vol XV No 2, P 12)* या विजयानतर हरिहराचे वर्चस्व वाढून राज्यात सर्वत्र शाति-सुखाची अभिवृद्धि झाली

या हरिहर (द्वितीय) राजाचा वाखाणण्यासारखा मुख्य गूण म्हणजे तो मोठा उदार व दानशूर राजा होता. त्यानें विद्वान ब्राम्हणाना व धार्मिक संस्थाना मुक्त हास्ताने द्रव्यदान व भूदान केले आहे त्याचप्रमाणे श्रृंगेरी, श्रीरगपट्टण, वेकटाद्रि या प्रसिद्ध धर्मतीर्थांलाहि सढळ हातानें भूदान व द्रव्यदान करून, तेथील देवदेवताची पूजाअर्चा व सेवकवर्गाचा योगक्षेम अव्याहत, सुसूत्र व सुरळीत चालण्याची उत्तम व्यवस्था करून ठेविली ती आज मितीसहि त्या त्या देवस्थानात अबाधित चालू आहे

इतकेंच नव्हे, तर जैन धर्मालाहि तसाच आश्रय दिल्याचे आढळून

येते विजयनगर-मध्ये जैन मंदीर नव्हते तर त्यानें तेथे जैन मंदीर बांधण्यास परवानगी देऊन, वर त्याला द्रव्य सहायहि पुरविले व राज्यांत इतस्तत जीं थोडीं बहुत जैनमंदिरे होतीं, त्यानाहि द्रव्याची मदत पोचविली तसेच वीरशैव धर्मालाहि सढळ हाताने मदत केली याशिवाय इतर धर्मांनाहि त्याने राजाश्रय दिला या हरिहरराजाने पुष्कळ दानधर्म केला

उदाहरणार्थ म्हणून एकच उदाहरण येथे उद्धृत करतो माधवाचार्यांचे मुख्य गुरु श्री विद्यातीर्थ ब्रम्हीभूत झाल्यावर त्यांच्या संस्मरणार्थ म्हणून त्या समाधीवर एक सुंदर देवालय बाधून तेथे विद्याशंकराची सुंदर शिवलिंग मूर्ति स्थापन केली होती, हा मजकूर मागे आलाच आहे या देवालयाच्या पूजापुनस्कारासाठीं व तेथील सेवेकऱ्याच्या अव्याहत चरितार्थासाठीं म्हणून या हरिहर राजानें श्रृंगेरीस भेट देऊन, तेथील देवालयाला इ स १३८६ सालीं माठे दानपत्र करून दिलें आहे तो मजकूर हरिहरराजाच्या औदार्याचें एक मोठें द्योतक असल्यामुळें तो आम्हीं येथे देत आहो मजकूर कानडींत असून पुढील प्रमाणे आहे

'ಪೂರ್ವದಲಿ ನಮ್ಮ ಪರಂಪರಾಗುರುಗಳು ವೇದಭಾಷ್ಯ ಪ್ರವೃರ್ತ-ರಾದ ವಿದ್ಯಾರಣ್ಯ ಶ್ರೀಪಾದಂಗಳು ಲೋಕಾನುಗ್ರಹಾರ್ಥವಾಗಿ ಪಂಪಾ ತೀರನಿವಾಸ ಶ್ರೀ ವಿರುಪಾಕ್ಷ ಪ್ರಸಾದಿತ ತಪೋಬಲದಿಂದ ವಿದ್ಯಾನಗರ ನಿರ್ಮಾಣವ ಮಾಡಿ ಹರಿಹರ ಮಹಾರಾಯರನು ಗೊ-ದೇವ-ಬ್ರಾಹ್ಮಣ ಪ್ರತಿಪಾಲಾರ್ಥವಾಗಿ ಸಿಂಹಾಸನದಲ್ಲಿ ಪಟ್ಟಾಭಿಷೇಕ ಮಾಡಿದ ಅನಂತರ ದಲ್ಲಿ ಶ್ರೀಮತ್ ರಾಜಾಧಿರಾಜ ರಾಜಪರಮೇಶ್ವರ ಅರಿರಾಯರ ಕುಲ ಕುಮುದ ಮಾರ್ತಂಡ ಶ್ರೀ ವೀರ ಪ್ರತಾಪರಾದ ಶ್ರೀ ಮತ್ ಹರಿಹರ ಮಹಾರಾಯರು ಸುಖ-ಸತ್-ಕಥಾ ವಿನೋದದಲ್ಲಿ ಕರ್ನಾಟಕ ರಾಜ್ಯವ ಪ್ರತಿಸ್ಥಾಪಿಸಿಕೊಂಡು ಬಾಹ ಸಮಯದಲ್ಲಿ, ವಿದ್ಯಾರಣ್ಯ ಶ್ರೀಪಾದಗಳ ಪಾದಕ್ಕೆ ಬಿನ್ನಹ ಮಾಡಿಕೊಂಡು ಶ್ರೀರಂಗಪುರದಲ್ಲಿ ಶಂಕರಾಚಾರ್ಯರು ನಿರ್ಮಾಣವ ಮಾಡಿದ ಧರ್ಮಪೀಠದಲ್ಲಿ ಮಠ—ಅಗ್ರಹಾರವಿರಬೇಕೆಂದು ಬಿನ್ನಹಂ ಮಾಡಿಕೊಂಡು ಮಲ್ಲಿಕಾರ್ಜುನ ಶ್ರೀ ವಿದ್ಯಾಶಂಕರ ಸ್ವಾಮಿ-




विद्याशंकर देवालय- ( श्रृंगेरी )

ಶಾರದಾ ಅಮ್ಮನವರು ಮಠದಲ್ಲಿ ಆಹ ದೇವತಾ ಪೂಜೆ, ವೇದ ಶಾಸ್ತ್ರ ಮುಂತಾಗಿ ನಡಸುವ ಧರ್ಮಗಳಿಗೆ ಭೂಸಂಸ್ಥೆಗಳ ಪರಿಚ್ಛೇದವ ಮಾಡಿ ಶೃಂಗಪುರ-ವಿದ್ಯಾರಣ್ಯಪುರದ ಅಗ್ರಹಾರಗಳ ನಿರ್ಮಾಣವ ಮಾಡಿ ೨೫೦ ವೃತ್ತಿ-ಪರಿಕಲ್ಪನೆಯು ಮಾಡಿ ವಿದ್ಯಾರಣ್ಯ ಭಾರತಿ ಸ್ವಾಮಿಗಳ ಪಾದಕ್ಕೆ ಸಮರ್ಪಿಸಿದಲ್ಲಿ।

मराठी भावार्थ —पूर्वी आमचे परपरा गुरु वेदभाष्यप्रवर्तक विद्यारण्य श्रीपाद यानी लोकानुग्रहार्थ पपा तीरनिवास श्री विरूपाक्षप्रासादित तपोबलानें विद्यानगर निर्माण करून, तेथे हरिहर महाराय यास गो-देव-ब्राम्हणाच्या परिपालनार्थ सिंहासनावर पट्टाभिषेक केला

त्यानतर श्रीमत् राजाधिराज राजपरमेश्वर शत्रुकुल-कुमुद-मार्तंड श्रीवीर प्रताप श्रीमत् हरिहरराय यांनी सुख-सत्कथा-विनोदात कर्णाटक राज्य प्रस्थापित करून विद्यारण्य श्रीपाद याच्या चरणापाशीं विनंति केली कीं श्रृंगेरी येथे शकराचार्यांनी निर्माण केलेल्या धर्मपीठस्थानीं मठ व अग्रहार असावा, असा मनोदय व्यक्त करून मल्लिकार्जुन-श्रीशकरस्वामी-शारदाबा यानी तेथे देवपूजा व वेदशास्त्र इत्यादि चालविलेल्या धर्मकार्याथं भूस्वास्थ्य असावें एतदर्थ श्रृंगेरीपूर-विद्यरण्यपूर-येथें अग्रहार निर्माण करून, २५० वृत्ति परिकल्पून, त्याचे त्याने विद्यारण्यस्वामीच्या चरणाला समर्पण केलें. (यापुढे दानपत्राचे सविस्तर वर्णन वगैर आहे)

(एपि कर्नाटिका, खड ६, श्रृंगेरी ११, पृष्ठ १७६)

हें जें दानपत्र आहे, तें श्री विद्यारण्य श्रीपाद काल वश झाल्यावर हरिहरराजानें (द्वितीय) आपल्या अध्यात्म गुरूच्या सस्मरणार्थ करून दिलें आहे कारण श्री स्वामीजी हे इ स १३८६ सालींच ब्रम्ही भूत झाले तेव्हा या दानपत्रातील अग्रहाराना विद्यारण्यपूर असें नांव देऊन त्यानावानें तें दानपत्र करून देण्यात आले, तें समयोचित असेंच आहे याप्रमाणें हरिहरानें अनेक देवालयाना अशाच प्रकारचीं दानपत्रे करून दिलेलीं व ब्राम्हणांना अग्रहार वाल्लून दिलेली शासनपत्रे गावोगाव आढळतात विजयनगरच्या सर्व राजामध्यें हरिहर (द्वितीय) याची मोठा उदार व दानशूर राजा म्हणून

प्रख्याति होती आणि खरोखर होताच तसा तो या विजयनगरराजाची सांगण्यासारखी एक महत्वाची गोष्ट अशी की, त्याच्यातील प्रत्येकामध्ये काहीतरी नावघेण्यासारखे एक वैशिष्ट्य असे यांविषयी हा पुढील श्लोक पाहण्यासारखा आहे

> शक्तौ बुक्क महीपालो दाने हरिहरेश्वर. ।
> शौर्ये श्री देवरायो ज्ञाने विजयभूपति ॥

बुक्क राजा हा शक्तीत, त्याचा मुलगा हरिहर हा दानधर्मांत, त्याचा मुलगा देवराय हा शौर्यांत व त्याचा मुलगा विजयभूपति हा ज्ञानात मोठा प्रख्यात होता अर्थात् बाप, मुलगा, नातू व पणतू हे एका एका गुणात प्रसिद्धि पावले असो

या हरिहरराजाच्या कारकीर्दीत विजयनगरचा दरारा व लौकिक दक्षिणेंत चांगलाच वाढला होता आता पर्यंत त्याच्या राज्यात कृष्णेखालचा सगळा दक्षिण भारत समाविष्ट झाला असून, कर्नाटक, आंध्र, तेलगण, चोळ, पाड्य, म्हैसूर, मलबार, कदंब, दक्षिण कोकण, एवढा सगळा टापू त्याच्या एकछत्री साम्राज्य सत्तेखालीं आला असून, त्याची साक्ष धारवाड, म्हैसूर, नेल्लूर, कांजीवरम्. चिंगलपेट, मुलबागल, त्रिचिनापल्ली इत्यादि प्रांतातील ठिकठिकाणच्या शिलालेखावरून, व शासनपत्रावरून चांगली प्रत्ययास येते येथपर्यंतच्या इतिहासावरून विजयनगरचे सुबुद्ध धर्मनिष्ठ राजे 'राजा हितकरो नृणाम्' या महत्तर नीतिवचनाला पूर्णपणें जागून होते, हे काय आता निराळे सांगावयास पाहिजे ?

## प्रकरण २२ वें

# सायणाचार्यांचे ग्रंथलेखन (पुढेचालू)

'कृपालु सायणाचार्यो वेदार्थ वक्तुमुद्यतः ॥
व्याख्याय वेदत्रितयमामुष्मिकफलप्रदम् ।
ऐहिकामुष्मिकफलं चतुर्थं व्याचिकीर्षति ॥ १० ॥

(अथर्ववेद-उपोद्घात)

सायणाचार्य ही भारतातील वाङ्मय-क्षेत्रामधील एक मोठी अद्वितीय व अलौकिक अशी महान् विभूति होऊन गेली, यात तिलप्राय शंका नाहीं. आज वैदिक-वाङ्मय-प्रेमी जिज्ञासु जगात त्याचे नांव अजरामर होऊन राहिले आहे वेदार्थ ज्ञान करून घ्यावयाची जर कोणाला इच्छा झाली, तर त्यांच्या ग्रंथाला शरण गेल्याशिवाय व कौल लाविल्याशिवाय गत्यंतरच नाहीं ! ही अतिशयोक्ति नव्हे तर प्रत्यक्ष सत्य आहे वेदप्रेमी व वेद-जिज्ञासु जग त्याना केव्हाहि कृतज्ञच राहील ! एवढे त्याचे महनीय उपकार वेदजिज्ञासु जगावर खात्रीनें झाले आहेत, याविषयीं कोठेंहि दुमत नाहीं

हरिहर (द्वितीय) याचे ते प्रधान मत्री झाले, त्यावेळीं त्याचें वय जवळ जवळ पासष्टाच्या वरीं आले होते तशा उतारवयातच मोठ्या साम्राज्याचें-मोठ्या जबाबदारीचें-पत अमात्यपद सभाळून, शिवाय वर अत्यंत बिकट असें महाभाष्य लेखनाचें महत्कार्य हातीं घेतले, तें खरोखर विस्मयकारक नाहीं, असे कोण म्हणेल ?

त्यांचीं भाष्यें आतापर्यंत वेदावर-म्हणजे ऋग्वेद, यजुवेद व सामवेद या ग्रंथावर-लिहून बुक्कराजाच्या कारकीर्दीतच पूर्ण करण्यात आलीं होतीं. आतां फक्त चौथा वेद जो अथर्व वेद, त्यावर तेवढें भाष्य लिहिण्याचें राहिलें होतें तें कार्य उरकून टाकण्याचे त्यानी आता ठरविलें

आता पुढे जावयाच्या अगोदर अथर्ववेदाविषयीं थोडीशी माहिती देणे, हें योग्य दिसते, म्हणून त्याविषयी प्रथम दोन शब्द लिहून मग मुख्य विषयाकडे वळतो तसे पाहू गेले तर वेद हे तीनच आहेत ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद असे हे तीन वेद असून, त्याना उद्देशूनच शतपथात 'त्रयी वै विद्या' असे म्हटले आहे त्यापैकी ऋग्वेद हा अग्नीपासून, यजुर्वेद हा वायूपासून व सामवेद हा सूर्यापासून झाला, अशी आख्यायिका आहे ('त्रयो वेदा अजायन्ताग्नेर्ऋग्वेदो वायोर्यजुर्वेद सूर्यात्सामवेद ।' श प ११—५—८—३)

येथें अथर्ववेदाचें नाव दिसत नाहीं इतकेच नव्हे तर पुरुषसूक्तातहि त्याचा निर्देश आलेला नाहीं तेथे वेदाची उत्पत्ति सागण्यात आली आहे ती अशी — 'तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे। छन्दांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥ (ऋ १०—९०—९) या ऋचेत वेदाची उत्पत्ति सांगितलेली असून, त्यांत अथर्ववेदाचा उल्लेख नाहीं

पण पुढें गोपथब्राम्हणात मात्र त्याचा उल्लेख आला आहे अर्थात् हें ब्राम्हण अथर्ववेदाचे असून, त्यात हे पुढील वचन आढळते — 'चत्वारो वा इमे वेदा ऋग्वेदो यजुर्वेद सामवेदो ब्रम्हवेद' (गो ब्रा २—१६) ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व ब्रम्हवेद असे हे चार वेद आहेत अथर्ववेदालाच ब्रम्हवेद असे म्हणतात

या अथर्ववेदाची उत्पत्तिकथा आधुनिक वाचकवर्गाला बहुतेक अपरिचित असल्यामुळें त्याची येथें थोडक्यात माहिती देतो अर्थात् ती सायणभाष्यांत जशी आढळते, तशीच येथे उद्धृत करतो

ती कथा ही अशी.— 'पुरा खलु सृष्ट्यर्थं स्वयंभु ब्रम्हा तपस्तेपे। तस्मात्तप्यमानात् सर्वेभ्यो रोमकूपेभ्य स्वेदधारा अजायन्त। तासु स्वेद-जातासु अप्सु स्वा छायां पश्यतो रेतश्चस्कन्द। तद्रेतःसहितासु आपो द्विरूपा अभवन्। तत्रैकस्थित रेतो भृगुर्नाम महर्षिरभवत्। स एव भृगु स्वोत्पा-दकस्य तिरोहितस्य ब्रम्हणो दर्शनाय 'अथर्वाग् एन एतास्वेवाप्स्वन्विच्छ' इति। अशरीरया वाचोक्तत्वात् अथर्वाख्योऽभवत्। अवशिष्टरेतो-युक्ताभि-

रङ्गिरावृतस्य वरुणशब्दवाचस्य ब्रम्हणस्तस्य सर्वेभ्योऽङ्गेभ्यो रसोऽक्षरत् । ततस्तत्कारण ब्रम्ह त अथर्वणं अंगिरसश्चोत्पन्ना । तेभ्यस्तेभ्य ऋषिभ्य सकाशात् स्वयंभु ब्रम्ह यान् मन्त्रान् अद्राक्षीत् सोऽथर्वांगिर शब्दवाच्यो वेदोऽभवत् । अत एकर्चादीना ऋषीणा विंशतिसंख्याकत्वाद् वेदोऽपि विंशतिकाण्डकात्मकः संपन्न । अतएव सर्वसारत्वाद् अय वेद श्रेष्ठ ॥ श्रूयते हि । 'एतद्वै भूयिष्ठ ब्रम्ह यत् भृग्वांगिरसः । योऽङ्गिरस स रस । योऽथर्वाणस्तद्भेषजम् । यद्भेषज तदमृतम् । तद्ब्रम्ह' इति ॥ (गोपथ ब्राम्हण १-४ व ३-४) एव सारभूतब्रम्हात्मकत्वाद ब्रम्हकर्तव्य प्रतिपादनाच्च अय ब्रम्हवेद इत्यपि आख्यायते ॥' असे सायणाचार्यांनी आपल्या अथवेद भाष्यात सांगितलें आहे भाषा संस्कृत असली तरी समजण्यास सुगम असल्याकारणाने मराठी अनुवाद देण्याची जरूरी वाटत नाहीं

या अथर्ववेदावर भाष्य लिहिण्यास सायणानी घेतलें, तें हरिहर राजाच्या आदेशावरून घेतले, याविषयी अथर्ववेदाच्या उपोद्घातात मजकूर आढळतो तो असा —

'तत्कटाक्षेण तद्रूप दधतो वुक्कभूपने ।
अभूद्धरिहरोराजा क्षीराब्धेरिव चन्द्रमा. ॥ ४ ।
तन्मूलभूतमालोच्य वेदमाथर्वणाभिधम् ।
आदिशत् सायणाचार्य तदर्थस्य प्रकाशने ॥ ८ ॥
ये पूर्वोत्तरमीमासे ते व्याख्यायाति सग्रहात् ।
कृपालु सायणचार्यो वेदार्थं वक्तुमुद्यत. ॥ ९ ॥
व्याख्याय वेदत्रितयमामुष्मिकफलप्रदम् ।
ऐहिकामुष्मिकफलं चतुर्थ व्याचिकीर्षति ॥ १० ॥

(अथर्ववेद-उपोद्घात

हा वरील मजकूर उपोद्घातात आढळत असून, त्यानतर दुसऱ्या काडाच्या शेवटी शेरा आहे, तो असा —

'इति श्रीमद्राजाधिराज राजपरमेश्वर श्रीवीरहरिहर महाराज धुरंधरेण सायणाचार्येण विरचिते माधवीये अथर्ववेद-प्रकाशके द्वितीयकाण्डे षष्ठोनुवाक । समाप्त द्वितीय काण्डम् ॥

या उताऱ्यावरून अथर्ववेदाचें भाष्य दुसऱ्या हरिहर भूपालाच्या आमदानींत पूर्ण झालें व तें सायणाचार्यांनीच पूर्ण केलें, याविषयीं संशय रहात नाहीं यावेळेला माधवाचार्य सन्यास घेऊन श्रृंगेरीस जाऊन राहिले होते, हें स्पष्ट आहे

अथर्ववेदावरील हें भाष्य झालें तरी ऋग्वेदाप्रमाणेच विस्तृत व विद्वत्तापूर्ण असून, उपयुक्त माहितीनें परिपूर्ण भरलें आहे या वेदाची एकदर वीस कांडें असून, प्रपाठक ३६, अनुवाक १११ व मंत्र ५९८७ आहेत या वेदाचें सांगण्यासारखें वैशिष्ठ्य म्हणजे तें हें कीं ऋग्वेदादि पहिल्या तीन वेदांत जीं कर्मफलें सांगण्यात आलीं आहेत, तीं फक्त परलोकींच प्राप्त व्हावयाचीं आहेत या लोकीं तीं प्राप्तव्य नाहींत पण अथर्ववेदांतील उपासना ही इहपर अशा दोन्ही लोकांतील फलप्राप्त्यर्थ आहे (तदेव आमुष्मिकफलेषु दर्शपूर्णमासादिषु अयनान्तेषु त्रयीविहितकर्मसु अपेक्षितं ब्रम्हत्व अनन्यलभ्यत्वाद् अथर्ववेदैकसमधिगम्य इति स्थितम् ॥ तद्वदेव ऐहिक फलानि शान्तिपौष्टिकानि कर्माणि राजकर्माणि अपरमितफलानि तुलापुरुषादिमहादानानि च अथर्ववेद एव प्रतिपादितानि ॥ पौराहित्य च अथर्वविदैव कार्यम् ॥' यावरून त्रयीवेदापेक्षां अथर्ववेदाचें वैशिष्ठ्य हें कांहीं अंशीं निराळेंच असल्यामुळें व शांतिपौष्टिकादिकर्में फक्त अथर्ववेदांतच प्रतिपादिलीं असल्यामुळें हरिहरराजानें अशा इहपर लोकोपयोगी वेदावर भाष्य लिहिण्यास मागितलें, हें यथोचितच झालें असो

अथर्ववेदावरील भाष्य लिहून झाल्यावर चारहि वेदांतील मन्त्रसेवा पूर्ण झाली दुर्बोध वेदमन्त्राचा सुंदर, सुगम व सुरस अर्थ व गूढ मर्म सरळ व स्पष्ट समजून घेण्याचा दुर्गम मार्ग सुलभ व सोपा झाला पण गोष्ट अशी कीं नुसत्या मंत्रार्थानें मन्त्राचा मनांत जसा प्रकाश पडावा व जिज्ञासा तृप्त व्हावी तसा प्रकार होत नसल्यामुळें हरिहरराजाचें मन जरा

वेचन झाले नतर त्यानी मंत्रार्थांचे विवरण व विशदीकरण जेथे स्पष्ट व सुटसुटीत करण्यात आले आहे, मंत्राचा विनियोग जेथे सागण्यात आला आहे व वेदातील परम व गुह्यतत्त्व जेथे सुबोध व सुस्पष्ट करून उपदेशण्यात आले आहे, असा एखादा सुदर ग्रथ पाहून त्यावर व्याख्यान करण्यात आले, तर जगावर मोठे उपकार होतील असे मनात आणून, त्यानी सायणाचार्यांस पुन विनति केली की, 'आचार्यजी! वेदमन्त्रार्थांचे स्पष्टीकरण, त्याचा विनियोग व प्रयोजन इत्यादि ज्या ग्रथात सविस्तर सागण्यात आले आहे, असा एखादा ग्रथ पाहून त्यावर व्याख्यान कराल तर जगावर फार मोठे उपकार होतील तर ती कृपा कराल काय ?'

वेदजिज्ञासु हरिहरभूपालाची विश्वकल्याणकारी ही शुभेच्छा श्रवण करून, त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील असा ग्रथ म्हणजे शतपथ ब्राम्हण ग्रथ, हा तेवढाच त्याच्या डोळ्यापुढे दिसला व म्हणून त्यानी त्या ग्रथावरहि आपला अमृतहात फिरविण्याचे मनात योजिले हा प्रसग खालील श्लोकांत उद्धृत करण्यात आला असून तो आम्ही वाचकाच्या समाधानासाठी खाली देत आहो

विजितारातिव्रातो वीर श्री हरिहर क्षमाधीश. ।
धर्मब्रम्हाध्वन्य समादिशत्सायणाचार्यम् ॥ ४ ॥
ऋग्यजुसामशाखानामेकैको व्याकृता त्वया ।
तावता तत्समानार्था ज्ञातु शक्यास्तत. परा ॥ ५ ॥
वासना विशदा यत्र मन्त्राणामशेषतः ।
प्रायेणाध्वर्यवं कर्म पूर्ण शाखान्तरैर्विना ॥ ६ ॥
करामलकवद्यत्र पर तत्त्व प्रकाशितम् ।
या काचीत्तादृशी शाखा त्वया व्याख्यायतामिति ॥ ७ ॥
सर्वत. सायणाचार्यो विमृश्योदीरितान् गुणान् ।
माध्यदिने शतपथे ब्राम्हणे व्याकरोति तत् ॥ ८ ॥

(शतपथ ब्राम्हण भाष्य -प्रतावना)

यावरून हरिहर राजाची वेदजिज्ञासा किती तीव्र, किती सूक्ष्म व किती खोल होती, याची चांगली साक्ष पटते शतपथ ग्रंथ म्हणजे काही लहान सहान ग्रंथ नव्हे. सर्व ब्राम्हण ग्रंथात त्याचे स्थान श्रेष्ठ व अग्रेसर असून, अनेक दृष्टीनें तो मोठा महत्वाचा ग्रंथ आहे त्यांत कर्म आहे, उपासना आहे, व ज्ञानहि आहे शिवाय मधून मधून सुंदर व उद्बोधक आख्यायिका व कथा आहेत, इतिहास आहे, विश्वाची उभारणी आहे, देवासुराच्या मनोरंजक गोष्टी आहेत, राजकारण आहे, देवसृष्टि आहे, मानवसृष्टि आहे, विश्वज्ञान आहे, तत्त्वज्ञान आहे, ब्रम्हज्ञान आहे थोड-क्यात म्हणजे मानवजीवनविकासाला व चिकित्सक व जिज्ञासु बुद्धीच्या समाधानाला उपकारक अशा विविध व उपयुक्त माहितीने तो ग्रंथराज परिपूर्ण नटलेला आहे ! तो एक वैदिक आर्यऋषीच्या अथांग बुद्धिमत्तेचा, अगाध कर्मोपासनेचा, अपार सृष्टिनिरीक्षणाचा व सूक्ष्म व गहन तत्त्व-ज्ञानाचा एक प्रचंड महासागरच म्हटले तरी चालेल !

त्याची एकदर चौदा कांडे असून, शंभर अध्याय, अडुसष्ट प्रपाठक, चारशे अडतीस ब्राम्हण व सात हजार सहाशे कंडिका आहेत ! असा तो प्रचंड ग्रंथ असून, विश्वज्ञानाने संपूर्ण ओथबलेला आहे यात यज्ञोपासनेचें सांगोपांग विवेचन, व परतत्त्वाचे सुंदर स्पष्टीकरण असल्यामुळे सायणा-चार्यांनी सर्व ब्राम्हण ग्रंथात तोच ग्रंथ पसंत करून, त्यावर विस्तृत भाष्य लिहिण्यास हाती घेतला या ग्रंथाविषयीं विशेष व उद्बोधक माहिती पाहिजे असल्यास, ती आमच्या 'याज्ञवल्क्य-दर्शन' (शतपथ परिचय) या ग्रंथात पहावयास मिळेल

जवळ जवळ ऋग्वेदा एवढ्याच प्रचंड ग्रंथावर सुंदर व उद्बोधक भाष्य लिहून, आचार्यदेवांनी जिज्ञासु जगावर फार मोठे उपकार करून ठेविले आहेत ते भाष्य नसते तर जगाला शतपथाची ओळख पटण्याला अडचण पडून, वैदिक धर्माचे खरें मर्म व रहस्य समजण्यास पंचाईत पडली असती हा ग्रंथ हल्ली मुंबई येथील वेंकटेश प्रेस मध्ये छापला असून, पाच भागांत प्रकाशित करण्यात आला आहे सायणाचार्यांनी भाष्य

लिहून संपूर्ण केल्यावर तो हरिहरराजास अर्पण केला असून त्याबद्दल तेथे शेरा आढळतो तो असा — श्रीमद्राजाधिराज परमेश्वर वैदिकमार्ग प्रवर्तक श्री हरिहर महाराज साम्राज्य धुरन्धरोण सायणाचार्येण विरचिते माधवीये वेदार्थ प्रकाशे माध्यन्दिनीय शतपथ ब्राम्हणभाष्ये प्रथमकांडे प्रथमप्रपाठके प्रथमाध्याये चतुर्थं ब्राम्हणम्। प्रथमाध्यायश्च समाप्त ॥' हा त्याचा बहुतेक शेवटचाच ग्रंथ होय यावेळी त्याचे वय जवळ जवळ सत्तराच्या वरी आले होते हा ग्रंथ लिहून तयार झाल्यावर त्याची शिणलेली लेखणी पुढे कायमची विश्रांत पावली।

हो, बरी आठवण झाली अगदी वेळेवर त्याचा आणखी एक ग्रंथ सांगावयाचा राहिला त्याचा जाता जाताच थोडक्यात नामनिर्देश करून हा विषय हातां निराळा करतो तो ग्रंथ म्हणजे 'यज्ञतंत्र सुधानिधि' हा होय. हा यज्ञानुष्ठान विषयक असून, तो शतपथ-भाष्याच्या पूर्वीच लिहिण्यात आला त्या ग्रंथाच्या पुढील शेऱ्यावरून तो द्वितीय हरिहर राजाच्या कारकीर्दीतच लिहिला गेला असावा, हें स्पष्ट होते 'इति श्रीमद्राजाधिराज परमेश्वर-हरिहर महाराज-सकल साम्राज्य धुरन्धुरस्य वैदिक मार्ग स्थापनाचार्यस्य सायणाचार्यस्य कृतौ यज्ञतंत्रसुधानिधौ ' असो

एकूण काय तर या अलौकिक, विद्वत्कुलशेखर, सरस्वतीकंठभूषण, श्रीमत्सायणाचार्यांनी विजयनगर साम्राज्याचे पंत अमात्यपद संभाळून, 'यज्ञतंत्र-सुधानिधि' 'अथर्ववेद-भाष्य', 'शतपथब्राम्हण-भाष्य, इत्यादि महत्वाचें टीकात्मक ग्रंथ तयार करून, वैदिक धर्मप्रेमी जिज्ञासु जगावर महनीय व अविस्मरणीय उपकार करून ठेविले आहेत, असें म्हटल्यास, त्यास खरोखर अतिशयोक्तीचा गंध मुळीं सुद्धा लागणार नाहीं, असे म्हटले, तर ते शोभणार नाहीं काय ?

---

## प्रकरण २३ वें

# माधवाचार्य व माधवमंत्री

(१) 'गोत्रे योऽङ्गिरसां प्रचंडतपसश्चावुडपृथ्वीसुर-
प्रष्ठादुद्भवमेत्य नीतिसरसौ दत्ता धिय धैषणीम् ॥'

(एपि कर्नाटिका, ७ शिकारपूर २८१)

(२) 'तस्याज्ञया माधवमन्त्रिवर्यं
प्रशासज्जयन्तीपुरराज्यमृद्धम् ।
यन्मन्त्रशक्त्या वपुरुत्सृजन्तोऽप्यरातयः
स्वास्थ्यमहो भजन्ते ॥ ४ ॥

(माधवपूर-दानपत्र)

(३) श्रीमत्काशीविलासाख्यक्रियाशक्तीशसेविना ।
श्रीमत्त्र्यम्बक पादाब्जसेवानिष्णातचेतसा ॥ १ ॥
वेदशास्त्रप्रतिष्ठात्रा श्रीमन्माधवमन्त्रिणा ।
तात्पर्यदीपिका सूतसंहितायां विधीयते ॥ २ ॥

(सूतसंहितातात्पर्यदीपिका)

(४) 'श्रीवीरबुक्रराजस्य विक्रम इव जगद्रक्षायै साक्षात्
परिगृहीतपवित्रपुरुषाकार. सोऽय श्रीमन्माधवामा-
त्यस्तस्यैव श्रीवीरबुक्कमहीपतेरादेशात् पश्चिमसरि-
न्नाथपर्यन्तराज्याधिपत्यमङ्गीकृत्य ,

(एपि कर्नाटिका खंड ८)

नामसादृश्यामुळे इतिहास लेखनात अपुऱ्या माहितीवरून व उथळ परिशीलनावरून पुष्कळ वेळा मोठा प्रमाद घडतो, हें आता महशूरच झाले

आहे आणि तंतोतंत हाच प्रकार येथेहि झाला आहे 'माधव' 'माधवमंत्री' 'माधवाचार्य' माधव अमात्य' या शब्दामुळे काही ऐतिहासिक ग्रंथकाराचा फार मोठा गैर समज झाला असून, 'माधवमंत्री' 'माधवाचार्य या नावाच्या विजयनगर दरबारात पृथक् पृथक् दोन व्यक्ति असूनहि त्याविषयी सूक्ष्म परीक्षण व निरीक्षण न झाल्यामुळे व नामसादृश्यामुळे त्या नावाची अशी एकच व्यक्ति असून, ती म्हणजे विजयनगरचे महाप्रधान व हरिहरादि राजाचे कुलगुरु माधवाचार्य हीच होय, असा समज झाला आणि तसे होणें हे एकादृष्टीने अपरिहार्यच होते

पण इतिहासाची साधनें जसजशी उपलब्ध होत गेली व संशोधकाची दृष्टि जसजशी सूक्ष्म व खोल व चौकस होत चालली, तसतसें पूर्वीचें मत चुकीचे ठरून, त्या ऐवजी निराळीच वस्तुस्थिति प्रकाशात आली आणि आता 'माधवमंत्री' अगर 'माधवाचार्य' या नावाची विजयनगर दरबारात एकच व्यक्ति नसून, दोन होत्या, हे मत प्रभावी ठरले आहे. तेव्हा त्याला अधिकृत व विश्वसनीय पुरावा काय व किती आहे, हे पाहणे क्रमप्राप्तच असल्यामुळे, त्याविषयी आम्हास उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक पुराव्याला धरून, येथे थोडासा खुलासा करण्याचे आम्ही योजिलें आहे

प्रस्तुत प्रश्नात शिरण्याच्या पूर्वी 'माधव' नावाच्या दोन व्यक्ति पृथक् ओळखण्यासाठीं म्हणून त्यापैकी एकास 'माधवाचार्य' व एकास 'माधव-मंत्री' अशी निरनिराळीं सूचक नावे देऊं 'माधवाचार्य' हे नाव विजय-नगरच्या पतप्रधानास व 'माधवमंत्री' हे नाव हरिहर राजाचा भाऊ जो मारप्पा वडेयर त्याचा मंत्री व सेनापति यास देऊ, म्हणजे वाचकाची समजूत पटण्यास सोयीचे होईल

आता 'माधव' या नावाच्या दोन व्यक्ति होत्या, यासंबंधी खुलासा करीत जातो माधवाचार्यांची माहिती वाचकाना आता पर्यंतच्या निरूप-णावरून स्पष्ट झालेलीच आहे सबब त्यासंबंधी खुलासेवजा पुनरुक्ति करण्याचें प्रयोजन राहिले नाहीं फक्त तीच माहिती येथे तुलनेसाठीं यथाप्रसग थोडी थोडी देत जातो माधव मंत्रीची माहिती जी आम्हीं

येथे देणार आहो, त्याला आधार मथळ्यावरील चार वचनातून मिळूं शकतो त्यावरून आमचे हे पुढील विवेचन करण्यात येत आहे

## माधवाचार्य व माधवमंत्री यांचे तुलनात्मक चरित्र

| माधवाचार्य | माधवमंत्री |
|---|---|
| बाप – मायण | बाप – चाउड उर्फ चौंड (१) |
| आई – श्रीमती | आई – माचाम्बिका |
| गोत्र – भारद्वाज | गोत्र – आंगिरस (१) |
| गुरु – विद्यातीर्थ | गुरु – काशीविलास-क्रियाशक्ति(३) |
| दैवत – भुवनेश्वरी | दैवत – त्र्यंबकेश्वर (३) |
| पंथ – अद्वैत-स्मार्त | पंथ – पाशुपत शैव |
| जात – कर्नाटकस्थ आंध्र ब्राम्हण | जात – गौड सारस्वत ब्राम्हण |
| शाखा – यजुर्वेदी तैत्तिरीय | शाखा – ऋग्वेदी |
| हुद्दा – विजयनगरचा महाप्रधान व राजगुरु | हुद्दा – मारप्प वडेयरचा मंत्री व सेनापति |
| वासस्थान – विजयनगर | वासस्थान – जयन्तीपुर (२) |
| नाव – माधव माधवाचार्य, माधवमंत्री, माधवअमात्य, विद्यारण्य | नाव – माधव, माधवाचार्य (३) माधवमंत्री (२) माधव अमात्य (४) राज्यपाल (बनवासी व गोवा) |
| ग्रंथकार – पराशर-माधव, पंचदशी, अनुभूति-प्रकाश, जीवन्मुक्ति विवेक, इत्यादि | ग्रंथकार – सूतसंहिता तात्पर्य-दीपिका ३) |
| बिरुदावळ-कर्नाटक सिंहासन-स्थापनाचार्य, वेदमार्ग प्रतिष्ठाचार्य, विद्यारत्नमहोदधि, श्रीमत् शंकराचार्य (शृंगेरी पीठ) इ | बिरुदावळ – दण्णायक, राज्यपाल, मंत्रीवर्य, माधवरस, माधवरस वडेयरु उपनिषन्मार्ग-प्रवर्तक इ |

या प्रमाणे माधवाचार्य व माधवमंत्री याचा इतिहास आहे माधव-मंत्री याच्या इतिहासाचा शोध म्हैसूर येथील श्रीयुत बी सूर्यनारायणराव व श्रीयुत नरसिह आचार्य यानी प्रथम लावून, तो जगापुढे माडला असो

आता माधवमंत्री याच्या विषयी आणखी थोडी सविस्तर हकीकत देतो हा माधवमंत्री प्रथम हरिहर राजाचा धाकटा भाऊ मारप्पा वडेयर याचा मत्री असून, तो त्यावेळी गोमतशैलात चद्रगुप्ती येथे राहत होता ही हकीकत इ स १३४७ च्या एका शिलालेखात सापडते, ती अशी —

कल्लासनान्मारपभूमिपाल सम्प्राप्य राज्य दिशि
पश्चिमायाम् ।
गोमंतशैले वरचद्रगुप्तौ स्थित्वा सुखं सम्यगपालयत्
प्रजा ॥
धर्मेण तस्य परिपालयत. प्रजानाम् ।
राज्ञोधिराज्यगहनाम्बुधिकर्णधार ॥
प्रज्ञाबलेन गुरुमप्यतिसन्दधानो ।
मन्त्री महानजनि माधवनामधेय ॥

(एपि कर्नाटिका खंड ८)

हा माधवमत्री मारप्पा वडेयर याच्या मंत्रीपदावर असताना त्याने कदंबप्रात म्हणजे दक्षिण कानरा प्रात जिकून, तो विजयनगर साम्राज्यास जोडला त्याच प्रमाणे होनाव्हरच्या सुलतानास जरब दाखवून, त्यास शरण आणून हरिहराच्या माडलिकात दाखल केलें त्याची ही कर्तबगारी पाहून पुढें मारप्पाच्या नतर बुक्कराजाने त्यास इ स १३६८ साली आपल्या मत्रीमडळात दाखल करून घेतले ही गोष्ट खालील वचनावरून सिद्ध होते तें वचन हें असे —

‘तस्यास्ति शस्तयशसो नयशौर्यमुख्यै. ।
ख्यातो गुणैर्जगति माधव इत्यमात्य ॥

(एपि कर्नाटिका, खंड ७, शिकारपूर २८१)

येथे 'तस्य' म्हणजे 'बुक्कस्य' असा संदर्भ आहे पुढे गुणज्ञ बुक्क-राजाने या माधवमत्रीचे शौर्यादि गूण व राजकारणपटुत्व पाहून त्यास पश्चिम समुद्रावरील प्रांताचा सुभेदार करून जयतीपूर म्हणजे बनवासी येथें त्याची नेमणूक केली याचा आधार मथळ्यावर देण्यात आलेल्या न ४च्या वचनात सापडतो- या सर्व विवेचनावरून माधवमत्री हा शूर योद्धा, मत्री, सुभेदार व शैवभक्त म्हणून ख्याति पावलेला होता, हें स्पष्ट आहे अर्थात् या सर्व गोष्टी विचारात घेता विजयनगरचे महाप्रधान माधवाचार्य व बनवासीचे सुभेदार माधवमत्री या भिन्न भिन्न व्यक्ति होत्या, असा स्वच्छ निष्कर्ष निघतो. असो



## प्रकरण २३ वे

# कोंकण–दिग्विजय

आशान्तविश्रान्तयशा स मन्त्री
दिशो विजीषुर्महता बलेन।
गोवाभिधां कोंकणराजधानी-
मन्येन मन्येऽरुणदर्णवेन ॥ ५ ॥
प्रतिष्ठितांस्तत्र तुरुष्कसघा-
नुत्साद्य दोष्णा भुवनैकवीर ।
उन्मूलितानामकरोत् प्रतिष्ठाम्
श्रीसप्तनाथादि-सुधा भुजा य ॥ ६ ॥

(माधवपूर-दानपत्र)

हरिहर (द्वितीय) राजाच्या कारकीर्दीत विजयनगर साम्राज्याला फारच स्पृहणीय व प्रलोभनीय स्वरूप आले होते साम्राज्याची वडी दक्षिणेत कृष्णेच्या खाली फारच चागली आणि नीट व्यवस्थेत बसली होती त्याला विरोध असा फारसा राहिला नव्हता अगदीच नाही म्हणावयाला एकच काटा मात्र अधुन मधुन बोचत होता तो म्हणजे गोव्यातील भडदाड मुसलमानांचा हा होय हा टापू कडव्या तुरुष्काच्या ताब्यात असून, त्याचा अम्मल अपरात-प्रातभर-म्हणजे उत्तर कोकणात ठाण्यापर्यंत-चालू होता

तेथील मुसलमान पुंडखोर लोक सधि साधून शेजारच्या मुलुखात म्हणजे विजयनगरच्या हद्दीत शिरून, तेथे धुडगूस घालीत असत खुद्द गोव्यातील हिंदूची परिस्थिति अत्यत कष्टमय व चिंताजनक झाली होती देवालये कुलुपे ठोकून बद करण्यात आली असून, हिंदूवर अनन्वित

जुलूम-जबरदस्तीचे राक्षसी अत्याचार, हरतऱ्हेची छळणूक, गाजणूक याना धरबंदच राहिला नव्हता अर्थात् आसुरी सुलतानशाहीचे तेथे तांडव नृत्य चालले होते!

खरे सांगावयाचे म्हणजे हे तुरुष्क लोक फारच माजले व बेफाम झाले होते त्यांच्या जुलुमाची व अत्याचाराची कथा अलीकडे विजयनगर दरबारात रोज नवीन नवीन येऊ लागली तक्रार नाही असा दिवस जाईनासा झाला तसे म्हणजे हा एवढा गोवा प्रांतच काय तो आता दक्षिणेत मुसलमानाच्या दाढेत अडकून राहिला होता तो तेवढा मोकळा झाला म्हणजे विजयनगरला दक्षिणेत म्हणण्यासारखा शत्रु राहिला नव्हता

ही गोष्ट बुक्क भूपालाच्या ध्यानात आली नव्हती, असे नव्हे त्याची नजर त्या प्रांतावर होतीच तेथून तुरुष्काची उचलबांगडी केल्यास संबध अपरांत प्रांत म्हणजे गोव्यापासून ठाण्यापर्यंतचा सगळा मुलुख विजयनगरच्या सत्तेखाली येणार होता म्हणून योग्य संधीची ते वाट पहात होते आणि याच उद्देशानें त्यानी माधवमंत्रीची कोकणपट्टीचा सुभेदार म्हणून नेमणूक केली होती पण त्याच्या हयातीत तसा प्रसंग आला नाही बुक्काचें सामर्थ्य तुरुष्क चांगले ओळखून असल्यामुळे त्याच्या आमदानीत ते वचकून व दबकूनच होते पण पुढे म्हणजे इ स १३७७ साली बुक्क राजे कालवश झाले आणि त्याचा बेत नुसत्या संकल्पातच विरून गेला

पुढें हरिहराच्या कारकीर्दीत या गोवेकराच्या महत्त्वाकांक्षेला व आडदांडपणाला रंग व उकळी फुटली त्यावेळी गोमांतक प्रांतभर व बाहेरहि परमुलुखात शिरून धुडगूस घालण्यास त्यानी प्रारंभ केला हिंदुजनतेला चोपत व चेपत व हिंदुधर्माला तुडवीत व चुरडीत इस्लामी टोळ्या मोकाट सुटून थयथयाट घालू लागल्या तेथील त्रस्त हिंदूंची असहाय स्थितींतील आर्त आरोळी नित्यश विजयनगर दरबारात येऊन आदळू लागली. विजयनगरच्या सरहद्दीवर व गोवा प्रांतभर त्यानी पुंडगिरीच माजविली होती शेवटीं पंतप्रधान सायणाचार्यांनी ती गोष्ट मनावर घेऊन गोव्याचें पारिपत्य करण्याचा सल्ला राजास दिला व हरिहरास तो पटून त्याने

गोव्याचा समाचार घेण्यास बनवासी येथील सुभेदारास म्हणजे माधव मंत्रीस हुकूम दिला

हरिहर राजे माधव मंत्रीस नुसती आज्ञा करूनच राहिले नाहीत तर त्याच्या मदतीस विजयनगरहून मोठे सैन्यहि पाठवून दिले व इतर मदतहि भरपूर दिली. माधवमंत्री याना गोवा प्रांताची चांगली माहिती होती डोंगर, दऱ्या, नद्या-नाले, वाटा-अडवाटा यांची त्याना खडान् खडा माहिती असल्यामुळे त्याचा फायदा आता त्यानी चांगला करून घेतला सैन्याची चांगली जुळवाजुळव व लढाईची सर्व सिद्धता झाल्यावर त्यानी बनवासी येथून तळ हलविला

ही बातमी गोव्यात मुसलमानास जाऊन थडकली त्यानीहि पराकष्ठा करून आपली बाजू बळकट व सुसज्ज करण्यास कमी केले नाही विजयनगरचे सैन्य दौड करून गोव्याच्या हद्दीत शिरले तेथे त्याना म्हणण्यासारखा अडथळा झाला नाहीं हा हा म्हणता माधवमंत्रीने थेट गोव्यापर्यंत धडक मारून त्यास वेढा दिला दोघाची तेथे झुंज लागली व भयंकर रणधुमाळी माजली ही झुंज आता लांडग्या-कोकराची नव्हती तर हत्ती-सिंहाची होती हिंदू म्हणजे शेळपट व पळपुटे असा तुरुष्कांचा ग्रह झाला असल्यामुळे सुरवातीला त्यानी उग्ररूप धारण करून, हिंदूवर मोठ्या आवेशाने चढाई केली. आणि त्याना मागे रेटण्याचा प्रयत्न केला पण बिचाऱ्याची याखेपेस फसगत झाली

हे जे विजयनगरचे सैन्य होते, ते पूर्वीसारखे शेळपट नसून चांगले कसलेले धाडसी व रणधुरंधर होते आता त्यांच्यात सिंहाची छाति व वाघाचा पराक्रम मुसमुसत होता मागे अनेक वेळा त्यानें मुसलमानाशी नेटानें व धैर्यानें लढून, त्यास धूळ चारली होती दुष्मनचे डावपेंच ते चांगले ओळखून होते दिवसे दिवस लढाई रंगत चालली तुरुष्कानी आपल्या शौर्यांची व पराक्रमाची शिकस्त केली पण त्याचा काही परिणाम झाला नाही उलट त्याचाच पाय मागे पडत चालला हिंदूचा मारा त्याना पुढे पुढे चांगला जाणवूं लागला रणझुंजार माधवमंत्र्यानी योग्य संधि

साधून, त्याच्यावर अचानक वाघाची झडप घालून मुसलमानाची फळी फोडली! आणि धडाक्याने आत घुसून त्याची लाडगोतोड चालविली।

हा हिंदूंचा मारा सहन न होऊन जीव घेऊन ते रणातून पळत सुटले! आणि हिंदू सैन्याने त्याचा पाठलाग करून, त्याना दशदिशेस पिटाळून लावले! विजयनगरचा विजयी झेंडा आता गोव्यात प्रवेश करून मोठ्या थाटानें मिरवीत मिरवीत तेथील सुलतानच्या वाड्यावर नेऊन फडकविण्यात आला! गोवा पडले! तुरुष्क हरले!! आणि विजयश्रीने विजयी हिंदूच्या गळ्यात विजयमाळ घालून, जगात त्याचे नाव सस्मरणीय करून ठेविले!!!

या विजयाने कोकणातील इस्लामी सत्तेला अखेरची मूठमाती मिळून, मालवणपासून तो खाली मलबारपर्यंत सगळा मुलूख आता विजयनगर साम्राज्यात विलीन करण्यात आला याचा परिणाम असा झाला कीं कृष्णेपासून खालीं कन्याकुमारीपर्यंत व पश्चिमसमुद्रापासून पूर्व समुद्रापर्यंत सगळा मुलूख विजयनगर साम्राज्याच्या सत्तेखाली आला! हरिहर-राजाच्या कारकीर्दीतील ही एक अपूर्व व अलौकिक अशी महत्वाची सस्मरणीय घटना म्हटली तरी ती शोभण्यासारखीच आहे!

हा गोवा प्रात विजयनगरच्या ताब्यात आल्यावर माधवमंत्री यालाच त्या प्राताचा राज्यपाल नेमण्यात आले अर्थात् बनवासी व गोवा या दोन्ही प्रांताचा कारभार तोच पाहू लागला या विजयानतर त्याला 'माधवरस ओडेयर, 'गोवापुराधीश्वर' 'तुरुष्कदळ विभाड' व 'रगिनी-प्रताप' इत्यादि बिरुदावळी बहाल करण्यांत आल्या

म्हैसूर ग्याझिटीर, खड २, भाग ३, प्र ११, पृ १४४२)

माधवमंत्री याने गोवा जिकून घेतल्यावर पुढे त्यान या विजयाच्या संस्मरणार्थ चोवीस विद्वान ब्राम्हणास कुचर हा गाव, त्याचे नाव बदलून माधवपुर असे ठेवून इनाम घालून दिला, या विषयी ताम्रशासनलेख आहे, तो असा —

'स्वस्ति श्रीशके त्रयोदशाधिक त्रीशतोत्तर सहस्रगते वर्तमान प्रजापति सवत्सरे वैशाख-मासे कृष्णपक्षे अमावास्याया सौम्यदिने सूर्योपराग पुण्यकाले

स्वति श्रीमन्महामन्त्रीश्वर उपनिषन्मार्गप्रवर्तकाचार्य श्रीमन्माधवराज कुजरविषयवर्तिन कुचरनामान ग्राम माधवपुरमिति प्रथितनामान अग्रहार कृत्वा ब्राम्हणेभ्यो ददे' येथे माधवमंत्री याला श्रीमन्माधवराज असे म्हटलें असून, त्यावरून माधवमत्री व माधवाचार्य या निरनिराळ्या व्यक्ति होत्या, या विधानास बळकट पुष्टि मिळते, हे लक्षात घेण्यासारखे आहे हा वरील ताम्रपटलेख इ स १३९१ सालचा आहे

गोवा पडल्यावर पुढे इ स १३९५ सालीं माधवमत्रीच्या पश्चात् त्याच्या जागी आलेला नरहरमत्री याने गोव्याच्या आसपासचा मुलूख म्हणजे कुडाळप्रात, भीमगड, अबोली, चदगड इत्यादि जिंकून, तो देश विजयनगरास जोडण्यात आला कोकणातला हा शेवटचा विजय होय

येथे ही गोष्ट आम्हास नमूद करून ठेवाविशी वाटते कीं, विजय-नगरचे महत्व भारतीय इतिहासात अत्यत उच्च व अत्यंत श्रेष्ठ असून, तें इतिहासकाराने व भारतीय सस्कृतीचा अभिमान बाळगणाऱ्यानें सदैव नजरेपुढे ठेवण्यासारखे आहे सबंध भारतात-काश्मीर पासून रामेश्वरा-पर्यंत-अनिरुद्ध सचार करून सर्वत्र भस्मासुराप्रमाणे थैमान घालणाऱ्या प्रबल इस्लामी सत्तेला व पुडगिरीला पक्का पायबद घालून जर कोणी आळा घालण्याचे प्रसशनीय व सस्मरणीय सर्वश्रेष्ठ श्रेय जोडलें असेल, तर तो अग्रपुजेचा मान खास विजयनगरचाच आहे !

उत्तर भारतात तर ती गोष्ट शेवटपर्यंत घडून आली नाहीं प्रबल इस्लामी सत्तेपुढे डोके वर करण्याची तेथे कोणाचीच छाति व पुण्याई नव्हती ! पजाब काय, सिंध काय, गुजराथ काय, बंगाल काय, बिहार काय, अयोध्या काय, हे प्रात जे एकदा इस्लामी दाढेत शिरले, ते पुन त्या जबड्यातून अखेरपर्यंत सुटले नाहींत व तेथील लोकाना सोडविणें झालें नाहीं ती मर्दुमकी फक्त दक्षिणेतील विजयनगरचीच आहे ! जहाल इस्लामी सत्तेविरुद्ध नेटाने व धैर्यानें बड पुकारून, प्रबल इस्लामी सत्तेला यशस्वीपणें तोड देऊन, त्याला दक्षिणेत मूठमाती दिली, हा सस्मरणीय इतिहास भारत इतिहासांत खास सुवर्णाक्षराने लिहून ठेवण्यासारखा आहे

पुढे मराठ्यांनी जी मर्दुमकी गाजविली व इस्लामी सत्तेला प्रचंड हादरा देऊन, तिला खिळखिळीत करून टाकलें, व अटकेपर्यंत विजयी भगवाझेंडा नाचवीत व मिरवीत नेला, ते सर्व श्रेय विजयनगरचा हा तेजस्वी कित्ता पुढे घेऊनच! या बाबतींत मतभेद होईल, असे आम्हास वाटत नाही असो

या थोर हरिहर राजाच्या कारकीर्दींत विजयनगर साम्राज्याला मोठें वैभव प्राप्त होऊन, त्याची कीर्ति दिगंत जाऊन थडकली त्यावेळीं वैभवशाली विजयनगरला कुबेरनगराची दिव्य शोभा आली होती! खुद्द हरिहरराजे आपल्या अनेक सद्गुणामुळे प्रजेला अत्यंत प्रिय झाले होते

ते जसे शूर होते, तसेच मोठे प्रेमळहि होते, जसे प्रेमळ होते, तसेच धार्मिकहि होते, जसे धार्मिक होते, तसेच मोठे उदारहि होते, जसे उदार होते तसेच न्यायप्रियहि होते, जसे न्यायप्रिय होते, तसेच दयावंतहि होते अर्थात् त्याची धर्मनिष्ठा, न्यायबुद्धि, औदार्य दयाळुपणा, प्रजावात्सल्य, कारुण्यस्वभाव, इत्यादि हिंदु राजाला शोभणारे सर्व सद्गुण त्याचे वारवाण्यासारखे होते

नेल्लूर दानपत्रातील त्याची बिरुदावळ पाहिली म्हणजे आमच्या म्हणण्याची चांगली साक्ष पटण्याजोगी आहे म्हणून त्या दानपत्रातील त्याच्या बिरुदावळीचा उतारा आम्ही येथें जशाचा तसाच देतो त्याची बिरुदावळ ही अशी आहे:—

(१) श्रीमद्राजाधिराज राजपरमेश्वर, (२) पूर्वदक्षिणपश्चिमोत्तरसमुद्राधीश्वर, (३) दुष्टराजराजन्यभुजंगवैनतेय, (४) शरणागतवज्रपञ्जर, (५)कलिकालधर्म (६) कर्नाटक लक्ष्मीकर्णावतंस, (७)चतुर्वर्णाश्रमपालक, (८) रणरंगभीषण, (९) परराजराजीव सुधाकरः (१०) परनारी सहोदर, (११) पुण्यश्लोकप्रहर्ष, (१२) शार्दूलमदभंजन, (१३) वेदभाष्यप्रकाशकः, (१४) वैदिकमार्गस्थापनाचार्य, (१५) कर्मोपेताध्वर्यु, (१६) राजकल्याणशेखर' इत्यादि इत्यादि

(एपि इंडिका, खंड ३, नेल्लूर नं १९, पृ १२१)

यावरील बिरुदावळीवरून, हरिहरराजाची योग्यता, श्रेष्ठता, धार्मिकता, दानशूरता सहज नजरेंत भरते अतएव त्याविषयीं अधिक विस्तार करण्याचें कारण नाहीं

पुढे हें विजयनगरचे राज्य वाढता वाढता इतकें वाढलें कीं, त्याची सीमा एके काळीं गोदावरीपर्यंत जाऊन भिडली होती त्यावेळचें कर्नाटकाचे वर्णन एका कवीनें केलें आहे, ते मननीय असल्यामुळें येथें देत आहों तें वर्णन हें असे —

ಕಾವೇರಿಯಿಂದಂ ಗೋದಾವರಿವರೆಗೆವಿ ।
ರ್ದಾವಸುಧಾತಳ ವಳಿಯು ॥
ಭಾವಿಸೆ ಕರ್ಣಾಟಕ ಜನಪದವದ ।
ನಾವೆ ನೊಲಿದು ಬಣ್ಣಿಸುವನು ॥
ನಡವಂಚೆ ನುಡಿವರಗಿಳಿ ನಲಿದಾಡುವ ।
ಬಿಡಗಿನ ನವಿಲು ಕೂಗಿಡುವ ॥
ಪಡಿ ರವಕ್ಕಿ ಮೊರೆವ ಪರಮೆಗಳೆರ್ದೆ ।
ಗೆಡಿಪುವು ಪಥಿಕರನಲ್ಲಿ ॥
ಮುಡಿಯೆಂಬ ಮಾತು ಸಂಖ್ಯಾವಾಚಿಗಳ ಕಟ್ಟೆ ।
ಕಡಿಯೊಳು ಶಾಕವಾಟೆಯೊಳು ॥
ತಡೆಯುದಾರಜಕರೊಳಲ್ಲದಾಜನಪದ ।
ದೆಡೆಯೊಳಿಲ್ಲೆಲ್ಲಿ ನೋಡಿದಡಂ ॥

कुमार रामन कथे, कवि नंजुड (इ स १५२५)
कर्नाटक कविचरित, भाग २ पृ २०५
*Political & Social life in Vijayanagar*
*Part I (Dr B A Saletore)*

यावरून कर्नाटकाची सीमा इ स १५२५ च्या सुमारास उत्तरेस आग्रात गोदावरीपर्यंत, व दक्षिणेस कावेरीपर्यंत, जाऊन भिडली होती, हें स्पष्ट दिसून येते

या विजयनगर साम्राज्याचा विस्तार जसा अफाट होता, तसाच तो देशहि धनधान्यादिकानी व खनिज सपत्तीनी अत्यत समृद्ध होता त्या राज्यातील म्हैसूर प्रातात सोन्याच्या खाणी असून, गोवळकोड्याच्या भागात हिऱ्याची मोठ्याप्रमाणावर पैदास होत होती प्रसिद्ध कोहेनूर हिरा तो येथल्या खाणींतच पैदा झालेला होय पूर्व समुद्रावर मोतीं निघत असत सोडूरच्या भागात लोखडाची उत्पत्ति होत होती त्याचप्रमाणे जमीनहि अत्यंत सुपीक असून, विविध धान्याची पिके भरघोस येत होतीं म्हैसूरच्या पश्चिमेस घनदाट जंगल असून, तेथे चदन, साग, बाबू व इतर हरतऱ्हेचे वन्य वृक्षलतादिकाचे निबिड व घनघोर अरण्य माजून राहिले होतें व त्यात यथेच्छ वावरणारे हत्ती, वाघ, चित्ता, हरण, सारंग व इतर वन्य पशुसपक्षि मुबलक उपलब्ध होतीं एकंदरीत हें सर्व थोडक्यात सागावयाचे म्हणजे राज्याच्या अवाढव्य विस्ताराप्रमाणे देशहि सर्व बाजूनी सुसपन्न होता अर्थात् तेथील प्रजाहि सुखी व सपन्न होती, हें ओघानेच सागणे प्राप्त आहे



## प्रकरण २५ वे

# भाग्यशाली विजयनगरचे दिव्य रूपैश्वर्य-दर्शन

तस्यासीद्विजया नाम विजयार्जितसम्पद ।
राजधानी बुधै श्लाघ्या शक्रस्येवामरावती ॥
सुरलोकान्तसक्रान्तस्वर्णदीमत्सरादिव ।
परिखारतां यान्त्या परीता तुङ्गभद्रया ॥
लक्ष्मीलतालवालेन क्ष्मावधूनाभिशोभिना ।
चक्राचलप्रकारेण प्राकारेण परिष्कृता ॥
स्फुरन्मणिप्रभाहूत पुरूहूत शरासनै ।
सुमेरुशृंगसकाशै. गोपुरै उपशोभिता ॥
लीलेवदिग्वितवृद्धीनां शालेव सकलश्रियाम् ।
मालेव सर्वरत्नाना वेलेव सुकृताम्बुधे. ॥
यस्यां प्रासादशृंगेषु लग्न मार्ताण्डमण्डलम् ।
सन्धत्ते वीक्षमाणाणां सौवर्णकलशभ्रमम् ॥

मधुराविजयम् *I, VV, 43*

विजयनगरची राजस्नुषा विदुषी गगादेवी हिने विजयनगरराजधानीचे केलेले 'मधुरा विजय' मधील काव्यमय वर्णन सत्यसृष्टीत कसे व किती प्रतिबिंबित झाले होते, याची येथे वाचकास थोडक्यात ओळख करून दिल्यास विजयनगरच्या सौंदर्याची, ऐश्वर्याची व विशालतेची कल्पना करण्यास मदत होईल, या आशेनें प्रस्तुत प्रकरण खर्ची घालण्याचा सकल्प केला आहे

ही विजयशाली राजधानी म्हणजे पृथ्वीवरील प्रत्यक्ष इंद्रपुरी बनली होती, असे सांगितल्यास त्यात सत्याचा अपलाप झाला, असा आरोप सहसा

येणार नाहीं, याची आम्हांस खात्री आहे आणि वाचकानाहि त्याची प्रचीतिच पटवून द्यावयाची झाल्यास, आमच्या पदरचे न सागता त्रयस्थ अशा विदेशीय प्रेक्षकानी प्रत्यक्ष डोळ्यानी पाहून जे तिचे स्पृहणीय वर्णन केले आहे, त्याचाच येथे हात आखडून अनुवाद करतो म्हणजे झाले. त्यावरून त्या राजधानीचा विस्तार, त्याची रचना, त्याचे सौंदर्य, त्याचें वैभव कसे व किती होते, याचे चित्र त्याच्या लेखणीतून उतरलेल्या वर्णनावरून व येथे घातलेल्या चित्रावरून नजरेत भरून, त्याचे समाधान होईल

विजयनगर येथे परदेशीय पाहुणे त्या राज्याचा लौकिक ऐकून सौंदर्य व वैभव प्रत्यक्ष डोळ्यानी पाहण्यास मुद्दाम येत असत त्यात अब्दुर रझक हा अधिक महत्वाचा व अधिक विश्वसनीय असा राज-प्रतिनिधि पाहुणा होता त्याची इराणच्या शहाकडून राजशिष्ट म्हणून योजना झाली असून खुद्द विजयनगरच्या द्वितीय देवराय राजाच्या आमंत्रणावरून तो येथे आला होता व जवळ जवळ आठ महिने तेथे वास्तव्य करून होता त्याने विजयनगरचे लिहिलेले वृत्त 'पधराव्या शतकातील हिंदुस्थान' यापुस्तकात इग्रजीत रूपातरित होऊन प्रसिद्ध झाले आहे त्याला धरून हें आमचे वर्णन आहे

त्याने आपल्या प्रवासवृत्तात विजयनगरचे जे वर्णन दिलेलें आहे, ते प्रत्यक्ष पाहून दिलेलें–म्हणजे 'चक्षुर्वै सत्य' चे–असल्यामुळे त्याला सर्वांत अधिक महत्त्व आहे हा पाहुणा द्वितीय देवराय गादीवर असतांना म्हणजे इ स १४४३ साली तेथे आला असून, त्याची व देवरायाची प्रत्यक्ष गाठभेट पडली होती व तो राजशिष्ट म्हणूनच त्याची राजाने खास दरबारी व्यवस्था ठेविली होती तेव्हा त्याने केलेलें वर्णन हे अधिक विश्वसनीय आहे, हे निराळे सागावयास नकोच तो तत्कालीन विजय-नगरचे वर्णन करतो, ते असे –

'या विजयनगरासारखें सुदर व प्रेक्षणीय असे वैभवशाली शहर साऱ्या दुनियेत कोठें पाहण्यात येईल असें वाटत नाहीं त्याची माडणी व रचना

काही विलक्षण आहे त्याच्या सभोवार सात भक्कम कोट असून, ते एकाच्या पोटात एक आहेत आणि त्यात सात अंतर्दुर्गहि आहेत! सर्वांत बाहेरचा जो कोट आहे, त्याच्या सभोवती पुरुषभर उचीचे दगड जवळ जवळ उभे पुरलेले असल्यामुळे त्यातून स्वार व शिपाई याना सहज जाता येत नाहीं बाहेरच्या कोटाच्या पूर्व पश्चिम महाद्वारा मधले अतर सात मैल असून उत्तरदक्षिण द्वाराचे अतरहि तितकेच आहे तसे सागावयाचे झाले तर या कोटाचा घेर जवळ जवळ साठ मैलाचा असून, त्याची उची पर्वता एवढी आहे!

पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या या तटबदींमध्ये बागा, बगिचे, शेते, वाड्या व घरे असून तेथे लोकवस्ती विरळ आहे आणि आतली वस्ती फार दाट असून, तेथे दुकने, घर व बाजार सारखे लागलेले आहेत हा मधला शहरचा भाग अत्यंत गजबजलेला आहे

येथे चोहोकडे सुदर गुलाबाची सुवासिक फुले विकावयास ठेवलेलीं असून, त्याशिवाय येथील लोकाचे चालण्यासारखेच नाही ती त्याना अन्नाइतकी–किंबहुना अधिकच–प्रिय व म्हणून आवश्यक वाटतात बाजारात निरनिराळ्या व्यापारी लोकांचीं दुकाने एकमेकास भिडलेलीं असून, जव्हेरी बाजारात जव्हेरी लोक उघडपणे खुल्या बाजारात मोतीं, माणके, पाच, व हिरे इत्यादि जडजवाहीर व इतर मौल्यवान पदार्थ राजरोस विक्रीला ठेवून बसतात या सुंदर व प्रेक्षणीय शहरात आणि राजवाड्याच्या आवारांत जागजागीं चिरेबदी दगडी पाट बाधून, त्यातून नदीचे स्वच्छ व गोड पाणी सर्वत्र मुबलक खेळविण्यात आले आहे!

सातवा कोट अगदी आतला असून, तो राजवाडा व सरकारी इमारती याच्या सभोवती बाधण्यांत आला आहे तो गावाच्या उत्तरेस एका उचवट्यावर असून, तो दगड व चुना यानी भक्कम व मजबूत बाधून काढण्यात आला आहे त्याचे दरवाजेहि तितकेच भक्कम व मजबूत असून, तेथें पहारेकऱ्यांचा रात्रंदिवस खडा पाहरा असतो येथे आत शिरताना प्रत्येक मनुष्याची कसून चौकशी, झडती व तपासणी करण्यात येते

हा सातवा म्हणजे सर्वांतला आतला किल्ला उत्तरेकडे असून तो गोलाकृति आहे त्याच्या आत राजाचा राजवाडा आहे राजवाड्याच्या बाहेर उत्तर बाजूला मुख्य देवडी असून, त्याच्यापुढे सुरेख व प्रशस्त आगाशा बांधलेल्या आहेत राजाचा मुख्य दिवाणखाना सर्वांत उंच आहे देवडीच्या डाव्या बाजूला एक मोठा उंच व भव्य असा मुख्य दिवाणखाना आहे त्याच्या पुढे ६० हात (३० यार्ड) लांब व वीस हात (१० यार्ड) रुंद व पुरुषाहून उंच असे एक मोठे दालन असून, तेथें दफ्तरखाना व कारकून बसण्याची जागा आहे त्याच्या मध्यभागी उंच असा एक चबुत्रा असून, त्याच्यावर सर्व आमल्याचा मुख्य अधिकारी म्हणजे दनायक (न्यायाधीश) हा बसतो तेथे चोपदार लोक रांगेत उभे असतात दिवाण अगर दनायक लोकांच्या फिर्यादी व अर्ज घेऊन त्याचा निकाल करतो तो अखेरचाच निकाल असून, त्यावर अपील नाही सर्व कामकाज संपल्यावर तो तेथून उठून सात दरवाजे ओलांडून आत राजाजवळ जाऊन त्या दिवसाच्या काम-काजाची त्यास सर्व हकीकत कळवितो

राजवाड्याच्या मागच्या बाजूला दनायकाचा म्हणजे सेनापतीचा महाल व दिवाणखाना आहे त्याच्या डावीकडे टाकसाळ आहे दिवाण-खान्याच्या समोरच हत्तीशाळा असून, प्रत्येक हत्तीसाठी तेथे वेगवेगळी व्यवस्था करण्यात आली आहे टाकसाळी समोरच मुख्य किल्लेदाराचा वाडा आहे तेथें बारा हजार शिपायाचा नेहमी तळ असतो टांकसाळी मागे बाजार असून, त्याच्या दोन्ही बाजूस वाडे व चौक आहेत त्याच्यापुढे बसण्यासाठी म्हणून खोदीव दगडी अशी उंच व सुरेख सुखासने केलेली आहेत या राजमार्गांच्या दोन्ही बाजूस सिंह, वाघ, चित्रे वगैरेंची दगडी चित्रे कोरून तेथे तेथे उभी करण्यात आली आहेत. पुढील चबुत्रे, गच्च्या, व ओटे यांच्यावर सुंदर बैठका घालून त्यावर वेश्या नटून थटून व सुंदर वेशभूषा करून बसलेल्या असतात.

या राजाजवळ एक लाख दहा हजार (११००००) फौज असून, शिवाय तीस हजार (३००००) घोडे स्वार व एक हजार हत्ती आहेत!

राज्याचा विस्तार सिलोन पासून कलबुर्ग्यापर्यंत आहे या राज्यात दोनशे सरदार व माडलीक राहत असून, त्याचेपाशी १९००० स्वार, १७१००० पायदळ व ६३३ हत्ती आहेत

मी गेल्यावेळीं तेथे एक मोठा उत्सव चालला असून, त्यात एके दिवशी मला राजाकडून बोलावणे आले म्हणून मी सध्याकाळी दरबारात गेलो तेथे राजा एका मोठ्या व प्रशस्त अशा दिवाणखान्यात बसला होता त्याच्या दुतर्फा दरबारी लोक बसले होते राजाच्या अगात हिरव्या साटिणीचा (मखमलीचा) पायघोळ झगा असून, गळ्यामध्ये टपोरी पाणीदार मोती व इतर रत्ने लाविलेला गळपट्टा होता तो सडपातळ व उच बाध्याचा असून, त्याचा चेहरा मनोहर दिसत होता वर्ण काळासवळा असून मिशा बारीक होत्या

तो महानवमीचा उत्सव असून, त्यावेळी सारे माडलिक, सरदार, सेनाध्यक्ष, व इतर प्रमुख लोक राजवाड्यात उपस्थित झाले होते त्याच्या-बरोबर २००० (दोन हजार) हत्ती आले असून, त्या हत्तीच्या अगावर चकचकीत व सुरेख चिलखतें होती आणि पाठीवर अबारी व हौदे होते हे हत्ती एका प्रशस्त व भव्य मैदानामध्यें उभे करण्यात आले होते तीन दिवस पर्यंत ते विस्तीर्ण मैदान जणु खवळलेल्या समुद्राप्रमाणें भासत होते !

त्या पटागणामध्ये सुंदर व भव्य असे मडप उभारण्यात आले असून, बाहेरून सुदर सुदर चित्रें लाविलेलीं होती त्यातील नवव्या मडपांत सिंहासन ठेविलेलें असून, माझी बसण्याची व्यवस्था सातव्या मंडपांत कर-ण्यात आली होती माडव व राजवाडाव्यामधील मोकळ्या जागेत नटनर्तक, भांड, कत्थक वगैरे लोकाच्या तमाशाची सोय केली होती राजाच्या समोर अप्रतिम वस्त्रालंकारानी विभूषित अशा रूपवती कलावतिणींचें नृत्यगायन चालले होतें हा बादशाही उत्सव सतत तीन दिवस मोठ्या अपूर्व थाटानें चालला होता रात्री प्रेक्षणीय दारूकाम व नाचरग व करमणूकीचे विविध खेळ चालत असत !

तिसऱ्या दिवशीं माझी व राजाची भेट झाली तेथे राजाचे सिंहासन

होते ते सुवर्णाचे असून रत्नजडित होते ! ते कल्पनेच्या बाहेर मौल्यवान होते त्याच्या पुढच्या बाजूला एक चौकोनी गादी घातली असून, तिच्यावर एका बाजूला मोत्याचे तीन सर गुफलेले होते या उत्सवात तीनहि दिवस राजा गादीवरच बसत असे

उत्सव आटपल्यावर सध्याकाळीं मला एका चौकात बोलवून नेलें त्या चौकाच्या चारी बाजूला चार चागले प्रशस्त मडप असून, तो चौक व ते मंडप यांच्या बाजूवर व छतावर अजमासें तलवारीच्या पात्याइतका जाड सोन्याचा पत्रा सोन्याचे खिळे ठोकून बसविण्यात आला असून, त्याच्यावर जडावाचें सुदर नक्षीकाम केलेलें होते ! त्या चौकातच राजाचे सिंहासन मांडलेले होते

अर्थात् हे विडनगर (विजयनगर) अशा प्रकारचें शहर आहे कीं त्याच्या सारखे शहर डोळ्यातील बाहुलीनें आजपर्यंत कोठेच पाहिलेले नाहीं ! व ज्ञानाच्या कानाने त्याच्या सारखे शहर साऱ्या दुनियेत कोठे असल्याचें कधींच ऐकलेले नाही !!

हें अबदुल रझाकने केलेलें विजयनगरचें वर्णन अतिशयोक्तीचे मुळींच नसून, ते वस्तुस्थितीचे यथार्थ वर्णन आहे, यात अक्षरहि खोटें नाहीं या विजयनगरचा लौकिक ऐकून देशोदेशीचे विदेशी प्रवासी लोक हें शहर प्रत्यक्ष डोळ्याने पाहण्यासाठीं म्हणून मुद्दाम येथ येत असत त्यापैकी हे पुढील लोक उल्लेखनीय असून, त्यानी त्यावेळचे त्या राजधानीचें वर्णन जसें दिसलें व पाहिले तसे लिहून ठेविले आहे, ते प्रवासी पुढीलप्रमाणे असून, त्याची थोडक्यात माहिती अशी आहे

१. इब्न बत्तूता (इ स १३३३) हा मोरोक्को मधील टॉन्जीर्स या गावचा प्रवासी हा आला त्यावेळी विजयनगरला मूर्त स्वरूप आले नव्हतें तथापि त्याच्या वृत्तांतात हरिहराची थोडीशी पूर्वीची माहिती आढळते पण तिला फारसे महत्त्व नसल्यामुळे ती येथे दिली नाहीं

२ निकोलो दि कोंती — (१४२०-२१) हा इटयालियन असून, तो एका चागल्या घरदाज कुळातला होता तो द्वितीय देवराज याच्या

कारकीर्दीत विजयनगर येथे आला होता  तो विजयनगरचा घेर साठ मैल असून, त्याच्या सभोवतालचे तट पर्वताएवढे उच्च बाधलेले आहेत असें तो सागतो  नगररक्षणार्थ ९०००० हजार सशस्त्र सैन्य सज्ज असून, राजाला बारा हजार स्त्रिया आहेत, असे तो लिहितो

३  अब्दुल रझाक (इ स १४४३) हा इराणच्या शहाचा राजशिष्ट असून, तो द्वितीय देवराजाच्या कारकीर्दीतच आला होता तो विजयनगरात येऊन आठ महिने राहिला होता  त्याने विजयनगरची विस्तृत हकीकत लिहून ठेविली असून, आम्ही त्याचाच लिहून ठेविलेला वृत्तात प्रथमारंभी वर सपूर्ण दिला आहे  तो विजयनगरचा उच्चार बिड्जनगर असा करतो

४  अथेनेशिअस निकिटन (इ स १४७३) हा देशजातीने रशियन प्रवासी असून, तो विरुपाक्षराय या राजाच्या कारकीर्दीत विजयनगरास भेट देऊन गेला  त्याच्या वृत्तातात सागण्यासारखें असें विशेष काहीं नाहीं

५  लुडव्हिको डि बर्थेमा (इ स १५०३–१५०७) हा देशजातीने इट्यालियन् होता  त्याच्या वृत्तात्तात पुढील प्रकारचा मजकूर आढळतो — या नरसिंह राजाच्या जवळ ४०००० घोडे स्वार व ४०० हत्ती नेहमी सज्ज असतात. प्रत्येक हत्तीवर सहा माणसें आरूढ झालेलीं असतात या राज्यात कोठेहि हिंडण्याफिरण्यास कसलेंच भय नाहीं  तेथील राजमार्ग रुंद व चौक ऐसपैस आहेत  व्यापार फार मोठा चालतो  या शहरात सर्व राष्ट्राचे व सर्व धर्मांचे अनेक लोक पहावयास सापडतात  न्यायदान पद्धति कडक असून, सत्यान्वेषणाकडे अधिकाऱ्याचा कल व रोख असतो

६  दुआर्ते बार्बोस (इ स १५००–१५१६) हा पोर्तुगीज असून श्री कृष्णदेवराय या राजाच्या आमदानींत विजयनगरास आला होता

७  दोमिंगो पैस (इ स १५२०–२२) हाहि देशजातीने पोर्तुगीजच  विजयनगरातल्या उत्सव प्रसंगाच्या लाव लाव मिरवणुकी, नाचरंग, शोभेचें दारुकाम, नानाविध बळी, सैन्याचे संचलन, मर्दानी खेळ इत्यादिकाचें तो वर्णन करतो  त्यावेळीं विजयनगरचें एकूण सैन्य दहा लाख होतें, असें तो लिहितो

८ मेनांव्ह नूनिझ (इ स १५३०-१५३५) हाहि देशजातीने पोर्तुगीज असून, तो घोड्याचा व्यापारी होता त्या निमित्तानेच तो विजयनगरास आला होता त्यानें विजयनगरचा इतिहास विस्तृत लिहून काढला असून तो विविध माहितीने पूर्ण असा आहे हा अच्युत देवराय या राजाच्या कारकीर्दींत तेथे आला होता त्याच्या वृत्तातात सागण्यासारखी अशी विशेष माहिती नाहीं

येणे प्रमाणें विजयनगरात प्रत्यक्ष येऊन तेथे, त्या त्या काळीं पाहिलेला व ऐकलेला वृत्तात ज्याच्या प्रवासवृत्तातून आढळतो, अशा एकुण आठ परदेशीय प्रवाश्याची वृत्तें ठोकळ मानानें येथे देण्यात आलीं आहेत असे हे परदेशस्थ प्रवासी विजयनगरात अगदी प्रारभापासून वेळोवेळीं येऊन, तेथील तत्कालीन त्या वैभवशाली सुदर राजधानीचें व तेथील राजकीय परिस्थितीचे काळजीपूर्वक निरीक्षण करून, त्याप्रमाणे त्याचें वर्णन आपापल्या प्रवास वृत्तात लिहून ठेविलें आहे ते सर्व वाचून पाहिल्यास विजयनगरचे सौभाग्य व ऐश्वर्य, स्वरूप व रचना, सौंदर्य व सामर्थ्य, भरभराट व चकचकाट याची यथार्थ कल्पना येण्यास बरीच मदत होते या सर्वांचा साद्यत वृत्तात या लहानशा ग्रंथात सविस्तर देऊन ग्रथाची जागा अडविणें हें आम्हास विस्तारभयास्तव अप्रस्तुत वाटल्यामुळें त्या भरीस न पडता फक्त अबदुल रझाक याचाच तेवढा साद्यत वृत्तात देऊन, इतरास छाट मारणें अवश्यच झालें शिवाय त्यांत नवीन अशी महत्वाची माहिती देण्यासारखी विशेष न आढळल्यामुळे त्याला फाटा दिला तथापि जी काय थोडीशी देण्यासारखी आढळली, ती एक दोन वाक्यात तेथे तेथें दिली आहे असो एकदरींत सागावयाचें काय तर विजयनगरचें राजकारण व राजवैभव त्याकाळीं कसें रगलें व बहरलें होतें, याची आधुनिक महाराष्ट्रास कल्पना करण्यास मदत व्हावी, या हेतूनें प्रस्तुत प्रकरण येथें समाविष्ट करण्यात आलें आहे.

---



जैन मंदिर- विजयनगर (हंपी)

## प्रकरण २६ वे

# जिज्ञासु जगाला वेदनारायणाचे मंगल दर्शन घडविणारे विजयनगरचे चंद्रसूर्य

माधवार्यो माधवार्यं सायण सायण. पर. ।
भोगनाथो भोगनाथः प्रथते भुवनत्रये ॥

अलकारसुधानिधि

विजयनगरचा तेजस्वी इतिहास भारताला अनेक दृष्टीने उद्बोधक व मननीय आहे दक्षिणेत सर्वत्र इस्लामी अत्याचाराचा भयकर वणवा भडकला असता, परसत्तेच्या जुलुमाखाली भरडले गेलेले मूठभर हिंदू वीर येथे एकत्र होऊन, एकजूटीन परशत्रूला तोड देऊन, तेथे हिंदुसाम्राज्याची स्थापना केली, हा त्याचा तेजस्वी इतिहास आजच्या उदयोन्मुख नव-भारताला भावी वैभवाचे व सुखाचे दिवस दाखविण्याला खात्रीने मार्गदर्शन करणारा आहे

विजयनगरचे महत्व केवळ स्वतंत्र स्वराज्य स्थापण्यापुरतेच नव्हतें त्याबरोबरच विद्या व कला, धर्म व नीति, उद्योग व व्यापार, कला व कौशल्य, सुरक्षा व सुव्यवस्था, वाङ्मय व काव्य याचा तेथे पुढे कसा व किती विकास झाला होता, हे पाहणेहि तितकेच बोधप्रद आहे इतर गोष्टींचा परामर्श घेण्याचें हें स्थळ नसल्यामुळे, त्याविषयात आम्ही शिरू इच्छित नाहीं फक्त तेथें वाङ्मय-विकास व वाढ किती झाली, याचा थोडक्यात येथें आढावा घेऊ पाहतो

मागे प्रकरण ९ व १८ मध्ये सायणाचार्यांच्या ग्रथसपत्तिबद्दल इतिहास देण्यात आला आहे आता येथें माधवाचार्यांच्या ग्रथाबद्दल धावते वर्णन देऊन, मग एकदर दोघाच्या ग्रथाचा थोडक्यात आढावा घेतो

माधवाचार्यांना आश्रमांतर केल्यावर श्रीशंकरानंदांनी त्यास विद्यारण्य हें नांव चतुर्थाश्रमात धारण करण्यासाठीं दिलें व पुढे ते त्याच नावानें प्रसिद्धीस आले विजयनगरमध्ये पतअमात्यपदावर असताना त्यानी जे ग्रंथ लिहिले, त्याचा उल्लेख मागे ११व्या प्रकरणात करण्यात आलाच आहे आता येथें आश्रमांतर केल्यावर–म्हणजे माधवाचार्य या नावाला फाटा देऊन—विद्यारण्य हें नांव धारण केल्यावर, त्यांनी कोणते ग्रंथ लिहिले, याचें दिग्दर्शन करून, मग पुढे चालूं लागतो

या विद्यारण्यस्वामींचा सर्वांत महत्वाचा ग्रंथ म्हणजे वेदांतावरील अनुपम असा पंचदशी हा होय हा त्याचा तत्त्वज्ञानविषयक प्रमुख ग्रंथ असून तो त्यांच्या अगाध विद्वत्तेने, प्रगाढ प्रतिभा–पांडित्याने व समयोचित युक्तिवादानें परिपूर्ण नटला आहे याचे एकंदर पंधरा अध्याय असून, ते तीन प्रकरणात विभागले गेले आहेत पहिलें म्हणजे सुरवातीस विवेक प्रकरण असून, त्यात तत्त्वविवेक, पंचभूतविवेक, पंचकोशविवेक, व महावाक्य-विवेक असे पाच अध्याय आहेत दुसरें दीपप्रकरण असून, त्यात चित्रदीप, तृप्तिदीप, कूटस्थदीप, ध्यानदीप व नाटकदीप अशा पाच अध्यायाचा समावेश झाला आहे तिसऱ्या म्हणजे आनंद प्रकरणात योगानंद, आत्मानंद, अद्वैतानंद, विद्यानंद व विषयानंद, याप्रमाणे पाच अध्याय मोडतात

हा ग्रंथ विद्यारण्य व त्यांचे गुरुदेव भारतीतीर्थ या दोघांच्या नावावर मोडत असून, तो वेदांत-प्रेमी विद्वज्जनात अत्यंत प्रिय झाला असून, त्याची तत्त्वजिज्ञासु जगात इतकी प्रसिद्धि आहे कीं, त्याचे भारतातील अनेक भाषात अनुवाद करण्यात आले आहेत या पंचदशी ग्रंथावर 'तात्पर्य-दीपिका' नांवाची टीका लिहिणारे रामकृष्ण पंडित यानी 'तृप्तिदीप' या प्रकरणावर व्याख्यान लिहितांना प्रारंभीं म्हटले आहे तें असे –

तृप्तिदीपाख्यं प्रकरणमारभमाणः श्री भारतीतीर्थ-
गुरुस्तस्य श्रुतिव्याख्यानरूपत्वात् तद्व्याख्येयां
श्रुतिमादौ पठति ॥'

या वचनावरून 'तृप्तिदीप'लिहिणारे श्री भारतीतीर्थ हे एकटेच होते, असे ध्वनित होते या ग्रथाचा मराठींत अनुवाद के बापट शास्त्री यानी केला असून, तो वेदातप्रेमी जनाना वाचनीय व मननीय असा आहे या ग्रथातील पहिले सहा अध्याय विद्यारण्यमुनीचे व बाकीचे नऊ अध्याय भारती-तीर्थाचे असे समजण्यात येते

त्याचा तितकाच महत्वाचा दुसरा ग्रथ म्हणजे 'जीवन्मुक्ति विवेक' हा होय. अद्वैतवेदाताच्या दृष्टीने जीवन्मुक्तीचें सागोपाग विवेचन या ग्रंथात करण्यात आले असून, तत्त्वजिज्ञासूंचे त्यापासून पूर्ण समाधान होऊन, ते आनदाने डोलू लागतात या ग्रथाचे एकदर चार अध्याय आहेत पहिल्यात सन्यासाचे विवेचन असून, तेथ जीवन्मुक्तीचे थोडक्यात लक्षण सागण्यात आले आहे, ते असें — 'जीवत. पुरुषस्य कर्तृत्व-भोक्तृत्व-सुखदु खादिलक्षणश्चित्तधर्म क्लेशरूपत्वात् बन्धो भवति। तस्य निवारणं जीवन्मुक्ति' ॥'—जीवंत पुरुषाचे कर्ता, भोक्ता, सुखीदु खी इत्यादि जे चित्तधर्म आहेत, ते क्लेशरूप असून, बन्धनास कारणीभूत होतात त्याचें निवारण म्हणजेच जीवन्मुक्ति होय, असा त्याचा भावार्थ आहे याचे विस्तृत विवेचन पहिल्या अध्यायात करण्यात आले असून, दुसऱ्यात वासनाक्षय, तिसऱ्यात मनोनाश व चौथ्यांत जीवन्मुक्तीचें प्रयोजन, याचा उपन्यास करण्यात आला आहे एकदरीत वेदांत विषयावर हा एक सर्वोत्कृष्ट असा अधिकृत ग्रथ आहे, असें सागितल्यास त्यात काही वावगे होणार नाहीं

विद्यारण्याचा तिसरा ग्रंथ म्हणजे 'विवरणप्रमेय सग्रह' उर्फ 'विवरणोपन्यास' हा होय हा ग्रथ ब्रम्हसूत्र भाष्यावरील विवरणात्मक पद्धतीचा असून, त्यांच्या वेदातविषयवरील गाढ व विशाल पाडित्याचा तो एक उत्तम द्योतक आहे सदर ग्रंथाचे वर्णनात्मक असे नऊ विभाग पाडण्यात आले असून, पहिल्यांत 'श्रोतव्य श्रुतिवाक्येभ्य ' याचा नियमविधि, व तसेंच जीव व ब्रम्ह याच्या ऐक्याचें प्रतिपादन आणि अध्यास याचे विस्तृत विवेचन आहे. दुसऱ्या भागांत वेदातशास्त्राचें प्रयोजन, व तिसऱ्यात 'अथातो ब्रम्हजिज्ञासा' या वाक्याचा विस्तारपूर्वक उहापोह करून, ज्ञान व कर्म समुच्चयाचें

निराकरण करण्यात आले आहे चवथ्यात पहिल्याविभागास अधिकारी व्यक्तीचे विवेचन, तसेच विषय, प्रयोजन व अनुबध चतुष्टय याचे स्पष्टीकरण आहे पाचव्यात ब्रम्हस्वरूप, व त्याचे लक्षण सागण्यात आले असून, सहा व सात या विभागात ब्रम्हसिद्धि आणि आठ व नवव्या विभागात सकल वेदांत वाक्याचा ब्रम्हातच समन्वय सिद्ध करून दाखविण्यात आला आहे याप्रमाणे वेदात-प्रमेयाचा पाडित्यपूर्ण संग्रह व विवेचन या ग्रथात करून दाखविण्यात आले असल्यामुळे, ब्रम्ह विद्येचे रहस्य व महत्व जाणण्यास हा ग्रंथ जिज्ञासु वाचकास व अभ्यासकास अत्यत उपयुक्त झाला आहे, यात तिळप्राय सदेह नाही

या विद्यारण्य स्वामीचा सागण्यासारखा आणखी एक ग्रंथ म्हणजे ‘अनुभूति-प्रकाश’ हा होय यात उपनिषदात प्रतिपादिलेल्या सिद्धाताचे विवरण सुदर व सुबोध रीतीने कारिकाच्या द्वारा करून दाखविण्यात आले आहे यात ऐतरेय, तैत्तिरीय, छादोग्य, मुडक, प्रश्न, श्वेताश्वतर व बृहदारण्यक इत्यादि उपनिषदाचा क्रमाने साराश देण्यात आला असून, श्लोकात ठिकठिकाणी मूळ उपयिषद्वाक्याचाहि निर्देश करण्यात आला असल्यामुळे ज्याना उपनिषदाची माहिती नाही, आशानाहि हा ग्रंथ समजण्यास सुगम व सुबोध झाला आहे या ग्रथावर ‘मितवृत्ति’ नामक टीका लिहून, प्रख्यात वेदाती पडित काशीनाथ शास्त्री यानी सदरहु ग्रथ समजण्यास मोठीच मदत केली आहे

वरील ग्रथाच्याच जोडीला ‘बृहदारण्यक वार्तिक सार’ याचाहि निर्देश करणे औचित्यास धरून होईल बृहदारण्यक उपनिषद् हें स्वरूपत व तत्त्वत सर्व उपनिषदामध्ये अग्रगण्य मानले जात असून, त्यावर सुरेश्वराचार्यांनी वार्तिक लिहिले आहे ते फार मोठे व सारगर्भित असल्यामुळें सामान्य वाचकास समजणे जडच जाते म्हणून विद्यारण्यानी ही अडचण दूर करण्यासाठीं म्हणून त्यावर साराश रूपाने ‘वार्तिकसार’ नावाचा ग्रथ लिहून, वार्तिकाचे रहस्य समजुन घेण्यास सुलभ केले आहे या सर्व गहन पण उपयुक्त वेदातविषयावर स्पष्ट व सुबोध ग्रथ रचना करून अद्वैत

वेदांताच्या इतिहासात त्यांनी आपले नाव अजरामर करून ठेविले आहे, हे सांगण्यास आम्हास मोठा अभिमान वाटतो हे त्यांचे ग्रंथ चंद्रकिरणा-सारखे शांत, सुंदर, व प्रसादपूर्ण असून, ते आल्हादजनक व प्रसन्नकारक आहेत, म्हणून त्यांना चंद्राची उपमा सार्थ शोभते।

याशिवाय आणखी त्यांचे लहान मोठे असे अनेक ग्रंथ असून, त्यांत 'शंकरदिग्विजय', 'सर्वदर्शनसंग्रह', 'संगीतसार' हे ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत स्थलाभावास्तव त्यांच्या अंतरंगसारकथनांत शिरणे आम्हास कठीण झालें आहे याप्रमाणे विद्यारण्यांनी आश्रमांतर केल्यावर शृंगेरी येथे राहून, वरील प्रमाणे अत्यंत महत्वपूर्ण अशी अविस्मरणीय ग्रंथसपंत्ति निर्माण करून, जिज्ञासु जगाला कायमचे ऋणी करून ठेविले आहे, असे म्हटल्यास त्यांत काही अपराध होणार नाहीं

याप्रमाणे श्रीविद्यारण्यस्वामींच्या विविध ग्रंथांचे ओझरते दिग्दर्शन केल्यावर आता शेवटीं त्या पंडितवर्य बंधुद्वयांनी-श्रीसायणाचार्य व श्री-विद्यारण्यमुनी यांनी-जिवापाड श्रम करून व रात्रंदिवस सतत खपून जगत्क-ल्याणार्थ संस्कृत वाङ्मयाची केवढी बहुमोल सेवा केली व ज्ञान भांडारांत केवढी प्रचंड भर घातली, याची वाचकांना एका दृष्टिक्षेपांत कल्पना यावी म्हणून त्यांच्या ग्रंथांचा फक्त येथे नामनिर्देश तेवढा करून याप्रकरणाला रजा देतो

| सायणाचार्यांचे ग्रंथ | माधवाचार्य उर्फ विद्यारण्यांचे ग्रंथ |
|---|---|
| १ सुभाषित सुधानिधि | १. पराशर माधव |
| २ प्रायश्चित्त सुधानिधि | २ काल माधव |
| ३. आयुर्वेद सुधानिधि | ३ जैमिनीय न्यायमालाविस्तर |
| ४ अलंकार सुधानिधि | ४. पंचदशी |
| ५. धातुवृत्ति सुधानिधि | ५ जीवन्मुक्ति विवेक |

| सायणाचार्यांचे ग्रथ | | माधवाचार्य उर्फ विद्यारण्याचे ग्रंथ | |
|---|---|---|---|
| ६ | पुरुषार्थ सुधानिधि | ६ | विवरणप्रमेय-सग्रह |
| ७ | यज्ञतत्र सुधानिधि | ७ | अनुभूति प्रकाश |
| ८ | तैत्तिरीय सहिता-भाष्य | ८ | बृहदारण्यक वार्तिकसार |
| ९ | ऋग्वेद-भाष्य | ९ | उपनिषद्दीपिका |
| १० | सामवेद-भाष्य | १० | शकर दिग्विजय |
| ११ | यजुर्वेद (काण्व) भाष्य | ११ | सर्वदर्शनसग्रह |
| १२. | अथर्ववेद-भाष्य | १२ | सगीत-सार |
| १३ | तैत्तिरीय ब्राम्हण-भाष्य | १३ | गोत्रप्रवर-निर्णय |
| १४ | तैत्तिरीय आरण्यक-भाष्य | १४ | चरणव्यूह-भाष्य |
| १५ | ऐतरेय ब्राम्हण-भाष्य | १५ | पाणिनी शिक्षाभाष्य |
| १६ | ऐतरेय आरण्यक-भाष्य | १६ | गोभिलगृह्यसूत्रभाष्य |
| १७. | ताण्ड्यब्राम्हण-भाष्य | १७ | दर्शपूर्णमासप्रयोग |
| १८ | षड्विश ब्राम्हण-भाष्य | १८ | भगवद्गीताभाष्य |
| १९ | सामविधान ब्राम्हण-भाष्य | १९ | महावाक्यनिर्णय |
| २० | आर्षेय ब्राम्हण-भाष्य | २० | आत्मानात्मविवेक |
| २१ | दैवताध्याय ब्राम्हण-भाष्य | | वगैरे वगैरे |
| २२ | उपनिषद् ब्राम्हण भाष्य | | |
| ३३ | वश ब्राम्हण-भाष्य | | |
| २४ | शतपथब्राम्हण भाष्य | | |
| | वगैरे वगैरे | | |

---

वाचकहो ! केवढा त्या बधुद्वयांचा हा प्रचड ग्रथ-सभार ! आम्ही तुम्हांस येथे फक्त ग्रथाची नावानिशी नुसती यादी दिली आहे यासर्व ग्रथाचें प्रत्यक्ष दर्शन म्हणजे वाङ्मय क्षेत्रातील सरस्वतीचें ते एक प्रचड व

प्रदर्शनच म्हटले तरी अधिक शोभेल ! सकल विद्याचा येथे मेळावा आहे येथें चारहि वेद आहेत सगळे ब्राम्हण-ग्रथ आहेत स्मृति आहे मीमासा आहे वेदात आहे व्याकरण आहे ज्योतिष आहे यज्ञतत्र आहे सुभाषित आहे विश्वज्ञान आहे संगीतज्ञान आहे सर्व काही आहे !! थोडक्यात म्हणजे सकलविद्या, व सर्वशास्त्रे या बधुद्वयाच्या विशाल वाङ्मय-क्षेत्रात एकवटलेली पाहून आश्चर्याने थक्क होऊन, आनंदाने डोलणार नाहीं असा दुर्दैवी प्राणी कोण आहे ?

धन्य आहे कर्नाटकाबा ! धन्य धन्य तिची दिव्य व पवित्र कूस !! की ज्या पवित्र कुशींत जन्म घेऊन विजयनगरच्या या सूर्य-चद्रानी आपल्या अलौकिक प्रज्ञाप्रभावानें, व अलौकिक कर्तव्य-जागृतीने आणि तसेच लोकोत्तर राजकारणपटुत्वानें, व लोककल्याण निदिध्यासानें उदड परिश्रम करून, स्वधर्म व स्वराज्य याचें पुनर्जीवन करून, भारत इतिहासात महा-भाग्यवती कर्नाटक-मातेला अविस्मरणीय असें अमरपद प्राप्त करून दिलें ! तशात माधवाचार्यांची थोरवी काय वर्णन करावी ! 'कर्नाटक-सिंहासन-स्थापनाचार्य', 'मूर्तिमंत दिव्यतेजोनिधि' 'विद्यारत्नमहोदधि' 'तत्त्वार्थ-कोविद' वेदमार्गप्रतिष्ठाचार्य' 'राजगुरु व राजमंत्री' या बिरुदावलीनें ते विभूषित झाले, तें यथायोग्यच आहे !

खरें सागावयाचें म्हणजे माधवाचार्य व सायणाचार्य हे विजयनगरचे चद्र-सूर्यच होत, याविषयीं विचारी जगात दुमत होईल असें आम्हास वाटत नाहीं या गुरुदेवाविषयी किती सागितलें तरी तें थोडेंच आहे. लोकोत्तर पुरुषांचें सर्व काही लोकोत्तर व अद्भुत असते ! आणि तें किती सागितलें तरी सपत नाहीं !! लोकमान्य टिळक व महात्मा गाधी याचेंहि असेंच नाहीं काय ? असो

आतां सरतें शेवटीं एका विवाद्य गोष्टीचा थोडासा परामर्श घेऊन, याप्रकरणाला पूर्णविराम देतो वेदमहाभाष्यकार कोण, सायणाचार्य का माधवाचार्य, का दोघेहि, या विषयी काही विद्वानात बराच गैर समज पसरलेला दिसून येतो काहीचें म्हणणे असें आहे की वेदभाष्य लिहिणारे

हे खरोखर माधवाचार्यच होत काहीचे असे आहे की सायण-माधव हे दोघेहि भाष्यकर्ते आहेत आणि काहीचे म्हणणे असे की वेदभाष्यकाराचा मान हा फक्त सायणाचार्यांचाच आहे

अस्या घोटाळा होण्याचे कारण काही ग्रथात 'सायणमाधवीये, काही ग्रथात 'माधव अमात्यविरचिते', काही ग्रथात 'सायणाचार्य विरचिते माधवीये' व काही काही ग्रंथात 'विद्यारण्य विरचिते असा शेवटी शेरा असून, त्यामुळे गैरसमज उत्पन्न होण्याला जागा झाली आहे. वेदभाष्यकाराचा बहुमान माधवाचार्यांना देणाऱ्या ग्रथकारात श्री वामन शास्त्री गोडबोले (रुद्रभाष्य, प्रस्तावना पृ ५), कै विष्णुशास्त्री बापट, (सार्थ पचदशी') विद्यारण्य स्वामीगळु' चे कन्नड चरित्र लेखक श्री भीमाजी जीवाजी हुलकवि, श्री वेकटराव आलूर, काशीनाथ कृष्ण लेले, (विविधज्ञान विस्तार) आणि बरेच कन्नड ग्रंथकार यांचा समावेश होतो

काहीचे म्हणणे असे की वेदभाष्यकार हे सायणाचार्यच होत तो मान माधवाचार्यांना मिळणें व देणे हे सत्यास व न्यायास धरून नाहीं आणि हें म्हणणे आम्हास सयुक्तिक दिसते. हा जो कित्येकाच्या मतात घोटाळा झाला आहे, त्याला कारण सायणाचार्यांनी आपल्या वेदावरील भाष्यग्रथाला 'वेदार्थ प्रकाश' हें नाव देऊन त्याच्या मागे 'माधवीय' हा शब्द जोडला आहे, हे आहे या शब्दामुळे कित्येकाचा गैरसमज त्या शब्दावरच सगळी भिस्त ठेऊन दिल्यामुळे झाला आहे, हें उघड आहे शब्दाकडे लक्ष दिले पण अर्थाकडे कानाडोळा केला, असा हा प्रकार आहे पण जरा सूक्ष्म व खोल विचार केला तर तो टिकून रहात नाहीं हें कसें, तें आता पाहू

हा प्रश्न धसास लावावयाचा तर ते मूळ वचनच प्रथम लक्षात घेतले पाहिजे उदाहरणार्थ म्हणून एकच वचन उद्धृत करून, त्याचा विचार करतो म्हणजे खरा प्रकार आपोआप उघडकीस येईल ऋग्वेदातील पहिल्या अष्टकाच्या आठव्या अध्यायाच्या शेवटी म्हणजे पहिल्या अष्टकाच्या शेवटीं समाप्तीचा शेरा आहे तो असा.— श्रीमद्राजाधिराज परमेश्वर वैदिक मार्ग-

प्रवर्तक-श्रीवीरबुक्कभूपालसाम्राज्य-धुरंधरेण सायणाचार्येण विरचिते माधवीये वेदार्थप्रकाशे ऋक्संहिताभाष्ये प्रथमाष्टकेऽष्टमोऽध्याय समाप्त' हा शेरा ऋग्वेदभाष्यकर्ता कोण, हे ठरविण्यास अत्यंत महत्वाचा आहे.

तेथे 'सायणाचार्येण विरचिते' या शब्दांना अत्यंत महत्त्व असून, त्यावरून भाष्यकर्ता कोण हे निराळे सांगण्याची अवश्यकता रहात नाही. सूर्यप्रकाशाइतका तो बोध अगदी स्पष्ट आहे. माधवाचार्य जर खरोखर भाष्यकर्ते असते, तर तेथे 'सायणाचार्य विरचिते' या शब्दा ऐवजी 'माधवाचार्य विरचिते' असा शब्दप्रयोग करावयास पाहिजे होता. पण तसा प्रकार दिसून येत नाहीं. व माधवाचार्यांनी तसे कोठेच नमूद केलेले नाहीं. चारहि वेदाच्या प्रत्येक अष्टकाच्या अगर अध्यायाचा शेवटी 'सायणाचार्य विरचिते' हे शब्दच आढळून येतात. तेथे माधवाचार्यांच्या नावाचा कोठेच चुकून सुद्धा एकदाहि निर्देश आढळून येत नाही.

त्याच प्रमाणे दोघाकडेहि भाष्य-कर्तृत्व जाते म्हणावे तर त्यालाहि कोठे पुष्टि मिळत नाही. तसे जर असते तर 'सायणमाधवाचार्याभ्यां विरचिते' असा शब्द प्रयोग हवा होता. पण तसा प्रकार आढळून येत नाहीं. यावरून माधवाचार्य हे सहभाष्यकारहि नव्हेत, हे अगदी उघड होते. सर्व वेदभाष्यग्रंथात व प्रत्येक अध्यायाच्या शेवटी ज्या अर्थी— 'सायणाचार्य विरचिते' असा स्पष्ट व स्वच्छ शेरा आढळतो, त्या अर्थी भाष्यकाराचा मान सायणाचार्यांकडेच जातो, तो त्यांचाच आहे आणि तो त्यांसच दिला पाहिजे, असे म्हटल्याशिवाय गत्यन्तरच नाहीं.

आता त्या भाष्यनिर्मितीत माधवाचार्यांचा हात मुळीच नव्हता अगर त्यांची त्या कार्यांत सायणांना मुळींच मदत अगर मार्गदर्शन झाले नसावे, असे मात्र म्हणवत नाहीं, किंवा म्हणता येणार नाहीं. माधवाचार्यांची त्यांना पदोपदीं मदत झाली असेल. झाली असली पाहिजे नाहीं असे नाहीं. पण तेवढ्यावरून त्यांना सायणाचार्यांना वगळून भाष्यकर्त्यांचा मान देणे हे इष्ट, युक्त व न्याय्य होणार नाहीं.

ही गोष्ट प्रसिद्धच आहे कीं जसे सायणाचार्य ग्रंथकर्ते होते, तद्वत्

माधवाचार्यहि ग्रंथलेखक होते आता त्यानी लिहिलेले ग्रथ म्हणून जे ग्रथ प्रसिद्ध आहेत, त्या ग्रंथाकडे जरासें वळून पाहू त्याच्या नावावर मोडणाऱ्या ग्रथात काय प्रकार आढळतो, हे पाहिले म्हणजे या प्रश्नाची निगरगाठ ही मग आपोआपच सुटेल

'पराशर–माधव' हा त्याचा ग्रथ प्रसिद्धच असून, त्या ग्रथाच्या प्रारभी नवव्या श्लोकात पुढील प्रमाणें म्हटलें आहे — 'पराशरस्मृति पूर्वैर्न व्याख्याता निबन्धृभि । मयाऽतो माधवार्येण तद्व्याख्याया प्रयत्यते' ॥ ९ ॥ या वचनावरून 'पराशर' स्मृतीचे व्याख्यानकार माधवार्य म्हणजे माधवाचार्य हे होत, ही गोष्ट स्पष्ट झाली आणि त्याला आधार म्हणून पहिल्या अध्यायाच्या शेवटीं मारलेला शेरा पाहिला म्हणजे सशयाला जागाच रहात नाहीं तो शेरा असा आहे – 'इति श्रीमहाराधिराज परमेश्वर–वैदिकमार्गप्रवर्तक श्रीवीरबुक्कभूपाल साम्राज्य धुरन्धुरस्य माधवा-मात्यस्य कृतौ पराशर स्मृति व्याख्याया माधवीयाया प्रथमोऽध्याय ॥' येथे सुद्धा पराशरस्मृतिव्याख्यानकर्ता म्हणून माधव – अमात्य म्हणजे माधवाचार्यच होत, हाच अर्थ निष्पन्न होतो अर्थात् प्रारभी व शेवटीं दोन्ही ठिकाणी ग्रंथकर्ता म्हणून माधवाचार्यांचे नावच नमूद करण्यात आलें आहे

त्याचप्रमाणें जैमिनीय 'न्यायमाला विस्तर' मध्येहि असाच मजकूर दृष्टोत्पत्तीस येतो तेथे श्लोक आहे तो असा — 'निर्माय माधवाचार्यो विद्वदानन्ददायिनीम् । जैमिनीय–न्यायमाला व्याचष्टे बालबुद्धये' । ॥ ७ ॥ (जैमिनीय–न्यायमालाविस्तर) या ग्रथावरहि माधवाचार्यांचा ग्रंथकर्तृत्वाचा शिक्का आहे आणि तो ग्रथ आजपर्यंत त्याच्या नावावरच मोडतो. त्या बरोबरच हें पुढील वचनहि मननीय आहे 'व्याख्याय माधवाचार्यो धर्मान् पराशरनथ तदनुष्ठानकालस्य निर्णयं वक्तुमुद्यत ॥ ४ ॥ (कालमाधव)

आतां असें स्पष्ट म्हणण्यास स्वच्छ जागा झाली की खुद्द सायणा-चार्यांनी केलेल्या सर्व भाष्य ग्रथावर एक जात 'सायणाचार्येण विरचिते' असा छाप व माधवाचार्यांनी केलेल्या सर्व ग्रथावर 'माधवामात्यस्य कृतौ'

'माधवाचार्यो व्याचष्टे' 'माधवाचार्यो वक्तुमुद्यत' अशा प्रकारचे ठसे उमटलेले निःसंदिग्ध दिसून येतात तेव्हा 'सायणाचार्येण विरचिते' या छापाच्या ग्रंथात माधवाचार्यांचा शिरकाव करणे हे वस्तुस्थितीस धरून होणार नाही, असे आता ओघानेच म्हणणे प्राप्त होते असो

मग आता असा प्रश्न उपस्थित होतो कीं सायणाचार्यांनी अध्यायाच्या शेवटीं मारलेल्या शेऱ्यात 'माधवीये' हा शब्द 'वेदार्थ प्रकाशे' याच्या मागे का घातला? त्यात त्याचा हेतु काय होता अगर असावा याचें समाधानपूर्वक स्पष्टीकरण केल्याशिवाय मनात संशय घुटमळतच राहणार त्याला इलाज नाहीं प्रश्न म्हणा अगर शंका म्हणा ती काही अनाठायी नाहीं याचे समाधान करावयाच्या पूर्वी आणखी एक गोष्ट वाचकांच्या नजरे समोर आणू इच्छितो ती म्हणजे सायणाचार्य जसे भाष्यात 'माधवीये'हा शब्द वापरतात, तद्वत माधवाचार्यांनी देखील पराशरस्मृतीच्या टीकेत अध्यायाच्या शेवटी 'पराशर स्मृति व्याख्याया माधवीयाया' असा शेरा मारला आहे तेव्हा 'माधवीया' शब्दाला काहीतरी निराळाच अर्थ असला पाहिजे आणि तो तसा आहे तो शब्द टीकेचे अगर भाष्याचे नांव दाखवितो जसे 'माधवीय वेदार्थ प्रकाश' व 'माधवीया पराशरस्मृतिव्याख्या' येथे माधवीय हा शब्द वेदार्थप्रकाश याचे विशेषण स्थानीं आहे इतकाच त्याचा अर्थ तो तेथे कर्तृत्व दर्शवीत नसून, लक्षणार्थी उपयोगण्यात आला आहे

आता सायणाचार्यांनी 'माधवीय' हा शब्द 'वेदार्थप्रकाश' यास व आपल्या इतर ग्रंथास का लावला, याचा थोडासा खुलासा करणें हें क्रम-प्राप्तच आहे तो खुलासा असा — माधवाचार्य हे सायणाचार्यांचे वडील बंधू असून, त्याना आपल्या वडील भावाविषयीं अत्यंत आदर व प्रेमबुद्धि असणें हे स्वाभाविकच आहे शिवाय सायणाचार्यांना जो मान, हुद्दा, अधिकार व अनुकूल संधि प्राप्त झाली, ती या माधवाचार्यांच्या शिफारशी-मुळेंच प्राप्त झाली, हें अगदी उघडच आहे आणि तो मजकूर प्रत्येक ग्रंथाच्या प्रारंभीच्या श्लोकांत स्पष्टच दाखल करण्यात आला आहे या

आपल्या वडील भावावरील पूज्य व प्रेमबुद्धीमुळे म्हणा अगर त्यानी दाखविलेल्या बंधुप्रेमामुळे म्हणा सायणाचार्यांनी कर्तव्य बुद्धीने व कृतज्ञ-बुद्धीने आपल्या ग्रथाला वडील भावाचे नाव आदरार्थ व सस्मरणार्थ म्हणून चिकटविले असल तर त्यात नवल ते काय ? त्यात त्याचा मोठेपणा, प्रेमभाव, आदरबुद्धि, कर्तव्यनिष्ठा व कृतज्ञता दिसून येते इतकेच काय त ,यात ग्रथकर्तृत्वाचा मुळीच संबध येत नाही

आता स्पष्टच सागावयाचे म्हणजे खुद्द माधवाचार्यांनीच आपण ग्रथकार नसल्याची अप्रत्यक्ष ग्वाही दिली आहे तो प्रसंग असा — बुक्कभूपालानी वेदभाष्य लिहिण्यास प्रथम माधवाचार्यांसच सागितले पण माधवाचार्यांनी ती जबाबदारी स्वत वर न घेता ती आपल्या भावावर सोपविण्यात यावी म्हणजे भूपालाची इच्छा सिद्धीस जाईल, असे चक्क व स्पष्ट कळविले आहे ! मग आता आणखी काय पाहिजे ? हा त्याचा कबूली जबाब महत्वाचा नाही काय ? त्याचे प्रत्यक्ष वचनच हे असे आहे —

तत्कटाक्षेण तद्रूपं दधद्बुक्कमहीपति. ।
आदिशन्माधवाचार्यं वेदार्थस्य प्रकाशने ॥ ३ ॥

स प्राह नृपति राजन् सायणाचार्यो ममानुजः ।
सर्वं वेत्त्येष वेदानां व्याख्यातृत्वेन युज्यताम् ॥ ४ ॥

इत्युक्तो माधवाचार्येण वीरबुक्कमहीपति. ।
अन्वशात्सायणाचार्यं वेदार्थस्य प्रकाशते ॥ ५ ॥

ये पूर्वोत्तरमीमासे ते व्याख्यायति सग्रहात् ।
कृपालु सायणाचार्यो वेदार्थं वक्तुमुद्यतः ॥ ६ ॥

(ऋग्वेद–वेदार्थप्रकाश)

हे वचन सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट असल्यावर त्यापेक्षा निराळा पुरावा तो आणखी काय असणार व आम्ही देणार ?

शिवाय आणखी, उदाहरणार्थ धातुवृत्ति ग्रंथाकडे पहा  हा ग्रंथ सायणाचार्यांनी संगमनरेशाच्या राजवटींत उदयगिरीच्या मंत्रीपदावर असताना लिहिला आहे  त्यांत माधवाचार्यांचा संबंध नसूनहि, त्याला त्यांनी 'माधवीया धातुवृत्ति' असे नांव वेदभाष्य रचण्यापूर्वींच दिले आहे. तेथें प्रस्तावनेतील शेवटचा श्लोक आहे तो असा —

'तेन मायणपुत्रेण सायणेन मनीषिणा ।
आख्याया माधवीयेयं धातुवृत्तिर्विरच्यते ॥

— धातुवृत्ति

हा प्रारंभीचा प्रस्तावनेतील श्लोक असून, नंतर समाप्तीच्या वेळी हें पुढील वचन आढळतें

'इति श्रीपूर्वदक्षिणपश्चिमसमुद्राधीश्वर श्री कम्पराजसुतसंगम महाराज महामंत्रि मायणसुतेन माधवसहोदरेण सायणाचार्येण विरचितायां माधवीया धातुवृत्तौ'

यावरून वेदभाष्य लिहावयाच्या पूर्वींच संगमभूपालाच्या कारकीर्दींत लिहिलेल्या 'धातुवृत्ति' ग्रंथास सायणांनी 'माधवीया' हें नांव आदरार्थी लावलेले आहे, हे स्पष्ट दिसून येतें

आतां स्पष्टच पुरावा पाहिजे असल्यास राजा हरिहर (द्वितीय) यानाच पुढे उभे करतो म्हणजे झालें  मग वादाला जागाच रहात नाही  शतपथ-ब्राम्हणावर व्याख्यान लिहावयास सांगतांना त्यांनी सायणाचार्यांस उद्देशून स्पष्ट म्हटले आहे ते असें —

'विजिता रातिव्रातो वीर. श्री हरिहरः क्ष्माधीश ।
धर्मब्रम्हाध्वन्य. समादिशत् सायणाचार्यम्  ॥ ४ ॥
ऋग्यजु सामशाखनामेकैको व्याकृता त्वया ।
तावता तत्समानार्थां ज्ञातु शक्यास्तत परा  ॥ ५ ॥

शतपथब्राम्हण भाष्य-प्रस्तावना

यावरील वचनात हरिहरराजानी सायणाना उद्देशून काढलेले हे पुढील उद्गार– 'ऋग्यजु सामशाखानामेकैको व्याकृतो त्वया'—त्यावरून ऋग्वेदादि वेदाचे भाष्यकार सायणाचार्यच होत, हे नि संधिग्ध व निर्विवाद सिद्ध होत नाही काय ?

प्रत्यक्ष हरिहरराजाची ती स्पष्ट साक्ष असून, ती अन्यथा ठरविणेची आता कोणाची छाति आहे ? असे असूनहि शतपथभाष्याच्या शेवटी नेहमीच्या रिवाजाप्रमाणे सायणानी त्या आपल्या भाष्यास 'माधवीये वेदार्थप्रकाशे माध्यदिनीय शतपथ ब्राम्हणभाष्ये' असा शेरा मारला आहे तथापि हरिहर राजाची वरील सारखी स्पष्ट व नि सदिग्ध साक्ष ठणठणीत सागते की ऋग्यजु सामवेदांची भाष्ये सायणाचार्यांचीच कृति होत ! आणि ती साक्ष खोटी ठरविण्याची कोणाची छाति आहे ? तथापि खेदाची गोष्ट ही कीं कित्येक मराठी व कन्नड ग्रथकार सूक्ष्म व खोल विचार न करता वर वर काही ग्रंथ चाळून सायणाचार्यांचा तो मान हिसकावून घेऊन माधवाचार्य उर्फ विद्यारण्य याच्या पदरांत टाकण्यास मुळीच कचरत नाहीत, हें किती अनुचित व न्यायदुष्ट आहे ?

सायणानी लिहिलेल्या ग्रथात 'माधवीय' हा शब्द का घालण्यांत आला, याचा खुलासा आता केला पाहिजे आणि सुदैवाची गोष्ट ही कीं तो तसा शतपथ ब्राम्हणाच्या उपोद्धातात पुढील प्रमाण करण्यात आला आहे

'अनेन च स्वज्येष्ठभ्रात्रा माधवाचार्येण प्रेरितस्य श्रीपरमेश्वरवैदिकमार्ग-प्रवर्तकस्य सम्राज श्रीबुक्कमहाराजस्याज्ञया चतुर्ष्वपि वेदेषु भाष्याणि विलिख्य तानि ज्येष्ठभ्रातुरादरार्थं 'माधवीयानि' इति विशेषणेन भूषयित्वा प्रसिद्धिं नीतानि' (शतपथब्राम्हण-उपोद्धात)

या वरून वेदार्थ प्रकाशाला माधवीय हें विशेषण का जोडण्यात आलें, याचा आता आणखी निराळा पुरावा देण्याचे आमच्या मते काहीच प्रयोजन दिसत नाही आदरार्थी तो शब्द भाष्याला जोडण्यात आला आहे, हे स्पष्ट आहे एवढ्या विवेचनावर आमच्या सूज्ञ वाचकाचें समाधान होईल असे धरून हा विषय पुरा करतो आणि ज्याचें तसे होणार नाहीं, त्याचें समाधान मग प्रत्यक्ष ब्रम्हदेवहि करूं शकणार नाही !!

---

## प्रकरण २७ वें

# सायण–माधव कालीन सारस्वत प्रपंच

पुण्यश्लोक हरिहर व बुक्क यानी अविश्रांत श्रम करून ज्याप्रमाणे विजयनगर साम्राज्याची वाढ व तसाच विस्तार केला, तद्वतच त्याचे प्रधान माधवाचार्य व सायणाचार्य यानी रात्रंदिवस खपून वाङ्मय क्षेत्रात आश्चर्य कारक अशी प्रचंड ग्रंथनिर्मिति केली इतकेच नव्हे, तर त्याकाळीं कर्नाटकाल विद्याभ्यासगाला व ग्रंथनिर्मितीला फार मोठा बहर आला होता त्यावेळीं आणखी उल्लेखनीय असे प्रथितयश ग्रंथकार कोणकोण उदयास आले व त्यानी कोणकोणते ग्रंथ लिहून जगाला ऋणी करून ठेविलें, याचे या प्रकरणांत वाचकास थावतें दर्शन करविणेचा विचार आहे येथे फक्त ग्रंथकार व त्याचे ग्रंथ याच्या नामनिर्देशापलीकडे जाणे हे इष्ट असलें तरी स्थलाभावामुळें युक्त होणार नाही तेवढ्यावरून वाचकास वाङ्मय क्षेत्रातील विविध ग्रंथसंपत्तीची कल्पना करता येईल

## नामवंत ग्रंथकार व त्यांचे प्रसिद्ध ग्रंथ

### संस्कृत ग्रंथ

### अद्वैत ग्रंथ

(१) भारतीतीर्थ — (१) वाक्यसुधा व (२) वैयासिक न्यायमाला

(२) शंकरानंद यतिः-- (१) ईशावास्य–दीपिका (२) केनोपनिषद्दीपिका (३) मुण्डकोपनिषद्दीपिका (४) तैत्तिरीयोपनिषद्दीपिका (५) श्वेताश्वतरोपनिषद्दीपिका (६) बृहदारण्योपनिषद्दीपिका इत्यादि टीकात्मक

ग्रंथ असून, या शिवाय तत्त्वज्ञान दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे असें त्यांचें (७) आत्मपुराण हें सर्वश्रेष्ठ आहे व ते सर्वोपनिषत्सार म्हटलें तरी चालेल

(३) माधवाचार्य उर्फ विद्यारण्यः— (१) पराशर-माधव (२) काल-माधव (३) जैमिनीय न्यायमाला विस्तर (४) पंचदशी (५) जीवन्मुक्ति-विवेक (६) विवरण प्रमेय सग्रह (७) अनुभूति-प्रकाश (८) बृहदारण्यक वार्तिक सार (९) उपनिषद्दीपिका (१०) शंकरदिग्विजय (११) सर्व दर्शन सग्रह (१२) सगीतसार (१३) गोत्रप्रवर निर्णय (१४) चरणव्यूह भाष्य व (१५) पाणिनी शिक्षा-भाष्य वगैरे, वगैरे

(४) सायणाचार्य —(१) सुभाषित-सुधानिधि(२) प्रायश्चित्त-सुधानिधि (३) आयुर्वेद-सुधानिधि (४) अलकार-सुधानिधि (५) धातुवृत्ति-सुधानिधि (६) पुरुषार्थ-सुधानिधि (७) यज्ञतंत्र-सुधानिधि (८) तैत्तिरीय संहिताभाष्य (९) ऋग्वेद-भाष्य (१०) समावेद-भाष्य (११) शुक्लयजुर्वेद (काण्व) भाष्य (१२) अथर्ववेद-भाष्य (१३) तैत्तिरीय ब्राम्हण-भाष्य (१४) तैत्तिरीय आरण्यक-भाष्य (१५) ऐतरेय ब्राम्हण-भाष्य (१६) ऐतरेय आरण्यक-भाष्य (१७) वंश ब्राम्हण-भाष्य (१८) शतपथ ब्राम्हण-भाष्य इत्यादि इत्यादि

## द्वैत ग्रंथ (माध्वपंथ)

(५) अक्षोभ्यतीर्थ — माधव-तत्त्वसार-संग्रह

(६) जयतीर्थः— (१) तत्त्वप्रकाशिका-सुधा (२) न्यायविवरण (३) प्रमेय-दीपिका (४) न्याय-दीपिका (५) प्रमाण-पद्धति (६)

वादावलि (७) अध्यात्मामृततरंगिणी (८) शतापराधस्तोत्र (९) पद्यमाला व (१०) टिप्पणी, इत्यादि

विशिष्टाद्वैत ग्रंथ (श्री-वैष्णवपंथ)

(७) वेदांत-देशिक — (१) यादवाभ्युदय (२) हंस-संदेश (३) संकल्प-सूर्योदय (४) तत्त्वटीका (५) तात्पर्य-चंद्रिका (६) न्यायसिद्धांतांजन (७) अधिकरण-सारावलि व (८) रहस्यत्रयसार (तामिळ-ग्रंथ) इत्यादि

*(Administration & Social life under Vijayanagar P 356)*

शुद्ध-शैवागम

(८) माधव-मंत्री —(१) शैवाम्नायसार व (२) सूतसंहिताव्याख्या

(९) नरहरि — निषध-दीपिका

काव्य-ग्रंथ

१ वामनभट्ट बाण-नलाभ्युदय, रघुनाथचरित, बृहत्कथामंजिरी; विरुपाक्ष-वसंतोत्सव चंपु
२ गंगादेवि-मदुरा-विजयम्
३. अगस्त्य उर्फ विद्यानाथ-बालभारत
४ विद्यारण्य-शंकरविजय
५ कोलवराज-हरिविलास, सुंदरदामोदर
६ वेदांतदेशिक-यादवाभ्युदय; हंससंदेश, मारसंभव

नाटक

१ वामनभट्ट बाण-श्रृंगारभूषण भाण, पार्वतीपरिणय, कनकलेखा.

२ विरूपाक्ष – नारायण-विलास, उन्मत्तराघव
३ वेदांतदेशिक – संकल्पसूर्योदय

## इतर ग्रंथ

१ भोगनाथ – रामोल्लास, त्रिपुर विजय; उदाहरणमाला, महागण-पतिस्तव, शृंगारमंजिरी, गौरीनाथाष्टक, दृग्दृश्यविवेक
२. चेन्नुभट्ट – केशवमिश्राच्या ग्रंथावर टीका
३ नरहरि – निशध-दीपिका

## कन्नड-ग्रंथ

### जैन-वाङ्मय

१ बाहुबलि – धर्मनाथ
२ मधुर – गुम्मत
३ चंद्रकीर्ति – परमागमसार

## वीरशैव ग्रंथ

१ मंगरस – खगेंद्रमणि दर्पण
२. भीमकवि – बसवपुराण

या प्रमाणे सायण-माधव (कर्नाटक कविचरिते भाग २) कालीन, सारस्वत-प्रपंच असून, तो सर्वदृष्टीने, ज्ञानविज्ञानाने व प्रतिभा-पांडित्यानें रसरसलेला असून, विद्वज्जनांस अत्यंत उद्बोधक व प्रासादिक झाला आहे

आतां याच हातानें पुढें विजयनगर साम्राज्यात वाङ्मयविकास कसा व किती झाला, हें पाहणेंहि जिज्ञासु वाचकास तितकेंच बोधप्रद असल्यामुळें त्याचेंहि थोडक्यात दिग्दर्शन करतो

## संस्कृत ग्रंथ

### काव्य ग्रंथ

१ माधव — नरकासुरविजय
२ दिवाकर — भारतामृत
३ श्रीनिवास दीक्षित — शितिकंठविजय
४ नीलकंठ — शिवलीला वर्णन
५ सालुव नरसिंह — रामाभ्युदय
६ राजनाथ डिंडिम — सालुवाभ्युदय
७ कुमार धूर्जटि — कृष्णदेव विजयम्

### नाटक ग्रंथ

१ कुमार डिंडिम — वीरभद्र विजय
२. यज्ञनारायण — रगुनाथ विलास
३ श्रीनिवास दीक्षित — भामिनिपरिणय

### इतर ग्रंथ

१ अप्पय्यदीक्षित — चित्र मीमांसा
२ श्रीनिवासदीक्षित — अलकार कौस्तुभ

कर्नाटक दर्शन, पृष्ट २२२–२३१

## कन्नड-ग्रंथ

### ब्राम्हण – कवि

१ कुमार व्यास (१४३०) भारत
२ नारायण कवि (१४५०) भागवत सहितार्थ

३ श्रीपाद राय (१४८७) कीर्तन कथा
४ ईश्वर कवि (१५००) कविजिव्हाबंधन
५. माधव (१५००) माधवालंकार
६. लक्ष्मणांक (१५००) शकुन-सार
७ तिम्मण्ण (१५१०) भारताचा उत्तर भाग
८. पुरदास (१५४०) भक्ति-पद-संग्रह
९ व्यासराय (१५४०) कीर्तन-कथा
१० रंगाचार्य (१५७०) श्रीरंग-महात्म्य
११ वादिराज (१५७०) वैकुंठ-वर्णन
१२ तिरुमलभट्ट (१६००) शिवगीता
१४ तिम्मरस (१६५०) मार्कंडेयरामायण
१५ नरहरि (१६५०) प्रल्हादचरित्र

## जैन कवि

१ कल्याणकीर्ति (१४३९) जिनस्तुति; कामनकथे
२ जिन देवण्ण (१४४४) श्रेणिक चरित्रे
३ कोटेश्वर (१५००) जीवधर षट्पदि
४. मंगरस (१५०८) नेमिजिनेशसंगति
५ नेमण्ण (१५५९) ज्ञानभास्करचरिते
६. बाहुबलि (१५६०) नागकुमार
७. पद्मरस (१५९९) शृंगार कथे
८ शांतरस (१६००) योगरत्नाकर
९ गुणचंद्र (१६५०) छंदस्सार

## वीरशैव कवि

१ लक्कण्ण दंडेश (१४२८) शिवतत्त्व चिंतामणि
२ चामरस (१४३०) प्रभुलिंगलीले

३ बत्तलेश्वर (१४३०) रामायण
४. नीलकंठ शिवाचार (१४३०) ब्राम्हसूत्र भाष्य व्याख्यान (क्रियासार)
५ महालिंगदेव (१४३०) एकोत्तरशतस्थल
६ मल्लणार्य (१४३०) वीरशैवामृत
७ गुरु बसव (१४३०) शिवयोगागभूपण, वृषभगीते
८. चन्द्रशेखर (१४३०) विरुपाक्षस्थान
९. बोम्मरस (१४५०) सौंदर पुराण
१०. तोंटद सिद्धेश्वर (१४७०) षट्स्थल ज्ञानसारामृत
११ चतुर्मुख बम्मरस (१५००) रेवणसिद्धेश्वर पुराण
१२. निजगुण शिवयोगी (१५००) अनुभवसार, परमार्थ गीते
१३ सुरंग (१५००) त्रिषाष्टि पुरातनचरिते
१४ नंजुड (१५२५) कुमाररामन कथे
१५ चन्नबसवाक (१५५०) महादेवीयक्कन कथे
१६ विरक्त तोंटदार्य (१५६०) सिद्धेश्वर पुराण
१७ विरुपाक्ष पंडित (१५८४) चन्नबसवपुराण

## दास वाङ्मय

१. श्रीपाद राय (१५००) कीर्तन–पदें
२. पुरंदास (१५४०) भक्तिपदगळु
३. कनकदास (१५५०) मोहनतरंगिणि, नळचरित्र, राघव ध्यानचरितं हरिभक्तिसार

(आर नरसिंहाचार्य कृत कर्नाटक कविचरिते भाग २ रा)

## तेलगु वाङ्मय

१. नाचण्ण सोम — उत्तर हरिवंश
२. अनकण्ण — विक्रमार्क चरित्र

ವಿನೋದದಿಂ ರಾಜ್ಯಂಗೆವುತಿರ್ದ ಶಕ ವರುಷ ೧೩೦೮ [ ಇ ಸ ೧೩೮೬ ]
ಕ್ಷಯ ಸಂವತ್ಸರದ ಅಶ್ವಿನ ಶುದ್ಧ ೧೦ '

(एपि कर्नाटिका, खंड ६ कोप्प ३४, पृ १७७

असा हा विजयनगर साम्राज्य-कालीन कर्नाटकाचा संस्कृत, कन्नड तेलगू वाङ्मयाचा सारस्वत इतिहास आहे विजयनगरच्या अभ्युदया-बरोबरच वाङ्मय वाटिकेलाहि सुंदर व सर्वोत्कृष्ट बहर आला होता, य विषयी आता निराळा पुरावा नको हा काळ कर्नाटकाच्या वैभवाचा उत्कर्षाचा व अभिमानाचा मोठा संस्मरणीय काळ होय, असें सांगितल्यास यांत काही वावगे अगर अतिशयोक्ति नाहीं



## प्रकरण २८ वें

# सायणाचार्यांचे गृहचित्र

सानन्दं सदनं सुताश्च सुधियः कान्ता न दुर्भाषिणी।
सन्मित्र सुधन स्वयोषिति रतिश्चाज्ञापरा सेवकाः॥
आतिथ्य शिवपूजन प्रतिदिन मिष्टान्नपान गृहे।
साधो. संगममुपासते हि सतत धन्यो गृहस्थाश्रमः॥

—सुभाषित-रत्नभांडार

सर्व आश्रमात गृहस्थाश्रम हाच सर्व श्रेष्ठ व धन्य मानला गेला असून, पूर्ण विचाराती व अनुभवावरून तो सत्य व सार्थ आहे, याला नाव ठेवण्यास विचारी मनुष्य धजणार नाहीं, असे आम्हास वाटते वस्तुस्थितीला धरून खरे सांगावयाचे म्हणजे स्त्रीपुरुषाची दुक्कल हीच मानवजन्माचें सार्थक व साफल्य करण्यास पूर्ण समर्थ आहे हें त्यांचे परस्पर सहकार्य व सहजीवन नसेल तर संसाराचा गाडा-म्हणजे हें त्यांचें दाम्पत्य जीवन-सुरळीत व सुसूत्र चालून मानवजन्म सफल व कृतकृत्य होईल, ही अशा अगदी फोल आहे, असे म्हटल्यास त्याला असत्याचा कलंक लागेल, असें आम्हास वाटत नाहीं. हें लक्षात घेऊनच वैदिक धर्म बोलला कीं ‘ वीर्यं वै द्वन्द्व ’ स्त्रीपुरुषाची दुक्कल-अर्थात् दाम्पत्यजीवन-हेंच प्रभावशाली आहे हे याज्ञवल्क्य प्रभूचें अर्थपूर्ण मार्मिक वचन सिद्ध करण्यास निराळा पुरावा देण्याचे कारण नाहीं ज्याला त्याला या प्रापञ्चिक जीवनात त्याची थोडी बहुत तरी प्रचीति आलेली असतेच असते नाहीं असा पुरुष विरळा

मनुष्याचे जे धर्म-अर्थ-काम व मोक्ष असे चार मुख्य पुरुषार्थ आहेत, ते सरळ व सुलभ रीतीनें प्राप्त करून घेण्याची-फलद्रूप होण्याची-

मुख्य भूमिका म्हणजे हा गृहस्थाश्रम । या गृहस्थाश्रमाशिवाय ही गोष्ट सिद्ध होण्याची, सफल होण्याची, आशा मुळीच नाही चारहि पुरुषार्थ मनुष्याला प्राप्त करून देण्याची गृहस्थाश्रम ही मायकूस आहे म्हणून वैदिक ऋषींनी, त्याचा आश्रय करून, आपल्या इहपर-जन्माचे साफल्य व सार्थक करून घेतले, हे आता नव्याने सांगितले पाहिजे, अशातला काही भाग राहिला नाहीं या गृहस्थाश्रमाचें मर्म व महत्व ओळखूनच याज्ञ-वाक्यानी स्पष्ट म्हटले आहे कीं 'ब्रम्हचर्य समाप्य गृही भवेत्'-ब्रम्हचर्य सपल्यावर मनुष्याने गृहस्थाश्रमी म्हणजे सपत्नीक व्हावें

गृहस्थाश्रम या शब्दातील 'गृहस्थ' या शब्दाला एक विशिष्ट अर्थ आहे तेथील गृह शब्द हा दगडाविटानी बाधून काढलेल्या अडोशाच्या व निवऱ्याच्या जागेला उद्देशून उपयोगण्यात आला नसून, तेथे सदैव जागृत राहणाऱ्या गृहिणीला उद्देशून तो योजण्यात आला आहे ऋग्वेदात 'जायेदस्तम्' (जाया इत् अस्तम्) – जाया म्हणजेच घर-असें स्पष्ट म्हटलें असून, त्याचाच पुनरुच्चार 'न गृह गृहमित्याहु गृहिणी गृहमुच्यते' असें मानवस्मृतींत मनुजिनी केला आहे 'गृही भवेत्' या वचनातहि गृह या शब्दाचा हाच अर्थ अभिप्रेत आहे गृहकृत्यात सदैव जागृत राहणारी अशी जी ससारदक्ष स्त्री ती गृहिणी होय कारण 'अस्मिन् गृहे गार्ह-पत्याय जागृहि' या घरांत सदैव गृहकृत्यात जागृत रहा'असा विवाहसमयीं वधूला उपदेश देण्यात आला असून, गृहकार्यात दक्ष असणाऱ्या गृहिणीला म्हणजे पत्नीला वैदिकधर्मांत 'घर' अशा लाक्षणिक अर्थानें संबोधिलें आहे. तात्पर्य हें कीं पुरुषाची आजन्म सहचारिणी होऊन त्याच्याजवळ पत्नीधर्मानें राहणाऱ्या विवाहबद्ध स्त्रीला गृह हें नाव असून, अशा स्त्रीच्या सहवासात राहून आयुष्य कंठणारा जो पुरुष तो गृहस्थ होय आणि या गृहस्थजीवनालाच गृहस्थाश्रम हें नाव आहे गृहस्थ, या शब्दाचा एवढा प्रपंच केला, याचें कारण हें की आमचे चरित्र नायक हे गृहस्थाश्रमी होते व शेवटपर्यंत ते त्याच आश्रमात राहिले

त्याची पत्नी-सहधर्मचारिणी-जी सती हेमावती, ती स्वभावानें,

गुणाने व रूपाने त्याना साजेल अशीच होती फार काय, ती आदर्श आर्यगृहिणी होती, इतके सागितले म्हणजे तिच्या विषयीं आणखी अधिक सागण्याची गरज नाही थोडक्यात म्हणजे ती अभिजात, कुलीन व ससारदक्ष आर्य महिला होती, इतके सागितले म्हणजे त्यात सर्व काही आले या बाबतींत सायणाचार्य मोठे नशीबवान व भाग्यशाली पुरुष होते, थात सशय नाही त्या सुखी दापत्याचा-प्रेमळ पतिपत्नीचा-आत्मा समरस होऊन एकजीव झाला असल्यामुळें तेथे द्वैताचीभाषा व मी तूपणाची ताठर अहवृत्ति सपशेल विरून गेली होती याचे कारणहि तितकेंच सबळ होतें त्यानी विवाह कालीन हा पुढील मत्र अहर्निश आपल्या डोळ्यापुढें ठेविला होता तो मंत्र हा-'ॐ यदेतद् हृदय तव तदस्तु हृदय मम । यदेतद् हृदय मम तदस्तु हृदय तव' - तुझे जसे मन आहे, तसेच माझेहि पण राहील व माझे जसे आहे, तसेंच तुझेहि पण असो ! किती सुदर, किती गोड, किती तेजस्वी व किती अर्थपूर्ण आहे मंत्र हा ! सुखी दाम्पत्यजीवनाचा अस्सल गाभाचा का म्हणाना ! या अर्थपूर्ण गोड मत्राच्या अखंड स्मृतीमुळें सायणाचार्यांचें गृहजीवन अत्यंत सुखाचे व समाधानाचें झालें, हें काय आता उघड सागावयास पाहिजे ? असो

अशा प्रेमळ, सुरूप व सुशील हेमावतीशी एक निष्ठपणे संसार करीत असता, त्याना तिच्यापासून तीन पुत्ररत्नाचा लाभ झाला सायणाचार्य अनृणी झाले व त्याचा वशवृक्ष वाढीस लागला त्याचा पहिला जो मुलगा, त्याचें नाव कम्पण असें असून, तो संगीत शास्त्रात मोठा कलाविद् व लौकिकवान झाला या आपल्या कलानैपुण्याबद्दल त्याने पुढे 'सगीतकलाविशारद' ही बहुमानाची पदवी मिळविली त्याचा दुसरा मुलगा जो मायण तोहि तितकाच योग्यतावान निघाला तो मोठा कवि होता गद्य व पद्यरचनेंतील त्याचें काव्यकौशल्य व योजनाचातुर्य मोठें वाखाणण्यासारखें असून, या त्याच्या लोकोत्तर काव्य नैपुण्याबद्दल त्याला 'कविकुलशेखर' हा किताब मिळाला होता तिसरा मुलगा जो सिंगण तो वेदविद्येंत चागला तरबेज होऊन पट्टीच्या पंडितामध्यें त्याची प्रामुख्यानें

गणना करण्यात आली होती त्याचे वेदाध्ययन क्रम जटापर्यंत झाले असून, त्याला 'वेदविद्यासागर ही पदवी बहाल करण्यात आली होती याप्रमाणे सायणाचे तीनहि मुलगे आपापल्या विद्येत मोठे नामांकित पंडित निघाले सायणाचे हे भाग्य काही लहान सहान नव्हे 'पुत्र असावा ऐसा गोंडा, ज्याचा तीन्ही लोकीं झेंडा' या संतवचनाची प्रचीति तेथे प्रत्यक्ष दिसत होती

याचे कारण असे की सायणानी आपल्या मुलाच्या शिक्षणाकडे प्रथम पासून प्रत्यक्ष जातिनिशी दक्षतापूर्वक उदंड काळजी घेतली होती बाहेरून घरी आले म्हणजे प्रथम ते तडक मुलाकडे जाऊन त्याच्या अभ्यासाची चौकशी करून नंतर मग दुसरीकडे जात याविषयी अलंकार सुधानिधी-मध्ये एक सूचक श्लोक आढळतो तो असा —

'वत्स व्यंजय कम्पण व्यसनिनं संगीतशास्त्रे तव ।
प्रौढिं मायण गद्यपद्यरचनापाण्डित्यमुन्मुद्रय ॥
शिक्षां दर्शय शिंगण क्रमजटाचर्चासु वेदेष्विति ।
स्वान् पुत्रान् लालयन् गृहगतस्सम्मोदते सायण. ॥

—अलंकार-सुधानिधि

(डॉ डी, व्ही गुंडप्पा कृत कानडी सायणचरित्र)

या श्लोकावरून हे उघड होते कीं ते घरीं आल्यावर आपल्या मुलास भेटून, 'कम्पणा! तूं संगीतशास्त्रात मन घालून आपले गानकौशल्य प्रकट कर! मायणा! तू गद्यपद्यरचना करून आपले काव्यकौशल्य लोकनिदर्शनास आण! शिंगणा! वेदाचे क्रम-घन-जटापर्यंत अध्ययन करून व शास्त्र चर्चा करून त्यात तुझे प्राविण्य दाखीव!' याप्रमाणें घरीं आल्यावर दररोज मुलाच्या शिक्षणाची चौकशी करून, त्याच्या विद्याभ्यासाला प्रोत्साहन व मार्गदर्शन करून, त्याची दैनंदिन होणारी प्रगति पाहून ते आनंदित होत असत पित्याने मुलाची लहानपणापासून शिक्षणाची काळजी कशी घ्यावी, याचे सायणाचार्य हे आदर्श उदाहरण नाहीं असे कोण

म्हणेल ? पण आजच्या बाप म्हणविणाऱ्या लोकाचे तिकडे कितीसे लक्ष आहे ! असो

सायणाचार्य हे विद्याप्रेमी व तत्त्वजिज्ञासु शारदोपासक असल्यामुळें त्याच्या खासगीजीवनात विद्याव्यासंगाचा भाग बराच मोठा होता आणि यामुळें त्याच्या घरी विद्वानाचा मेळा सदैव गजबजलेला असे बाहेर देशचे जे जे मोठमोठे नामाकित पडित विजयनगरास येत असत, ते सायणाचा लौकिक ऐकून त्यास भेटल्याशिवाय जात नसत अशा लोकाचे आदरातिथ्य व सत्कार-सभावना तेथे नेहमीच चालू असे विविध शास्त्रीय चर्चा व तत्त्वज्ञानसवाद याचा तेथे कसून खल होई शिवाय 'वेदार्थप्रकाश' भाष्य लिहिण्यास मदत करणारे व त्याच्या बरोबर चर्चा करणारे जे शास्त्री पडित असत, त्याच्या खास बैठकीसाठी स्वतत्र असे एक मोठे दालनच राखून ठेवण्यात आलें असून, तेथे सर्व सुखसोई व ग्रंथभाडार याची चोख व्यवस्था करून ठेवण्यात आली होती घरीं आल्यावर अगर सधि मिळेल तेव्हा स्वत भाष्यलेखन करून ते पंडिताजवळ येऊन त्यास दाखवून त्यावर चर्चा करीत व त्यात काही कमीजास्त करण्यासारखे असल्यास तें तसें करण्यास सागून व कांही सूचना देऊन, त्याना योग्य मार्गदर्शन करीत या दृष्टीनें त्याचें घर म्हणजे सरस्वतीचे एक विलासोद्यानच झाले होते शास्त्रीय चर्चा, वेदाध्ययन, विविध ग्रंथावलोकन व ग्रंथलेखन इत्यादि व्यवसाय तेथे रात्रदिवस चालू असत अर्थात् त्याचे घर कसें दिसत होतें, याचें वर्णन या पुढील वचनावरून पाहण्या सारखें आहे तें वर्णन असें —

'क्वचिद्व्याख्यातॄणां विविधपदवाक्यादिपदवी ।
विमर्शः काव्यानां क्वचन सरसाना विरचितम् ॥
क्वचिद्वीणावादव्यसनि शिक्षाविलसितम् ॥
कथं वाचां भूमिर्भवति भवन सायणविभो ॥

—अलंकार सुधानिधि

(डॉ. डी व्ही गुंडप्पा कृत कन्नड सायण चरित्र)

भावार्थ — एकीकडे शास्त्रार्थांचे संभाषण, एकीकडे सुरसकाव्य-रचनेचा विमर्श, एकीकडे वीणेवर गायन शिकणाऱ्या मुलाचा मधुर ध्वनि व एकीकडे मंजुळ वेदघोष अशा प्रकारच्या सायणाच्या घराचे वर्णन शब्दानें काय व किती करावें !

हे त्याच्या घराचे वर्णन झालें आता ते स्वत गुणरूपानें कसे होतें, याचें थोडे दिग्दर्शन करणे जरूर आहे म्हणून त्याचेंहि थोडक्यात चित्र रेखाटतो त्याच्या विषयीं पदरचें काही न सागता अलंकार-सुधानिधीमध्ये जे त्याचें वर्णन करण्यात आलें आहे, तेच येथे देतो म्हणजे निराळें सांगण्याची आवश्यकता रहात नाहीं त्यांचे वर्णन तेथे असें आहे —

मेरूणां सदृश रूप सत्य सायणमन्त्रिण. ।
तव रूपमिवाचार आचार इव ते यश. ॥
पावकस्य यथा तेज. प्रसादः शशिनो यथा ।
तथा तवापि मन्यन्ते सायणार्य मनीषिण. ॥
त्यागे भोगे तथाचारेष्वाहवेषु हवेषुच ।
सायणार्यसमो लोके सायणार्यो न सशय ॥

भावार्थ — सायणाचार्यांचे रूप म्हणजे मेरूसारखे असून त्या रूपाला साजेसें त्याचा आचार आहे आणि त्या आचाराला शोभेल असा त्याचा लौकिक आहे अग्नीचें जसें तेज व चंद्राची जशी प्रसन्नता तशीच सायणांची सुद्धा आहे असे तज्ज्ञलोक मानतात त्यागांत, भोगांत, त्याच प्रमाणे आचारांत, लढाईत व देवकार्यांत या सायणाची बरोबरी करणारा म्हणजें या लोकीं फक्त तेवढे सायणाचार्यच होत, यात मुळींच संशय नाहीं

या वर्णनावरून सायणाचार्यांचें रूप, स्वभाव, वर्तन, विचार इत्यादि कसे होते, याची कल्पना करण्यास कठीण जात नाहीं, इतकें सागितलें म्हणजे पुरें

आता शेवटी सायणाचार्यांच्या जीवितकालावधीचा थोडासा विचार कर्तव्य आहे त्याशिवाय प्रस्तुत प्रकरणाला पूर्णत्व येत नाहीं पण खेदाची गोष्ट ही की त्यांच्या जन्ममरणाचा विश्वसनीय असा निश्चित

पुरावा आता पर्यंत कोठेच उपलब्ध झालेला नाही पण अनुमानावरून व इतर काही ढोबळ आधारावरून त्याच्या आयुर्मर्यादेची काय कल्पना करता येईल, तेवढीच आणि तेच आम्ही येथे करणार आहो

सायणाचार्य हे कधीं व केव्हा जन्मले व कधी व केव्हां स्वर्गस्थ झाले, याविषयी तत्कालीन वाङ्मयांत अगर शिलालेखात किंवा इतरत्र तसा स्पष्ट आधार कोठेंहि सापडत नाहीं अतएव त्याच्या वयाचें मान त्याचे वडील बंधु माधवाचार्य याच्या वयावरून अनुमानाने ठरविले पाहिजे, याशिवाय दुसरा मार्ग नाहीं पण माधवाचार्यांच्या जननमरणकालाचीहि वरील सायणाचार्यांसारखीच अनिश्चित कथा आहे तथापि माधवाचार्यांच्या आयुष्याविषयी काही धागेदोरे सापडतात, त्यावरून त्याच्या वयाचें अनुमान अजमासानें काढता येते त्याचा आधार घेऊन आम्ही प्रस्तुत प्रश्नावर प्रकाश पाडण्याचा यथामति प्रयत्न करतो

'आचार्यसूक्तिमुक्तावली' वरून विद्यारण्य हे १२९ वर्षें जगले, असे काहींचें म्हणणे आहे त्या ग्रंथात श्रीवैष्णपंथाचे प्रमुख व प्रसिद्ध आचार्य वेदांतदेशिक हे माधवाचार्य उर्फ विद्यारण्य याचे समकालीन असून, ते अंतकाळी ११२ वर्षांचे वयोवृद्ध होते त्याच्या मृत्यूनंतर श्री विद्यारण्य हे पुढे सतरा वर्षें जीवंत राहिले असें सांगण्यात येतें त्यावरून विद्यारण्य हे मरणकाली एकशे एकूणतीस वर्षांचे होते, हें अनुमान स्पष्ट होतें (सी. वेंकटसीतारामय्या कृत विद्यारण्य चरित्र संग्रह, कानडी ग्रंथ) पण हें अनुमान काहीं विद्वानांस मान्य नाहीं त्याचें म्हणणे असे कीं मनुष्य इतके दिवस जगणें असंभवनीय आहे. शिवाय दोघाचा जन्म एकाच दिवशी अगर वर्षी झाला हें सिद्ध झाल्यास वरील अनुमानाला कांही किंमत आहे पण तसें कोठें सांगण्यात आलेलें नाहीं

दुसरी विचारसरणी आहे, ती पुढीलप्रमाणें आहे 'देव्यपराधक्षमास्तोत्र' हें जें प्रसिद्ध स्तोत्र आहे, तें शंकराचार्यांच्या नांवावर प्रसिद्ध असलें तरी तें विद्यारण्य सरस्वतीकृत मानलें जात असून, त्या स्तोत्रातील हा पुढील श्लोक त्याच्या वयाचा सूचक आहे. तो श्लोक हा असा — परित्यक्ता

देवान्विविधविधिसेवा कुलतया । मया पञ्चाशीतेरधिकमुपनीते तु वयसि । इदानीं चेन्मातस्तव यदि कृपा नापि भविता । निरालम्बो लम्बोदर-जननि ! कं यामि शरणम् ॥ ५ ॥ (बृहत्स्तोत्ररत्नाकर, पृ १६७) हे स्तोत्र म्हटले गेलें, तेव्हा विद्यारण्य हे शंकराचार्यांच्या श्रीगेरीपीठावर अधिष्ठित झाले होते हें निर्विवाद आहे आणि ते त्या पीठावर इ स १३८० सालीं म्हणजे श्री भारतीतीर्थ ब्रम्हीभूत झाल्यावर अधिष्ठित झाले, हेंहि इतिहास-मान्य आहे यावेळीं त्याचे वय पच्याएंशीपेक्षा जास्त होते, हें त्या श्लोकांतूनच निष्पन्न होते त्यावरून त्याचे वय कमीत कमी ८६ वर्षांचें होतें असे धरून चालले तर त्याचा जन्म जवळ जवळ इ स १२९५ सालीं झाला असावा हें अनुमान अगदीच चुकीचें आहे, असे म्हणता येणार नाहीं पुढें ते इ स १३८६ साली ब्रम्हीभूत झाले असें हरिहर (दुसरा) नृपाच्या एका शिलालेखावरून सूचित होते तेव्हा माधवाचार्य उर्फ विद्यारण्य हे मरणसमयीं ९२ वर्षांचे होते, असें मानणें रास्त ठरते

विद्यारण्याच्या वयाविषयीं इतकें सांगितल्यावर आता सायणाचार्यांच्या जीवमानाकडे वळणें हें ओघानेच प्राप्त होते पण तत्पूर्वी हें सांगितलें पाहिजे कीं त्यांच्या जीवितकालावधीविषयी अद्यापपर्यंत कोठेंहि व कसलाहि विश्वसनीय असा लेख अगर पुरावा सांपडत नाहीं तेव्हा त्याचे वयोमानहि अनुमानानेंच ठरविणें, या शिवाय गत्यंतर नाहीं कांही तरी आधार घ्यावयाचा म्हणून डॉ औफ्रेक्ट साहेब यानी त्यांना सांपडलेल्या माहिती-वरून सायणाचार्य हे इ स १३८७ सालीं कालाधीन झाले असें ठरविलें आहे व त्यावेळीं सायणाचे वय ७२ वर्षांचें होतें, असा अंदाज बांधण्यांत आला आहे यावरून सायणाचा जन्म इ स १३१५ सालीं झाला, असें मानणें ओघानेंच प्राप्त होतें पण हा अदाज आम्हास योग्य पुराव्याच्या अभावीं जरा चमत्कारिकच दिसतो कारण माधवाचार्य व सायणाचार्य या दोघांच्या जन्मामधले अंतर वीस वर्षांचें पडतें हें जरा चमत्कारिक वाटतें सामान्य नियमाप्रमाणें या दोघा भावामध्यें अधिकांत अधिक पांच-सहा वर्षांचें अंतर पडावें वीस वर्षांचें अतर योग्य पुराव्याच्या अभावीं

हे फार झाले त्या नतर मायणाच्या पाठीवर एक भाऊ व एक बहीण जन्मली हे लक्ष्यात घेतले तर साधारण नियमाप्रमाणे त्याचा जन्म इ स १३००-१३०१ साली झाला असावा आणि हे प्रमाण मान्य केले तर सायणाचार्यांचे वय मरण समयी ८५-८६ वर्षांचे असावे, हे अनुमान अधिक सयुक्तिक ठरते काही झाले तरी हा सगळा तर्काचा खेळ आहे, हे विसरू नये शेवटी सागावयाचे तात्पर्य काय तर विद्यारण्य व सायण याच्य वयोमानाविषयी तसा अधिकृत व विश्वसनीय पुरावा अद्यापपर्यंत उपलब्ध झालेला नाही, व तो होईतोपर्यंत नुसत्या तर्कांवरच तहान भागविणे, याशिवाय दुसरा मार्ग नाही

इतके सागून प्रस्तुत प्रकरणाला रजा देतो



## प्रकरण २९ वें

# चरित्र-बोध

तनू त्यागितां कीर्ति मागे उरावी।
मना सज्जना हेचि क्रीया घडावी॥
मना चंदनाचे परी त्वां झिजावे।
परी अंतरी सज्जना नीववावे ॥ ८ ॥

मनाचे श्लोक, रामदास

हे सायणाचार्यांचे चरित्र आम्हा भारतीयाना अनेक दृष्टीने अत्यंत बोधप्रद, मोठे मननीय व तसेच अनुकरणीय असे झाले आहे त्यांच्या अचाट विद्वत्तेला व अलौकिक कर्तृत्वाला जगात क्वचितच तोड असू शकेल! असें म्हटल्यास त्यात अतिशयोक्तीचा दोष येईल असें आम्हास वाटत नाहीं आज तुम्ही जगातील कोणत्याहि भूत व वर्तमानकालीन सुप्रसिद्ध विद्वान पंडिताकडे व नामवंत ग्रंथकाराकडे पहा, सायणाचार्यांच्या जोडीला त्याचा पाट मांडता येण्यासारखा आहे की काय, याबद्दल मनांत शंका उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं

खरोखर सायणाचार्य म्हणजे सायणाचार्यच! त्यांची सर इतराना येणें नाहीं! त्यांची प्रगाढ विद्वत्ता, सखोल शास्त्राध्ययन, प्रचंड उद्योग, विशाल कार्यक्षेत्र, विविध विषय-परिचय, उदंड अभ्यास, अगाध रचना-कौशल्य, अविरत वाङ्मयसेवा इत्यादि सर्व गोष्टींवर बारकाईनें नजर फिरविली व एकदर कार्यकलापाचा आढावा घेतला म्हणजे विचारी मनुष्याची बुद्धि क्षणभर दिङ्मूढ झाल्याशिवाय रहात नाहीं केवढी त्यांची विद्वत्ता! केवढा त्यांचा शास्त्राभ्यास! काय त्यांचा दीर्घोद्योग व केवढी त्यांची वाङ्मयसेवा!!

हे सायणाचार्य केवळ वेदविद्येतच व विविध शास्त्रांतच कसलेले पट्टीचे पंडित होते असे नसून, इतर क्षेत्रातहि त्यांचे तितकेच नैपुण्य व कौशल्य प्रत्ययास येते त्यांचे एकंदर कार्यक्षेत्र विशाल व बहुरूपी असून, विविध शास्त्रात त्यांची गति अमोघ व अप्रतिहत होती. मीमांसा-शास्त्रावरील त्यांचा प्रदीर्घ अभ्यास, व्याकरणशास्त्रावरील सखोल व्यासंग, आयुर्वेदावरील चौफेर दृष्टि, इतिहास पुराणाचा सुदीर्घ परिचय, यज्ञतंत्राचे सूक्ष्मज्ञान, अलंकार शास्त्रावरील व्यापक पांडित्य, राजकारणातील अष्टा-वधानी मुत्सद्दीगिरी, रणांगणातील प्रखर समशेरबहाद्दरी इत्यादि त्यांच्या अष्टपैलू व अष्टावधानी बुद्धिमत्तेकडे व कार्यकलापाकडे सूक्ष्म व चौकस दृष्टीनें पाहिलें म्हणजे सुज्ञ मनुष्याची विचारदृष्टि क्षणभर गुंग होऊन गेल्याशिवाय राहत नाहीं, यात तिळप्राय संदेह नाहीं

चंद्रगुप्ताला राज्यपदावर चढविणारे सुप्रसिद्ध चाणक्याचार्य हे फक्त राजकारणातच कसलेले मोठे चाणाक्ष मुत्सद्दी होते पण त्यांची गति वेद-विद्येंत व धनुर्विद्येत नाव घेण्यासारखी नव्हती महाभारतातील द्रोणाचार्य हे फार तर वेदविद्येत व धनुर्विद्येत निष्णात आचार्य होते पण राजकारणात त्यांचे नाव गुलदस्तातच राहिले पण या सायणाचार्यांची गोष्ट वरील दोघापेक्षा काही अपूर्वच आहे ! ते जितके वेदविद्येत अष्टपैलू पंडित होते, तितकेच राजकारणातहि विशाल व सूक्ष्म-दृष्टीचे अष्टावधानी राजमुत्सद्दी असून, शिवाय आणखी रणांगणात प्रसंग आला असता वाघाच्या छातीनें लढणारे तलवार-बहाद्दर रणवीरहि होते !! वेदविद्या, राजकारण व युद्धनीति या तीनहि क्षेत्रात त्यांचा हातखंडा होता या सर्व गोष्टी आतापर्यंतच्या त्यांच्या चरित्रावरून वाचकास स्पष्ट कळून चुकल्याच असतील

आणि ही अशी अद्वितीय महाविभूति कशी तयार झाली नि कोठें तयार झाली याची कल्पना आज भारतास येणे कठिणच आहे जेव्हा शाळा-कालेजें नव्हती, मास्तर-प्रोफेसर नव्हते, पुस्तकें पाठांतरें नव्हतीं, परीक्षापद्धत्या नव्हत्या, शिष्यवृत्या-पारितोषिकें नव्हतीं, अशा कालांत

शंकराचार्य, माधवाचार्य, सायणाचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य इत्यादि श्रेष्ठ व उच्च साहित्य क्षेत्रातील अमर कीर्तीची तेजस्वी नररत्ने निर्माण झाली, ती कोणी केली व कशी झाली? हीं तेजस्वी विद्वद्रत्ने तयार करण्याची किमया–मायकूस–याची आज भारताला पूर्ण विस्मृति झाली आहे! त्याची आज कल्पना येणे हें शक्य नाही!! ही पवित्र विद्यादानाची प्रभावी घटना प्राचीन वैदिक ऋषीनी आखलेली असून, भारताची ती एकमेव अभिमानाची दिव्य मिरासदारी आहे!!!

आज सुधारणेच्या शिखरावर मिरविणारें जग जेव्हा अज्ञानांधकारात चाचपडत होते, तेव्हा याज्ञवाल्क्य–वसिष्ठ, व्यास–विश्वामित्र, जनक–अश्वपति सारख्या दिव्य विभूति व शंकराचार्य, माधवाचार्य, सायणाचार्य, रामानुजाचार्य हे व यासारखे श्रेष्ठ आचार्यदेव या भारतमातेच्या पवित्र भूमींत जन्म घेऊन ज्ञानतेजाने तळपत होते! आणि त्याना त्या ज्ञानगिरीवर चढवून नेणारा सरस व सोपा मार्ग म्हणजे वैदिकांचा तो दिव्य ब्रम्हचर्याश्रम! या वैदिकाच्या विद्यापीठात ना गुरूना वेतन ना विद्यार्थ्याला द्रव्यदंड! विनामूल्य विद्यादान व विनामूल्य विद्याध्ययन!! गुरूच्या आश्रमात राहून व दीर्घ तपश्चर्या करून सरस्वतीची कडकडीत एकनिष्ठ उपासना करून, तत्कालीन सरस्वती उपासक तो दिव्य ज्ञान–परीस हस्तगत करून घेऊन, उत्तर वयात जगाचे उदंड ज्ञानदीप होऊन राहिले आहेत! मानव संस्कृतीचें उच्चतम ध्येय व विश्वमंगल स्वरूप ठसठशीत चित्रण करून ठेवणारे ते हेच ज्ञानदेव होत!!

त्यावेळचे विद्यार्थी ब्रम्हचर्याश्रम आटपल्यावर पुढे गुरुकुलातून बाहेर पडताना कसे चमकदार दिसत, याची आधुनिक उदयोन्मुख विद्यार्थी–जगाला थोडक्यात कल्पना देऊन, हें बोधपर विवेचन पूर्ण करून, पुढील विषयाकडे वळतो याविषयीं विद्यातपाने पुनीत झालेले व ज्ञानतेजाने तळपणारे योगीश्वर याज्ञवल्क्य आपल्या शतपथ ग्रंथराजांत उल्लेख करतात, तो असा — 'यथा ह वा अग्नि समिद्धो रोचते, एवं ह वै स स्नात्वा रोचते य एवं विद्वान् ब्रम्हचर्यं चरति! (११—३—३—७) भावार्थ,

याप्रमाणे म्हणजे ब्रम्हचर्यातील नियमाप्रमाणे जो विद्यार्थी ब्रम्हचर्य व्रता-अनुष्ठान करतो, तो पूर्णविद्य होऊन प्रत्स्नात झाला म्हणजे प्रज्वलित झालेल्या धगधगीत अग्नीप्रमाणे ब्रम्हवर्चसाने — ज्ञानबलयोग्यतेजाने — चमकूं लागतो ! केवढा हा प्राचीन वैदिक विद्यापीठातील शिक्षणाचा तेजस्वी प्रभाव ! इकडे आधुनिक भारतीय विद्यापीठे डोळे उघडून पाहतील तर केवढा चमत्कार घडेल !!

याचे मूर्तिमंत प्रात्यक्षिक वाचकाच्या डोळ्यासमोर आज उभे करावयाचे झाल्यास आमचे चरित्रनायक श्री सायणाचार्य याना पुढें केलें तर तें अस्थानी होणार नाही, असा आमचा समज आहे या पंडितकुल-शेखराची विद्वत्ता, व्यासंग व परिश्रम यांची यथार्थ कल्पना त्याचे ग्रंथ प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय मनात बिंबणें हें जवळ जवळ अशक्यच आहे उदाहरणार्थ एकच ग्रंथ घेतो त्यावरून वाचकाना या आचार्यदेवाच्या अचाट व अफाट वाङ्मय कलाकृतीची अंधुकशी कल्पना आली तर येईल त्याचे सुप्रसिद्ध ऋग्वेद भाष्यच घेऊं हें भाष्य पुण्यातील वैदिक संशोधन मंडळानें लाखो रुपये खर्चून चार भागात प्रसिद्ध केलें असून, त्याची सुपररायल पृष्ठें जवळ जवळ चार हजार आहेत ! नक्की आकडाच हवा असला तर ३९३७ पृष्ठाचा तो महाग्रंथ आहे ! असे लहान मोठे त्याचे अनेक ग्रंथ आहेत !! यावरून त्याच्या विशाल व अगाध वाङ्मयोदधीची कल्पना कोणास करता आली तर ती त्यानें अवश्य अजमावून पहावी

अर्थात् आता त्याबरोबरच हेंहि सांगितलें पाहिजे की, या अशा विशाल ग्रंथ रचनेत इतर विद्वानाचें त्याना सहाय झाले नसेल अगर नसावें, असें म्हणता येणार नाहीं त्याना इतराची मदत झाली असली पाहिजे व ती त्यानी तशी घेतली असावी वेद-महाभाष्यासारख्या प्रचंड ग्रंथरचनेत इतराची मदत घेणें हे अपरिहार्यच होते तसें करणें त्याच्या इतर विविध कार्यकलापामुळें त्यांना भागच होतें ते नुसते ग्रंथकारच नव्हते, तर त्याच्या मागें तशा महत्वाच्या अनेक उपाधि होत्या राजकारणांत तर त्याची महत्वाची भूमिका होती संगम भूपाळाच्या

राजवटींत ते उदयगिरीचे महामंत्री व राज्यपाल असून, ते राज्य संभाळ-ण्याची फार मोठी जबाबदारी त्यांनी शिरावर घेतली होती तशातच लढाईचा प्रसंग गुदरला असतां शस्त्रधारण करून रणभूमीवर हजर राहणे, हेंहि त्यांना जातीनिशी करावे लागे त्यानंतर विजयनगर साम्राज्याचे मंत्रीपदहि त्यांनी भूषविले असून, ती कामगिरिहि चोख बजावण्यात त्यांचा बराचसा काळ खर्ची पडत असे, या सर्व महत्वाच्या व जबाबदारीच्या जागा चोख संभाळून शिवाय वर प्रचंड लेखन व्यवसाय यशस्वी रीतीने पार पाडणें, ही सोपी व सामान्य गोष्ट नव्हे आणि हे कार्य त्यांनी इतर उपाधि संभाळून चोख तडीस नेले, ही गोष्ट त्यांच्या कर्तव्य तत्परतेची, उदंड परिश्रमाची, व अखंड चिकाटीची चांगली साक्ष देत असून, त्या कार्यांत त्यांनी इतरांची मदत घेतली असल्यास त्यांत कमीपणा बिलकूल नाहीं मात्र एवढे लक्षांत ठेविले पाहिजे की या सर्व कार्यांवर त्यांची प्रत्यक्ष देखरेख व मार्गदर्शन असून, ग्रंथावरील शेवटचा सफाईदार हात फिरविणे हे काम त्यांनीच केले, हे स्पष्ट करण्यासाठी प्रत्येक ग्रंथाच्या शेवटी 'सायणाचार्य विरचिते' असा शेरा मारून, ग्रंथकर्तृत्वाचा महत्वाचा व जबाबदारीचा मुख्य भाग आपलाच आहे, असं त्यांनी जगास स्पष्ट व बिनचूक शब्दांत जाहीर करून ठेविले आहे सारांश ग्रंथकर्त्यांची मुख्य व महत्वाची जबाबदारी सर्वस्वी त्यांच्याकडेच होती, याविषयी आतां अधिक लिहिणे नलगे

आतां या कार्यांत त्यांचे मदतनीस कोण असावेत, नव्हे, कोण होते याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणे हे ओघानेच प्राप्त झाले याविषयी साधारण माहिती अशी आहे कीं नरहरि सोमयाजी, नारायण वाजपेयी, व पंढरी दीक्षित असे हे तीन पण्डित प्रामुख्याने त्यांचे मदतनीस म्हणून उल्लेखनीय आहेत या पंडितांना हरिहर (दुसरा)महाराजानें अग्रहार इनाम घालून दिला असून, तेथील शिलालेखांत त्यांना उद्देशून 'चतुर्वेद भाष्यप्रवर्तक' असें म्हटलें आहे तेव्हा वेदभाष्य रचनेंत या पंडितांची सायणांना मदत झाली असावी, असें अनुमान काढल्यास त्यांत चूक होणार नाही त्यावेळीं

विजयनगरात विद्याप्रेमी राजाच्या उदार आश्रयामुळे देशोदेशीचे चागले चागले प्रथितयश पडित व नामवंत विद्वान लोक आश्रयास येऊन राहिले होते, हें प्रसिद्धच आहे

शिवाय आणखी, त्याचे वडील बंधु माधवाचार्य याचीहि मदत व मार्गदर्शन झाले नसावे, असे म्हणवत नाहीं त्याचाहि हात भाष्यरचनेंत अधुन मधून खेळला असावा व असला तर त्यात गैर काहीच नाही कारण माधवाचार्य झाले तरी वेदविद्येत काही कमी योग्यतेचे नव्हते. त्याची योग्यताहि या बाबतीत त्याच्या भावा इतकीच,- किंबहुना कंकणभर अधिकच-होती, असे म्हटलें तरी चालेल आणि वडील भावाचे हे उपकार स्मरूनच, त्यानी आपल्या ग्रथास 'माधवीय' हें नाव जोडून, आपली कृतज्ञता व्यक्त केली, यात काही वावगे झाले असे म्हणता येत नाहीं हें सर्व खरें असले तरी भाष्यलेखनाची मुख्य व महत्वाची जबाबदारी सायणाचीच होती आणि ती त्यानीच पार पाडली, यात तिळभरहि संदेह नाही असो

हा त्याच्या चरित्राचा महत्वाचा भाग म्हणून सारस्वत सेवेच्या इतिहासाचा झाला त्याशिवाय त्याचे राजकारणहि तितकेच मननीय व बोधप्रद आहे तो काल आताच्या सारखा ठराविक मुदतीनंतर सेवा-निवृत्तीचा नव्हता नोकरी झेपेपर्यंत करण्याचा तो काल असून, आजन्म त्याची मर्यादा असे हे येथें सागण्याचा उद्देश इतकाच की सायणाचार्य अधिकारावर असताना पाउणशे-ऐंशी वर्षांचे वयोवृद्ध होते! तशा उतरत्या वयांतच विजयनगर साम्राज्याचें पंत-प्रधान म्हणून जबाबदारीचें काम चोख बजावीत होते! ते गुरुकुलातून बाहेर पडून घरीं आल्यावर पुढें लवकरच उदयगिरीच्या कपराजाच्या मन्त्रीपदावर रुजू झाले ही गोष्ट इ. स १३४६ साली घडून आली आणि पुढे ते इ स १३८७ पर्यंत-म्हणजे कंप, सगम, बुक्क व हरिहर (दुसरा) या राजाचे-महाप्रधान म्हणून काम पहात होते अर्थात् जवळ जवळ चाळीस वर्षें प्रधानकीच्या जागेवरून विजयनगर दरबारची त्यानी एकनिष्ठ सेवा केली.

शिवाय ते रणगाजी वीरहि होते! कंप व संगम-राजाच्या कारकीर्दींत प्रसंग विशेषी अनेकवेळा रणभूमीवर जाऊन प्रत्यक्ष तलवारहि गाजविली. वारंगळच्या मुसलमानांना दक्षिणेंत उतरण्यास पायबंद घालण्याची महत्वाची कामगिरी यानीच यशस्वीपण पार पाडली. कम्पराजानंतर ते संगमयुवराजाच्या अज्ञान स्थितीत राज्यपाल होऊन उदयगिरी राज्याचें मोठ्या दक्षतेनें संरक्षण केलें. त्याच्या या कामगिरीचें चीज म्हणून त्यांना पुढे महामंडलेश्वर करण्यात आलें व 'महामंडलेश्वर वीर श्री सायणाचार्य वडेयलु' या बिरुदावळीनें ते विभूषित झाले! तसेंच दक्षिण व पश्चिम दिग्विजयाच्या मोहिमेंतहि त्यांचा सल्ला व मार्गदर्शन मोठें उपकारक ठरलें. एवंच सायणाचार्यांच्या चरित्राचें थोडक्यात सार सांगा-सांगावयाचें म्हणजे' विजयनगरचे महाप्रधान, उदयगिरीचे महामंडलेश्वर वेदमहाभाष्यकार व युद्धनीति विशारद वीर श्री सायणाचार्य असें सांगता येईल! हें सायणाचार्यांचें पौरुषपूर्ण व कर्तव्यनिष्ठ चरित्र अनेक दृष्टीनें आज देखील आम्हां भारतीयांस बोधप्रद व मननीय आहे, हें प्रत्यक्ष बोलून दाखविण्यास नको.

धन्य त्यांची माता, धन्य त्यांचा पिता व धन्य धन्य ती कर्नाटकाबा कीं ज्यांनी असें हे अपूर्व व अद्वितीय आणि तसेंच सुदिव्य व सुप्रभावी असें पाणीदार अष्टपैलू नररत्न या पुण्यशील भारतमातेस अर्पण करून, भारताची अमर कीर्ति जगभर दुमदुमून सोडली! असा विविध शास्त्र-विशारद महापंडित, चाणाक्ष राजमुत्सद्दी, व रणरंगधीर शूर योद्धा जगाच्या इतिहासांत शोधू गेल्यास सांपडेल कीं काय, याची वानवाच आहे. राजकारणांत, धर्मकारणांत देशसेवेंत व वाङ्मय-उद्धारार्थ त्यांनी आपला देह व आयुष्य अगदी चंदनाप्रमाणें झिजवून, जगास ऋणी करून ठेविलें आहे, यांत अक्षरहि खोटें नाही. आतां ते चंदन झिजून झिजून नामशेष झालें असलें तरी त्याचा मधुर सुगंध सरस्वति-मंदिरांत अद्याप दरवळून राहिला असून वेदजिज्ञासु जगाला महदुपकारक व मनोल्हादजनक झाला आहे, यांत तिळमात्रहि संदेह नाहीं. जोपर्यंत जगाला वेदाची जिज्ञासा

व आठवण राहील, तोपर्यंत त्याचे नाव व कीर्ति अमरच राहील कर्नाटक मातेचे महद्भाग्य की असा महातेजस्वी, अमरकीर्तीचा अष्टपैलू दिव्य माहरा तेथे जन्मास आला !! असो मोठ्याचे वर्णन व गुणगान किती केले तरी ते थोडेच असते आता ते मोजक्याच शब्दात सांगावयाचे म्हटले तर ते असे सांगता येईल —

> माधवर्यो माधवार्य सायण सायण पर ।
> भोगनाथो भोगनाथ प्रथते भुवनत्रये ॥

अलंकार सुधानिधि.



## प्रकरण ३० वें

# उपसंहार

यावत्कीर्तिर्मनुष्यस्य न प्रणश्यति कौरव ।
तावज्जीवति लोके स नष्टकीर्तिर्विनश्यति ॥

—भारत

विजयनगर साम्राज्य हे संस्कृत साहित्य भांडाराचे सुवर्णयुग म्हटलें तरी चालेल याच काळात वेद महाभाष्यासारखी विशाल व प्रचंड ग्रंथ निर्मिति विविधशास्त्रमथन करून मूर्तस्वरूपात करण्यात आली अनेक विद्वान पंडितानी स्वयं प्रेरणेने व प्रदीर्घ परिश्रमाने विविध विषयावर रात्रंदिवस खपून विद्वत्ताप्रचुर असे सुंदर व सुबोध ग्रंथ लिहून, धर्मजिज्ञासु जगाला उदंड ऊपकृत करून ठेविले आहे, ते याच काळात ! तशातच अंगुलिनिर्देश करून सांगण्यासारखी मुख्य व महत्वाची गोष्ट म्हणजे अथांग महासागरासारख्या विशाल, गंभीर व दुर्बोध अशा ऋग्वेदासारख्या अत्यंत प्राचीन वेदग्रंथावर सरस व सुलभ शैलीने पांडित्य-पूर्ण, प्रचंड, 'वेदार्थ-प्रकाश' महाभाष्य निर्माण करून वेदजिज्ञासु जगाला अखंड नि उदंड उपकृत करून ठेवणारे अमरकीर्ति श्री सायणाचार्य याचें नाव वैदिक वाङ्मय इतिहासात केंव्हाहि अग्रगण्य व संस्मरणीय असेंच राहील, यात तिळमात्रहि संदेह नाही विविध संहिता, अनेक ब्राम्हणग्रंथ, नाना-उपनिषदें व इतर शास्त्रीय ग्रंथ यावर साधार व सुबोध असें अष्टपैलू भाष्य लिहवून वैदिक धर्मांच्या प्रमाणभूत अशा महत्वाच्या महाग्रंथांवर अमोल्य भाष्य निर्माण करण्यास स्फूर्ति व प्रेरणा देण्याचा अपूर्व मान जर कोणास द्यावयाचा असेल तर तो विजयनगर साम्राज्याचे संस्थापक व वैदिक धर्मांचे अभिमानी व कैवारी अशा पुण्यश्लोक हरिहर व बुक्क या नरेशद्वयांच्या

पदरात टाकण्यास कोण मागेपुढे पाहील ? 'मरावे परी कीर्तिरूपे उरावे' या समर्थ वचनाच्या चौकटीत सायण-माधव या बन्धुद्वयाचे व हरिहर-बुक्क या नरेशद्वयाचे उद्‌बोधक व प्रभावी चरित्र कसे अगदी साथ शोभून दिसते, याचा निराळा पुरावा आणखी देण्याचें कारण नाही असो

वेदाचे खरे मर्म व रहस्य समजून घ्यावयाचें झाले तर त्याचें अर्थज्ञान हें अवश्यच आहे, हें उघड सांगावयास पाहिजे, अज्ञातला आता प्रकार राहिला नाहीं ती गोष्ट आता सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झाली आहे विचारी जगाला ती पूर्ण पटली असून जिज्ञासु लोकाची चिकित्सक बुद्धि तिकडे उत्सुकतेने निरीक्षण व परीक्षण करण्यास प्रवृत्त झाली आहे, याविषयीं आता वाद राहिला नाहीं तथापि काही सनातनी पंडित लोकाचे म्हणणे असे आहे कीं वेदमंत्र हे गूढार्थ वाचक असल्यामुळें त्यांचा खरा व स्पष्ट अर्थ समजणें अगर लावता येणे हें संकुचित मानवबुद्धीच्या बाहेर आहे म्हणून देवनिर्मित गूढमन्त्राचा सत्यार्थ लावण्याच्या भरीस क्षुद्र मानवाने पडू नये नुसता मंत्रोच्चार हाच कार्यभाग साधण्यास-इष्टसिद्धिप्राप्त करून देण्यास-पूर्ण समर्थ असल्यामुळे, त्याच्या अर्थाकडे धाव मारण्याची अगर त्यात डोकावून पाहण्याची मुळीच गरज नसून, ती यातायात फुकट आहे अर्थात् अर्थज्ञानविन्मुख सनातनी वेदपाठकाची ही अशी प्रामाणिक समजूत आहे आणि ती खरी आहे असें धरून चालले तरी जिज्ञासु मनाला तें फारसे पटत नाहीं व चिकित्सक बुद्धीला मानवत नाहीं

खरोखर वेदाचा अर्थ लागणे व कळणें शक्य नाहीं काय ? याचें जर नकारार्थी उत्तर आलें तर ब्राम्हण ग्रथाचा जन्म झाला तो कशा करतां ? शतपथ ब्राम्हणात वेदमंत्राचा केवळ अर्थच नव्हें, तर त्याची चिकित्सा, व्याख्या, स्पष्टीकरण, संगति या सर्व गोष्टी तेथें पदोपदीं प्रत्ययास येतात. मग त्याचें प्रयोजन काय ? वेदाचा अर्थ कळणें व लागणे हें अशक्य कोटीतील असलें तर मग त्या उपनिषदाची पार्श्वभूमि ती कोणती ? त्यांचें अधिष्ठान कशावर ? त्यांचा विषय काय ? ज्यानी हे ब्राम्हण ग्रंथ व

उपनिषद्ग्रंथ पाहिले व वाचले आहेत, त्याच्या कडून वेदाला अर्थ नाहीं अगर त्याचा अर्थ गम्य नाही अगर अर्थ लावू व करूं पाहणे हे चुकीचे व अनर्थावह आहे, असें म्हणण्याचे धाडस करवेल असे आम्हास वाटत नाही

वेदाला अर्थ आहे व तो समजणे शक्य हि आहे, या आधारावरच तमाम ब्राम्हण व उपनिषद् ग्रंथाची उभारणी, मांडणी व प्रतिष्ठा झाली आहे, हे न समजण्याइतके जग आता खास अंध व अडाणी राहिलें नाही ! इतकेच नव्हे, निरुक्तादि ग्रंथकारानी व याज्ञवल्क्यसारख्या योगीश्वरांनी ही गोष्ट शक्य व सिद्ध करुन दाखविली असून, सूज्ञ व विचारी जगाला ती पूर्ण पटली व मानवली आहे

यास्काचार्यांनी याबाबतीत स्पष्ट व चक्क म्हटले आहे की 'स्थाणुरयं भारहार किलाभूत्, अधीत्य वेद न विजानाति योऽर्थम् । यो अर्थज्ञ इत् सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ॥'— भावार्थ, वेदाध्ययन करून जो त्याचा अर्थ जाणत नाही, तो खरोखर भारवाहू खाब होय ! जो वदार्थ जाणतो तोच सर्व कल्याण गोष्टीचे सेवन करतो, व वेदज्ञानाने सर्व पापाचा परिहार करून मरणोत्तर स्वर्गास जातो ! (निरुक्त) तसेंच योगीश्वर याज्ञवल्क्याचें 'ये तद्विदुरमृतास्ते भवन्त्यथेतरे दु खमेवोपयान्ति' (बृ ४-४-१४) हे बृहदारण्यकातील वचनहि मननीय आहे इतकेच काय खुद्द ऋग्वेदहि 'यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते (ऋ १-१६४-३९) या वचनात तोच अभिप्राय स्पष्ट बोलून दाखवितो मग आणखी काय पाहिजे ?

वेदमंत्राला अर्थ आहे, म्हणजे ते अर्थगर्भ आहेत, ही गोष्ट ब्राम्हण व निरुक्तादि ग्रंथद्वार स्पष्ट व सिद्ध झाल्यावर मग त्या अर्थज्ञानाकडे जिज्ञासु मनाची प्रवृत्ति होणें हें साहजिकच आहे पण ती गोष्ट सहजा सहजी साध्य होणे, हे तितके काही सोपें काम नाही वेदासारख्या गंभीर, व गहन आणि म्हणून दुर्बोध पण ज्ञानगर्भ अशा अत्यंत प्राचीन व पवित्र ग्रंथाचे हृद्गत मनुष्यास सहज समजणें हे दुर्घटच आहे. उभ्या उभ्या त्याचा अर्थबोध होणें शक्य नाहीं त्याला तशी मोठी प्रचंड व

ब्दड तपश्चर्याच लागते आणि ती सामान्य मनुष्यास क्षपणे साध्य नसून, फार थोड्या शारदोपासकानाच ती शक्य आहे असे लोक फार थोडे; फार म्हणजे फार थोडे पण कोठे कोठे व केव्हा केव्हा ते अवतरत असतात आणि अशा थोर विद्वान व पडित कुलशेखरात श्री सायणाचार्यांची प्रामुख्याने गणना करण्यात येते व केली पाहिजे

हें सर्व इतकें सागितले याचा अर्थ व आशय इतकाच कीं आज आम्हास वेदार्थ जाणून घेण्याची इच्छा झाली तर सायणाचार्यांना शरण गेल्याशिवाय-त्याना कौल लावल्याशिवाय-गत्यतरच नाही! आर्यांच्या परम पवित्र व प्रभावी वेदग्रथाची ओळख व हृद्गत त्या आचार्यदेवाशिवाय आम्हास आज कोण उलगडून सागू शकेल? सायणभाष्यचा मगल प्रकाश जर नसता तर आधुनिक वेदजिज्ञासु जग हे अधारात खास खिचपडत व चाचपडत पडले असते हे स्पष्ट बोलून दाखवावयाला भ्यावयाचे कशाला व कोणाला? होय, सायणाना सोडून ही गोष्ट सहसा शक्यच नाहीं, असे ठासून सागावयास आम्ही मुळीच कचरत नाही मग कोणी काहीहि म्हणोत!

वेदग्रथ म्हणजे काही नाटक-कादबऱ्या नव्हेत! कीं वाटेल त्या गोमाजीनें उठावे व डोकें खाजवून काही तरी खरडून प्रसिद्ध करावें! त्याच प्रमाणे नुसता कोशग्रथ पुढे घेऊन त्याच्या मदतीनें वेदार्थ लावण्याच्या भरीस पडणे, या सारखी हास्यास्पद गोष्ट तर दुसरी कोणतीच नाहीं! फार तर कोशाच्या आधारानें वेदाचा वरवरचा अर्थ लावण्यास थोडीबहुत मदत होईल नाहीं असे नाही कदाचित् एखाद्या दुसऱ्या सुध्या मत्राचा लागला तर अर्थहि लागेल पण वेदाचें मर्म अगर रहस्य हें अखेर गुलदस्तातच राहणार वेदाचे खरे अतरग कोशाला कौल लावून कदापि समजणार नाही, हे वेदजिज्ञासूनी पक्कें लक्षात ठेवावें. त्याला परपरागत शास्त्रपद्धतीनेच अध्ययन करणे व होणे हें अत्यवश्यक आहे,-- नव्हे अपरिहार्यच आहे, ज्याचे या पद्धतीनें यथार्थ व यथासाग असें सखोल अध्ययन झाले आहे, तोच वेदार्थ लावण्यास व वेदाचे अंतरग उघड करून सागण्यास पूर्ण समर्थ व योग्य अधिकारी आहे

वेदार्थ लावण्याची भारतीय पद्धति काही विशिष्ट प्रकारची आहे नुसत्या कोशावरच निर्वाह करून भागत नाही अर्थात् भारतीय पद्धतीला धरूनच अर्थ लावला पाहिजे व केला पाहिजे नाही तर तो अधिकृत वेदार्थ म्हणवीत नाही आणि ती पध्दति बृहद्देवदेत सांगितली आहे, ती अशी -- 'अर्थात्प्रकरणाल्लिंगादौचित्यादेशकालत । मन्त्रेष्वर्थविवेक स्यादितरेष्वितिचस्थिति ॥ (बृहद्देवता २-११८) - मन्त्राचा अर्थ लावताना अगर करतांना त्याचा भाव, त्याच प्रमाणे चालू विषय, लिंग, औचित्य, देश व काळ या सर्व गोष्टी विचारात घेऊन मग त्याचा अर्थविवेक कारावा अर्थात् मंत्र लावताना मागचा पुढचा संदर्भ, चालू प्रकरण, निरुक्त, व्याकरण, ज्योतिष इत्यादि वेदाचीं उपांगे, या सर्व गोष्टी हिशोबात धरून, कशास बाध येणार नाहीं, याविषयी खबरदारी बाळगून मग अर्थ लावण्याच्या भरीस पडावें

शिवाय आणखी, मन्त्रार्थ जो लावावयाचा तो परंपरेला धरूनच असावा कारण हे जे वेदग्रंथ प्रवृत्त झाले आहेत, ते उगीचच म्हणजे अहेतुक झाले नाहींत त्याना मुळात काहीतरी उद्देश आहे व असतो उद्देशाशिवाय कोणतेंच कार्य घडून येत नाहीं आणि हा उद्देश 'वेदा यज्ञार्थमभिप्रवृत्ता ' या वचनांत आर्य ऋषींनी स्पष्ट शब्दात नि संदिग्धपणें घोषित करून ठेविला आहे आणि तो सर्वकाल वेदार्थ करू पाहणाऱ्या सर्व पंडिताना सारखाच बंधनकारक आहे आणि भारतीय पंडितानी तो सर्वस्वी मान्य केला आहे.

तेव्हां प्रसंग, विषय संदर्भ, परंपरा इकडे दृष्टि ठेवूनच अर्थ लावला तर तो खरा व युक्त अर्थ ठरतो व म्हणवितो एरवी त्याला महत्व नाही. 'न तु पृथक्त्वेन मन्त्रार्निर्वक्तव्या प्रकरणश एव निर्वक्तव्या '- मन्त्राचा अर्थ पृथकपणें, त्रुटकपणें, स्वतंत्रपणे न लावता, प्रकरण काय चाललें आहे याचा विचार करून व परंपरेकडे दृष्टि ठेऊन तदनुरोधानें अर्थ लावला तरच तो अपेक्षित व युक्त अर्थ म्हणवितो व होऊ शकतो. एरवी नाहीं मग तो अर्थ नव्हे, अनर्थच !

याचे कारण असे कीं पूर्वापार विचाराला व प्रस्तुत संदर्भाला डावलून-डोळ्या आड करून- बाजूला सारून- केलेला स्वतंत्र व मन पूत अर्थ सत्यज्ञान करून न देता, विपरीत ज्ञान अन्यथा ज्ञान-करून देणारा आहे, असें निरुक्त-काराचे स्पष्ट मत आहे व भारतीय सारस्वताना ते मान्य आहे (पौरापर्यापरामृष्ट शब्दोऽन्या कुरुतेमतिम्) इतकेच नव्हे, तर त्या बरोबरच शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष या शास्त्राचे ज्ञानहि अवश्य आहे या सर्व गोष्टीकडे अनुसंधान ठेवूनच सायणभाष्य रचण्यात आले आहे, हे जो तें उघडून पाहील, त्याला ते सहज दृष्टोत्पत्तीस येणार नाही

हें सर्व येथे सांगण्याचा उद्देश इतकाच की, या परंपरागत प्राचीन भारतीय पद्धतीला बगल देऊन अगर धाब्यावर बसवून, केवळ व्युत्पत्ति-शास्त्रदृष्ट्या व ऐतिहासिक दृष्ट्या व परिस्थित्यनुरूप मंत्रार्थ लावण्याची जी आधुनिक पंडिताची- विशेषत पाश्चात्य पंडिताची व त्याच्या तालिमेंत तयार झालेल्या भारतीय पंडिताची— अभिनव तऱ्हा व विचित्र पद्धति आहे, ती सर्वस्वी विलक्षण, अपूर्व व भारतीय दृष्ट्या अशास्त्रीय असून, ती सनातनी भारतीय पंडिताना मान्य होण्यासारखी नाही पाश्चात्य पंडित हे कितीहि चोकस, न्यायकुशल, व्युत्पत्तिविशारद व सत्यान्वेषणपटु असले तरी ते परधर्मीय असून, वैदिक संस्कृतीहून सर्वस्वी भिन्न संस्कृती-मध्ये जन्मले व वाढले असल्यामुळे त्याना वैदिक धर्माविषयी असावी तशी श्रद्धा व भावना नाही व श्रद्धा व भावना नसल्यामुळें वैदिक धर्माचें अंतरंग समजणे सहसा शक्य नाही कारण ‘श्रद्धावाँल्लभते ज्ञान’ हे वैदिकधर्माचे मुख्य पालुपद आहे. आणि वेदाचे अंतरंग न समजल्यामुळे मंत्राचा अर्थ यथार्थत आकलन होणें दुरापास्तच आणि म्हणून हा वैदिकाचा मार्ग सोडून, तुलनात्मक भाषाशास्त्र, जागतिक इतिहास, इतर देशातील प्राचीन धर्म, व आचारशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र याच्या तुलनात्मक पद्धतीने पण स्वतंत्रबुद्धीने वेदार्थ लावण्याचा नवीन मार्ग चोखाळण्याचा छंद या आधुनिक पंडितानी घेतला, पण तो सर्वमान्य होण्यासारखा नाही.

वेदाकडे बघण्याचा पाश्चात्याचा दृष्टिकोन सर्वस्वी निराळा असल्यामुळे भारतीय प्रकृतीस तो मानवण्यासारखा नाही, हे निराळे सागणे नकोच

या पाश्चात्य पडिताचा आरोप म्हणा अगर आक्षेप म्हणा असा आहे की, भारतीय पडित हे परपरागत पध्दतीने शिकून तयार झाले असल्यामुळे ते परपरेचे पक्षपाती व अभिमानी असून, त्याना वेदाचा खरा व सरळ अर्थ समजणे अगर लावता येणे शक्य नाही म्हणून राथ साहेबासारखे काही जहाल पाश्चात्य पंडित सायणाचार्यांना, ते परपरेच्या वातावरणात वाढले असल्यामुळे वेदाचा अर्थ नीट व सरळ समजला नाहीं अगर लावता आला नाहीं, असे तारे तोडण्यापर्यंत मजल मारून, आपणच वेदाचा अर्थ नि पक्षपणानें बरोबर लावू शकू, असे म्हणण्यास कमी करीत नाहींत ! आणि म्हणून त्याच्या भाष्यास महत्वहि देत नाहींत ! त्याचें म्हणणें असें की सायणाचार्य हे झाले तरी वेदकालानतर तीन हजार वर्षांनी झाले असून, त्याना जसा अर्थ लावता आला, तसा मग आम्हासहि का लावता येऊ नये ? असा हा त्याचा दावा व युक्तिवाद आहे पण ही गोष्ट या पडित महाशयाना ठाऊक नाहीं की सायणाचार्यांचा अर्थ स्वतत्र व स्वकपोलकाल्पित नसून, त्याच्यामागे प्राचीन भाष्यकाराची व शास्त्रकाराची फार मोठी परपरा आहे ! असे उद्गार काढताना इतर भाष्यकाराचीं वेदभाष्ये या पाश्चात्यपडिता पुढे नव्हतीं, इतकेच नव्हे तर तसे भाष्यकार मागे होऊन गेले, याचीहि त्याना जाणीवहि नव्हती! याबद्दल पंडित मोक्षमुल्लर साहेबाचे उद्गार येथें विचारणीय आहेत

हे साहेब मजकूर आपल्या ऋग्वेदाच्या सहाव्या भागाच्या प्रस्तावनेत म्हणतात, ते असे – Sayan refers but seldom to former commentaters on the Rig Veda Those whom he does mention do no longer exist or at all events no MSS of them have ever yet reached Europ It is more than doubtful, even, whether any of

them were real commentories on the Rig Veda
*(Preface to Rig Veda Vol VI, Page 21)*

या वरून पाश्चात्य पंडिताच्या मनात सायणाचार्यापूर्वी वेदभाष्यकार होऊन गेले होते. याविषयी जबरशंका-नव्हे गाढ अज्ञानच-गुटमळत होत, हें वरील उद्गारावरून स्पष्ट होते त्यावेळी ती भाष्य पाश्चात्य पंडितापुढ नव्हती, म्हणून ती मुळी अस्तित्वातच नव्हती अगर नसावी असा बेधडक रोखठोक शेरा मारून, ते मोकळे झाले आहेत, हे खरे पण खरी वस्तुस्थिति तशी नाहीं त्यावेळी तीं भाष्ये उपलब्ध नव्हती अगर नसतील, पण म्हणून त्याच्या अस्तित्वावरच कुऱ्हाड घालणें हे न्याय्य होईल काय ? भारतीयाचे ज्ञानभांडार इतके अपार व अथाग आहे की, त्याचा आज देखील आम्हा-भारतीयाना सुध्दा पत्ता लागत नाही व लागला नाही ! या प्रचंड कालाच्या अगाध उदरात ते दडून बसले आहे केव्हा त्याला प्रकाशात येण्याचा योग येईल तेव्हा येवो ! असो मोक्षमुल्लर साहेबाचे वरील उद्गार इ स १८७१-७२ सालचे म्हणजे जवळ जवळ ऐंशी वर्षांच्या मागचे म्हणजे ग्रंथ संशोधनाच्या अगदी बाल्यावस्थेतील आहेत, हें उघड सांगावयास नकोच. त्याचा आधार अगर मुक्ताफळे आता पुढे करणे हे हास्यास्पद होईल

वरील मोक्षमुल्लर साहेबाच्या उद्गारानंतर आता अलीकडे शोध करता करता स्कंद स्वामीचे ऋग्वेद भाष्य उपलब्ध झाले आहे ! त्या नंतर दुसरे भाष्यकार म्हणजे वेंकटार्यतनय माधवभट्ट हे होत सायणाचार्य हे स्कंद स्वामी व माधवभट्ट या दोघाचाहि आपल्या भाष्यात उल्लेख करतात तिसरे आणखी एक भाष्यकार सापडले असून त्याचे नाव सुदर्शसुत माधव असे आहे हे तीन भाष्यकार मोक्षमुल्लर साहेबाच्या उद्गारानंतर आतापर्यंत प्रकाशात आले आहेत, ही गोष्ट जमेस धरली तर इतिहासांध पाश्चात्यपंडिताची दर्पोक्ति किती बालिश व कशी निर्मूल आहे याविषयी अधिक लिहिणे नकोच

हें आमचें आजचे वाङ्मय जंगली व आसुरी मुसलमानाच्या जाळ-

पोळीच्या तडाक्यातून सुटून सहीसलामत टिकून राहिले आहे, हें लक्षात घेतले पाहिजे आमच्या प्राचीन व महत्त्वाच्या असंख्य ग्रथाची कल्पनातील होळी झाली असून, अजून इतका जगाला थक्क करणारा व विचारवताना वेड लावणारा बहुमोल ग्रंथ भाडार अद्यापहि दृशागुळे उरला आहे, ही आश्चर्याची गोष्ट नव्हे तर काय ?

आता ही भाष्ये उपलब्ध झाली आहेत, इतकच नव्हे, तर त्यापैकीं वेकटार्यतनय माधवभट्ट याचे भाष्य पजाबचे सस्कृत प्रोफेसर श्री लक्ष्मण स्वरूप यानी छापून प्रसिद्धहि केले आहे त्याचप्रमाणे सुंदरीसुत माधव याचे भाष्य डॉ चि कुजन राजा, एम् ए यानी अड्यार येथे छापून त्यालाहि सूर्यप्रकाशात आणले आहे यावरून सायणाचार्य हे एकटेच भाष्यकार झाले नसून, त्याच्या पूर्वी प्राचीन भाष्यकाराची फार मोठी उद्दड परपरा होती, असे आता पाश्चात्य पडिताच्या तोडावर स्वच्छ व स्पष्ट सागावयास मग लाजावयाचे कशाला ? तेव्हा मोक्षमुल्लर, लडविग्, ग्रासमन, राथ वगैरे सारख्या उथळ व अहमन्य पंडिताच्या निराधार बरळण्याला भारतीय पडित मग भीक घालावयास तयार नसले, तर त्याना नाव ठेवावयाला जागा राहिली कोठें ? हे पाश्चात्य पडित अर्ध्या हळकुडाने कसे शेफारून जातात, हे आता निराळे सागितलें पाहिजे कीं काय ?

आज इतके म्हणण्यास जागा झाली कीं सायणाचार्यांच्या आधीं निदान तीन भाष्यकार तरी होऊन गेल्याचे स्पष्ट झाले त्या भाष्यांचा फायदा सायणाना जरूर झाला होता, हें त्याच्या भाष्यवरूनच दिसून येते त्याना वाट पुसत पुसतच आपल्या भाष्याचा मार्ग त्यांनी आखला असावा, यात संदेह मानण्याचें कारण नाही अर्थात् वेदावर भाष्य लिहिणारे ते पहिलेच भाष्यकार असा जो पाश्चात्याचा समज वि आरोप आहे, तो आता निर्मूल ठरून सायणाच्या मागे भाष्यकाराची अखड परपरा होती, या विधानास जोरदार पाठिबा मिळतो, असे निर्विवाद म्हणण्यास आज जागा झाली आहे

आता इतके बरीक खरे की लडविग, ग्रासमन, ग्रिफिथ, राथ सारखे जर्मन व पाश्चात्य पडित सायणाचार्यांना बाजूस सारून, स्वत च्या बुद्धीने व व्युत्पत्तिशास्त्र, भाषाशास्त्र, इतर धर्म, इतिहास, आचारशास्त्र इत्यादि उपकरणाच्या मदतीने स्वतत्र वेदार्थ लावण्याचा व वैदिक वाङ्मयावर आपल्यापरी नवीन प्रकाश पाडण्याचा जो भगीरथ प्रयत्न केला आहे, तो खरोखर कौतुकास्पद असून, स्तुतीस पात्र आहे, याविषयी बिलकूल शका नाही मात्र एवढें लक्षात घेतले पाहिजे कीं तसे करताना त्यानी सायण-भाष्याला अजीबात डोळ्यापुढून दूर सारलें होते हे म्हणणे मात्र अम्मळ धाडसाचे होईल त्याच्या भाष्याचा उपयोग मार्गदर्शनाच्या कामीं त्याना झाला नसेल, असे छातीला हात लावून सागण्यास कोणीहि जाणता मनुष्य तयार होणार नाहीं उलट त्याची त्याना पदोपदी मदत झाली असलीच पाहिजे, नव्हें जास्तींत जास्त त्यानी घेतली असली पाहिजे, असेच जो तो म्हणेल आणि ही गोष्ट, फार लाब कशाला, मोक्षमुल्लर सारखे काही कृतज्ञ पंडित प्राजलपणे कबूल करीत आहेत, ही त्यातल्या त्यात मोठ्या समाधानाची गोष्ट होय

मोक्षमुल्लर साहेबाचे या बाबतींत राथ सारख्या चढेल पंडिताना उद्देशून म्हणणे आहे तें असे — 'If now we can work without Sayan, we aught to remember in mind that five and twenty years ago we could not have made even our first steps, we could never at least have gained a firm footstep without his leading strings If, Therefore we can now see further than he could let us not forget that we are standing on his shoulders,'

*(Preface to the first edition, of the Vedic Hymns by Prof F. M Max Muller, Part I, Vol 36 of the secred Books of the East P 31)*

या उद्गारावरून हे उघड होते की मोक्षमुल्लर सारख्या पाश्चात्य वेदजिज्ञासूंना व वेदाभ्यसकाना सायणाचार्यांचे ऋण नाकरता येत नाहीं तसेच ऋग्वेदाचे इंग्रजी भाषातर–कर्ते श्री एच एच विलसन साहेबाचे उद्गारहि या बाबतीत फारच स्पष्ट असून ते अत्यत बोधप्रद आहेत त्यानी जे इंग्रजीत भाषातर केले आहे, ते सायणाना पुढे घेऊनच– त्याना पदोपदीं कौल लावूनच– केले आहे ! सदरहु साहेब मजकूर सायणविषयीं बोलतात ते असे —For although the interpretation of Sayan may be occassionally questioned, he undoubtedly had a knowledge of his text far beyond the pretensions of any European scholar and must have been in possession either through his own learning or that of his assistants of all the interpretations which had been perpetuated by traditional teaching from the earliest times '

*H H Wilson*

*(Introduction to the Rig Veda Vol I page)*

अर्थात् सायणचार्यांची योग्यता, विद्वत्ता व अधिकार व त्याच्या भाष्याचे महत्व काही पाश्चात्य पडिताना देखील पूर्ण मान्य होते व मान्य करणे भाग पडले, यावरून आता त्याच्या विषयी अधिक लिहिणे नलगे

आता सायणाचार्यांना नाव ठेवणाऱ्या व नाक मुरडणाऱ्या या पाश्चात्य पडिताकडे वळून त्यानी आपली स्वतत्र अशुद्ध व अपक्व बुद्धि चालवून लावलेल्या वेदाच्या अर्थज्ञानाकडे थोडेसें डोकावून पाहू तत्पूर्वी हे सागणे जरूर आहे की, हे जे वेदग्रथ आहेत, त्यात शब्दशास्त्राचे सर्व पर्याय अ हेत तेथे व्याकरणशास्त्र आहे, छंद शास्त्र आहे, व्युत्पत्तिशास्त्र आहे, अलंकारशास्त्र आहे, ज्योतिषशास्त्र आहे, खगोलशास्त्र आहे, आयुर्वेदशास्त्र आहे, कृषिशास्त्र आहे, नीतिशास्त्र आहे, व्यवहारशास्त्र आहे,

युद्धशास्त्र आहे समाजशास्त्र आहे इत्यादि सर्वशास्त्राचे व विद्यांचे शब्दचित्र प्रसंगाप्रसंगाने वेदमंत्रात गर्भित करण्यात आले असून या सर्व शास्त्राची पूर्ण माहिती असल्याशिवाय वेदमंत्राचा यथार्थ अर्थ, खरे रहस्य समजणे अगर आकलन होणे दुरापास्त आहे काही काही वेदमंत्र हे रूढार्थांत वाच्यार्थांत-नसता ते लक्ष्यार्थ अगर गूढार्थवाचक असतात. तर काही कोड्याच्या थाटाचे असतात अशा प्रसंगी रूढार्थ अगर उत्तानार्थ घेतला अगर करण्यात आला तर त्यातून सत्यार्थाचा यथार्थ बोध होऊ शकत नाहीं व केला तर तो हास्यास्पद होतो

उदाहरणार्थ म्हणून येथे काही दाखलेवजा मंत्र घेऊन त्यांचा भारतीय पंडिताचा व परदेशीय पंडिताचा अर्थ देऊन साहेबी पंडिताचा अर्थ कसा विपरीत अप्रासंगिक, व म्हणून हास्यास्पद आहे, हें दाखविण्याचा अल्पसा प्रयत्न करतो प्रथम हा मंत्र घेतो

> 'चत्वारिश्रृंगा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्तहस्तासो अस्य ।
> त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महादेवो मर्त्यां आ विवेश ॥
>
> (ऋ ४-५८ ३)

या मंत्राचा पाश्चात्य पंडित ग्रिफिथ साहेब अर्थ लावतात तो असा –
Four are his horns, three are the feet that bear him, his heads are two, his hands are seven in number, Bound with a triple bond, the steer roars loudly, the mighty God hath entered into mortals'

मराठी अर्थः– त्याला चार शिंगे आहेत, तीन पाद आहेत, दोन मस्तके व सात हात आहेत. तीन प्रकारानी तो बद्ध झाला असून तो बैल डरकाळ्या फोडतो असा हा बैल रूपी महादेव मनुष्यामध्ये प्रविष्ट होऊन राहिला आहे

हा वाच्यार्थ असून, त्यावरून विचार करता महादेव हा चार शिंगाचा व तीन पादाचा असा डरकाळ्या फोडणारा एक विचित्र बैल आहे,

हा भाव निष्पन्न होतो व पाश्चात्य पंडित तसा अर्थ करून मोकळे होतात आणि काही साहेबी अर्थाला भाळलेले आमचे अर्धवट भारतीय पंडित तो अर्थ घेऊन वेदाची टवाळी करण्यात मोठी प्रौढी मिरवितात! पण हा मनुष्यात प्रविष्ट होऊन राहिलेला महादेव खरोखर तसा चार पायाचा बैल आहे काय? हा पाश्चात्याचा उत्तान अर्थ भारतीय पंडिताना मानवणारा आहे काय? मुळीच नाही तो मंत्र त्या ठिकाणी गूढार्थ वाचक आहे आणि तो तसा केला तर त्या मंत्राचा सयुक्तिक व समंजस असा प्रसंगानुरूप मोठा सुंदर अर्थ लागतो म्हणून वैदिक आचार्यांनी लावलेला त्याच मंत्राचा हा पुढील प्रमाणें अर्थ आहे

प्रथम निरुक्तकार यास्काचार्य याचा अर्थ देऊन, मग इतर आचार्यांचे अर्थ देतो वेदार्थ कोविद यास्काचार्य या मंत्राचा सर्व बाजूनी विचार करून अर्थ लावतात तो असा -- 'चत्वारि श्रृंगेति वेदा वा एत उक्तास्त्रयो अस्य पादा इति सवनानि त्रीणि द्वे शीर्षे प्रायणीयोदनीये सप्त हस्तास सप्त छंदांसि त्रिधा बध्दो मंत्रब्राम्हणकल्पैर्वृषभो रोरवीति रोरवणमस्य सवन-क्रमेण ऋग्भिर्यजुर्भि सामभिर्यदेनमृग्भि शंसन्ति यजुर्भिर्यजन्ति सामभि स्तुवन्ति महो देव इत्येष हि महान् देवो यद्यज्ञो मर्त्यां आविवेशेत्येष हि मनुष्यानाविशति यजनाय तस्योत्तराभूयसे निर्वचनाय ॥' (नि १३-१ पा ७ ख, उत्तर षट्कम्).

या प्रमाणे जुन्यातले जुने असे हे जे यास्काचार्य त्यानी 'चत्वारि श्रृंगा' या मंत्राचा जो अर्थ लावला आहे, तो अभिजात हिंदूमनाला सर्वस्वी पटणारा व मानवणारा असून, तो त्या मंत्राच्या देवतेला अगदी साजेसा आहे वेदातील प्रत्येक मंत्राला एक एक अधिष्ठित देवता असते आणि त्या देवतेला साजेल व जुळेल असा अनुरूप अर्थ लावला पाहिजे तरच तो वेदार्थ म्हणवितो यथे या मंत्राची देवता यज्ञ उर्फ अग्नि आहे आणि त्या यज्ञस्वरूप अग्निदेवतेला अनुरूप असाच त्याचा अर्थ लावला पाहिजे पण हें या परधर्मी व परदेशी साहेबाना जुळावयाचे कसे? त्याना फक्त शब्द ज्ञान आहे देवता ज्ञान नाहीं असो.

आता याच मंत्राचा सायणाचार्य काय अर्थ लावतात, ते जरा पाहू यावर आचार्यांचे भाष्य आहे ते असे – 'अस्य यज्ञात्मकस्याग्ने चत्वारि शृंगा चत्वारो वेदा शृंगस्थानीया । त्रयो अस्य पादा सवनानि त्रीण्यस्य पादा । प्रवृत्तिसाधत्वात पादा इत्युच्यते । द्वे शीर्षे ब्रह्मौदन प्रवर्ग्यश्च । इष्टिसोम प्राधान्येनेदमुक्तम् । सप्त हस्तास सप्तछंदासि । हस्ता अनुष्ठानस्य मुख्य साधनम् । छंदास्यपि देवताप्रीणनस्य मुख्य साधनमिति हस्तव्यवहारः । त्रिधा बद्ध मंत्रब्राह्मणकल्पै त्रिप्रकार बद्ध । बन्धनमस्य तन्निष्पाद्यत्वम् । वृषभ फलाना वर्षिता रोरवीति । भृश शब्दायते । एव महो देव मर्त्यान् आविवेश ॥ (ऋ ४-५८ ३)

आता हाच मंत्र शुक्ल यजुर्वेदातहि आला असून त्याचा अर्थ महीधर भाष्यकार करतात, त्याचाहि येथे उल्लेख केल्यास वैदिक आचार्यांची वेदार्थ लावण्याची पद्धति कशी व किती सुसगत व समजस आहे हें वाचकाच्या ध्यानात सहज बिबण्यासारखे आहे महीधर आचार्यांचे भाष्य या मंत्रावर आहे ते असे -- 'यज्ञपुरुदेवत्य ऋषभो मंत्र । चतु शृंगोऽवमीदित्युक्त्वा चतु शृंग यज्ञ वृषभरूपेण प्रतिपादयितुमाह । यो ऋषभ कामाना वर्षिता । रोरवीति अत्यर्थ शब्दं करोति सोऽय महो देव महान् देव मर्त्यान् मनुष्यान् आविवेश अविशति । मनुष्यान् व्याप्य तिष्ठति । यस्य ऋषभस्य यज्ञस्य चत्वारि शृङ्गा शृङ्गाणि चत्वारो वेदा शृंगाणि । त्रय पादा सवनानि द्वे शीर्षे प्रायणीयोदनीये सप्त हस्तास छंदासि । त्रिधा बद्ध मंत्रब्राह्मणकल्पैर्बद्ध । शब्दग्रामो वा व्याख्येय ॥ (शु य अ १७, म ७१)

ही वैदिक आचार्यांची वेदार्थ लावण्याची तऱ्हा सनातन परंपरेला धरून, किती सुसंगत, सुसमजस, व सुसदृश आहे बरे ! यास्काचार्य जो अर्थ लावतात, तोच अर्थ जवळ जवळ सायणानी स्वीकारलेला असून, यजुर्वेदाचे भाष्यकार महीधरानीहि त्याचाच अनुवाद केला आहे हे सर्व वैदिक धर्म आमूलाग्र जाणणारे जाडे विद्वान पंडित असून शिवाय भाष्यकार आहेत आणि पाश्चात्य पंडित हे सगळे एकजात भाषांतरकार

आहेत त्यांचें वैदिक धर्माचे ज्ञान कितीहि श्लाघनीय असले तरी ते भाष्यकाराच्या दृष्टीने गुढघ्याखालीच ! भाष्यकाराचे ज्ञान त्या त्या विषयावर अधिक खोल, अधिक विस्तृत, अधिक भरीव, अधिक सुस्पष्ट व अधिक मूलगामी असते अर्थात् त्याची योग्यता व अधिकार भाषांतर-कारापेक्षा-पढीक पोपटी ज्ञानापेक्षा- केव्हाहि उच्च व श्रेष्ठ असतो, हें मुद्दाम सांगितले पाहिजे असे नाहीं वेदांतील प्रत्येक मंत्राची एक ठरलेली देवता असते त्या देवतेला साजेल असा अनुरूप अर्थच लावला पाहिजे तरच तो अर्थ म्हणवितो एरवी तो अनर्थच !

वैदिक आचार्यांना नावं ठेवणाऱ्या अर्ध्या हळकुंडाने पिवळे झालेल्या पाश्चात्य पंडिताचा अर्थ तरी केव्हा केव्हा किती चमत्कारिक असतो व त्या-वरून त्याचें वैदिक धर्माचे ज्ञान किती उथळ व कोतें असते, हे दाखवावयाचे झाल्यास ओल्डनबर्ग साहेबाना पुढे खेचलें पाहिजे हे साहेबमहाशय पारस्कर गृह्यसूत्राचे इंग्रजी भाषांतरकार आहेत त्यांनी पुंसवन संस्कार-विषयावरील एका वचनाचा फार चमत्कारिक अर्थ केला आहे ते वचन हें असें आहे 'कूर्मपित्तं चोपस्थे कृत्वा' या वचनांतील कूर्मपित्त या शब्दाचा अर्थ 'कासवाचें पित्त' (gall of a tortise) असा वरील साहेब मजकुरांनी केला आहे पण त्या सूत्राचे भाष्यकार आपल्या भाष्यात 'कूर्मपित्त अंके निधाय जपति' असा त्याचा अर्थ सांगून कूर्मपित्त याचा अर्थ पाण्याने भरलेलें मातीचे परळ असा करतात आणि तें प्रसंगाला धरून अनुरूप असेंच आहे साहेबाला वैदिक धर्माचें प्रयोग ज्ञान नसल्यामुळे शब्दाचा रूढार्थ देऊन ते मोकळे झाले ! पण धर्मसंस्कारात कासवाचें पित्त उपयोगिणें हें निषिद्ध असून तसे करणे हें हास्यास्पद ठरतें, इतकें समजण्याचा अकलेचा साहेबाजवळ अभाव आहे, हें त्यावरून सिद्ध होत नाहीं काय ? असो.

आता तिसरे एक उदाहरण देऊन प्रस्तुत मुद्दा निकालात काढतो. ऋग्वेदांतील 'हिरण्यगर्भ समवर्तताग्रे' (ऋ १०-१२१-१) हा मंत्र उदाहरणार्थ घेतो त्या ऋचेचा शेवटचा पाद 'कस्मै देवाय हविषा विधेम'

असा असून, तेथील 'क' चा अर्थ पाश्चात्य पंडितास बरोबर कळला नसल्यामुळे त्यांनी तेथे केलेला अर्थ प्रसंगाला धरून चुकीचा ठरतो पाश्चात्य पंडितांनी त्याचा अर्थ लावला आहे तो असा –

जर्मन पंडित ग्रासमन यांनी जर्मन भाषेत जो अर्थ केला आहे, त्याचा अनुवाद श्री अरोस्मिथने इंग्रजीत केला आहे तो असा – What god shall we adore with our oblations ? 'कोणत्या देवाला आम्ही हविर्भाग द्यावा ?' असे मराठीत त्याचे भाषांतर आहे अर्थात् ते वाक्य प्रश्नार्थक रूपात भाषांतर करण्यात आले आहे तेथे 'क'चा 'कोणता' असा अर्थ करण्यात आला आहे त्याचप्रमाणे श्री लुडविग या जर्मनपंडितानेहि तोच अर्थ लावला आहे त्याचे जर्मन भाषांतर इंग्रजीतून सांगावयाचे म्हणजे 'What God shall we worship' असे सांगता येईल ऋग्वेदाचे इंग्रजी भाषांतरकार श्री राल्फ, टी एच, ग्रिफिथसाहेब 'कस्मै देवाय याचा अर्थ 'What God' असा वरील साहेबद्वयाप्रमाणेच करतात याचे कारण असे की त्यांना त्या मंत्रातील 'क' चा अपेक्षित अर्थ नीटसा समजला नाही त्यांनी 'क' चा अगदी वरवरचा- म्हणजे अगदी सामान्यस्वरूपाचा- अर्थ घेतला आहे पण तेथील प्रसंगाला अनुलक्षून तो तसा करण्यात आलेला अर्थ अप्रस्तुत म्हणजे चुकीचा ठरतो तो मंत्र प्रजापतिदेवतेचा असल्यामुळे तेथे 'क' चा अर्थ 'प्रजापति' असाच होतो व तसाच लावण्यात आला पाहिजे आणि हा अर्थ योगीश्वर याज्ञवल्क्यापासून तो सायणाचार्यांपर्यंत तसा एकजात लावण्यात आला आहे तो आम्ही यथाक्रम खाली देत आहो

प्रथम तो सगळा मंत्रच येथें उद्धृत करतो म्हणजे अर्थ समजण्याला सोईचे होईल तो मंत्र हा असा – हिरण्यगर्भ समवर्तताग्रे भूतस्य जात पतिरेक आसीत् । स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥' (ऋ १०–१२१–१ व शु य २३–१) हा मंत्र ऋग्वेदातहि आहे व शुक्ल यजुर्वेदातहि आहे शतपथ ब्राम्हणात याज्ञवल्क्य या मंत्राचे स्पष्टीकरण करतात ते असें – 'हिरण्यगर्भ समवर्तताग्रेऽइति । हिरण्यगर्भो ह्येष

समवर्तताग्रे भूतस्य जात पतिरेक आसीत् स दाधार पृथिवी द्यामुतेमामित्येष व दिव च पृथिवी च दाधार कस्मै देवाय हविषा विधेमेति प्रजापतिर्वै कस्तस्मै हविषा विधेमित्येतत् ।।" येथे याज्ञवल्क्यानी 'क' चा अर्थ 'प्रजापति'– 'प्रजापतिर्वै क'– असा स्पष्ट केला आहे, आणि शतपथवाक्य हें प्रत्यक्ष श्रुतिवाक्य आहे आणि म्हणून त्याचे प्रामाण्य सर्वश्रेष्ठ आहे !! याज्ञवल्क्याना 'क' चा अर्थ लावता आला नाही असं म्हणण्याचे धाडस नीट शुद्धीवर असलेला कोण शाहणा करील? त्याचप्रमाणे निरुक्तकार यास्काचार्यांनी 'क प्रजापति' असाच अर्थ केला आहे (निरुक्त १-५-१४) सायणानीहि 'क' चा अर्थ 'प्रजापति' असाच केला आहे तसेच शुक्ल यजुर्वेदाचे भाष्यकार श्री उवट आचार्यांनी 'कस्मै दैवाय' याचा अर्थ प्रजापतये देवाय व श्री महीधरानी कस्मै' याचा अर्थ 'प्रजापतये' असाच केला आहे येथे 'क' म्हणजे सुख असा अर्थ आहे 'कोण' असा अर्थ अभिप्रेत नाहीं यावरून हें उघड आहे की भारतीय पडिताना नाव ठेवणारे पाश्चात्य पडित सुद्धा वेदार्थ लावण्यास कोठे कोठ ठाम घसरले आहेत !। वरील भारतीय पडित हे भाष्यकार असून पाश्चात्य पडित हे एकजात भाषांतरकार आहेत आणि भाष्यकाराची योग्यता व दर्जा भाषातरकारापेक्षा केव्हाहि श्रेष्ठच आहे व असतो त्याचे ज्ञान अष्टपैलू व अष्टावधानी आणि सखोल असते तस भाषातराकाराचे नसते

या विषयासबधीं पाश्चात्य पडिताविषयीं झाले इतके विवेचन पुरेसे आहे श्रीसायणाचार्यांना व भारतीय पडिताना नाव ठेवणाऱ्या पाश्चात्य-पडिताचे वेदविषयक ज्ञान किती कोते, अपूर्ण, उथळ आहे, याची थोडीशी चुणूक आम्हास येथे दाखवावयाची होती ती आम्ही यथाशक्ति व यथामति करून, वेदार्थ लावण्यात पाश्चात्य पडितहि कोठे व कसे घसरले आहेत, याची वाचकास थोडक्यात साधार ओळख करून दिली असो

शिवाय आणखी, प्रसगाची जाणीव नसली म्हणजे शब्दाच्या अर्थांचा अनर्थ अगर विपर्यस्त अर्थ कसा करण्यात येतो, या विषयी एक सुरेख आख्यायिका आहे ती येथे दिल्यास आमच्या वरील विधानाची

वाचकास सत्यता पटण्यास चागली मदत होईल, असे वाटल्यावरून ती आम्ही दृष्टात रूपाने देत आहो एक मोठे गुरुकुल असून, तेथें विविध विषयावर व शास्त्रावर शिक्षण घेण्यास पुष्कळ विद्यार्थी येऊन राहिले होते त्यात एक शिष्य षटशास्त्रे शिकून तयार झाला होता अमरकोश त्याच्या अगदी मुखोद्गत झाला होता तो आचार्यदेवाचा मोठा प्रिय असल्यामुळे त्याच्या जवळच राहिला होता एके दिवशी आचार्यदेवाना बाहेर गावीं जाण्याचा प्रसग आला म्हणून त्यानी त्या शिष्याला बोलावून प्रवासाची जुळवाजुळव करण्यास सागून, घोडाहि खोगीर वगैरे घालून तयार ठेवण्यास सागितले

नतर गुरुदेव स्नान वगैरे करून, देवपूजादि आटपून जेवावयास बसले त्यावेळी त्याना मीठ कमी पडले म्हणून शिष्यास हाक मारून 'सैंधव घेऊन ये' असा आदेश दिला शिष्य पडला मोठा शाहणा व्युत्पत्तिशास्त्रवेत्ता व अमरकोश जिव्हाग्रावर नाचविणारा ! त्याला पडला विचार ! 'सधव आण' असे गुरूजीने म्हटले तेव्हा त्यानी पाहुण्यास घोडा आणावयास सागितले असा सैधव शब्दाचा अर्थ करून, त्याने सज्ज केलेला घोडा भोजनशालेत आणून आचार्यपुढे उभा केला ! 'अरे सैंधव आण ! असें पुन त्यानी म्हटले तेव्हा शिष्याने घोड्याकडे बोट करून 'हा काय, घोडा सर्वसामान घालून सज्ज केला आहे' असें उत्तर देतांच आचार्यदेवानी कपाळावर हात बडवून घेऊन हसून म्हटले, 'अरे शाहण्याच्या काद्या ! तुझी सर्वविद्या केरात गेली, बघ ! मी सैधव म्हणजे मीठ मागितले आणि तू अक्कल चालवून घोडा आणून उभा केलास ! काय म्हणू तुझ्या पांडित्याला ? प्रसंगावधान नसल्यामुळे तुझें सगळें शहाणपण फुकट गेलें ! अमरकोश वाचून हेच का शिकलास ! शब्दाला अनेक अर्थ असता कोणता अर्थ कोठे युक्त आहे, याचे प्रसंगावधान नसेल, तर सर्वविद्या शिकून कोरडा पाषाणच ! येथ तुझ्या अर्थाचा अगदी अनर्थ झाला !! जा मूर्खा !!!'

या आख्यायिकेवरून घ्यावयाचा बोध इतकाच कीं प्रसगावधान नसेल तर शब्दार्थाला विपर्यस्त स्वरूप कसे येते याचें वरील उदाहरण एक प्रतीक

आहे असाच प्रकार पाश्चात्य पडिताचाहि कोठे कोठ झाला आहे उदाहरणार्थ 'कूर्मपिरा' 'शिश्नदेव' 'क ' 'अपस्' इत्यादि त्याचे अर्थ पाहिले म्हणजे पाश्चात्य पंडितहि प्रसगाचे ज्ञान नसल्यामुळे कसें घसरले आहेत व घसरतात हे आम्हास दाखवावयाचे होते ते वरील आख्यायिके वरून वाचकास स्पष्ट करून दाखविले असो

येथपर्यंतच्या विवेचनावरून सायणाचार्यांच्या जीवितकार्याची रूप-रेखा थोडक्यात आखून दाखविण्याचा अल्पसा प्रयत्न करण्यात आला त्यातल्या त्यात जाता जाता विशेष सागावयाची गोष्ट म्हणजे ही कीं सर्व उपलब्ध वेदिक वाङ्मयामध्ये 'वेदार्थप्रकाश' हा ग्रथ अत्यंत विशाल, तसाच अष्टपैलु व विविधरगी असा उद्बोधक महा ंथ असून, तो पायाशुद्ध आहे व्युत्पत्तिसिद्ध आहे शास्त्रशुद्ध आहे परपरा-पुष्ट आहे, ज्ञानगर्भ आहे अर्थ-प्रचुर आहे न्याय-निष्ठ आहे कर्म-प्रक्रिया-बोधक आहे अनुभव-प्रत्यक्ष आहे इतिहास-पुराण-मंडित आहे असा हा महासागरा-सारखा विशाल, अगाध, गंभीर व अर्थावबोधक महाग्रंथ जगतीतलावावर क्वचितच असेल जोपर्यंत वेदवाङ्मय जीवत आहे व जगाला त्याची लालसा व जिज्ञासा आहे, तो पर्यंत सायणाचार्यांचे नाव व कीर्ति अखड, उदड व अमरच राहील !

वेदवाङ्मय ही भारतीय सस्कृतीची मायकूस असून, जगातील सर्व धर्मांवर तिचा प्रकाश त्या त्या मानाने कमी अधिक उजळला आहे आता स्पष्टच बोलून दाखवावयाचे म्हणजे सस्कृति ही जीवंत समाजाचा व राष्ट्राचा चैतन्यदायी आत्मा-आहे राष्ट्रीय चैतन्याचा-चिरजीवित्वाचा-तो दिव्य झरा आहे ! सस्कृतिहीन समाज अगर राष्ट्र जवळ जवळ मेल्यासारखेंच का म्हणना ! म्हणून जो समाज वा राष्ट्र आपल्या पूर्व सस्कृतीस विसरत चालले आहे अगर पारखें होत चाललें आहे, अगर आपली संस्कृति झुगारून, तिरस्करून अथवा अवमानून परप्रकाशी, परावलबी, परोपजीवि, परप्रत्यय-नेयबुद्धि व परानुकरणशील झालें आहे, अगर बनत चालले आहे, ते राष्ट्र अधोगतीस लागलें असून, मृत्युपथाकडे वळले आहे असें बेधडक समजण्यास

कसलाच प्रत्यवाय नाहीं राष्ट्राचें मर्मस्थान म्हणजे संस्कृति तिला जर धक्का पोचला, तर त्या राष्ट्राचें अधःपतन-नव्हे आत्मनाश-मग फारसा लाब नाहीं, हे जागरूक राष्ट्राने केव्हाहि डोळ्या आड करू नये

भारत राष्ट्राची आत्मिक, बौद्धिक, नैतिक व शैक्षणिक वाढ व विकास करावयाचे राष्ट्रधुरीणानी मनात आणले तर प्राचीन भारतीय संस्कृति-वाङ्मय मंदिराकडे धाव मारल्याशिवाय तरणोपाय नाही आणि तेथील ज्ञान देवतेचे मंगल दर्शन घडविणाऱ्या सायण-माधवासारख्या सूक्ष्मदर्शी आचार्यदेवाकडे तोंड वळविल्याशिवाय व भारतीय ज्ञानदेवाना कौल लावल्याशिवाय गत्यंतर नाही! त्यातल्या त्यात भारतीय संस्कृतिप्रेमी महाराष्ट्राला आपल्या प्राचीन, तेजस्वी, कर्मयोगी आचार्य देवाची अशत तरी ओळख पटावी, या हेतूनें आम्ही हें श्रीमत् सायणाचार्यांचें अष्टपैलू चरित्र यथाशक्ति व यथामति रंगवून त्याचे दर्शन घडविण्याचे धारिष्ट केले आहे तर भारतीय संस्कृतिप्रेमी आमचा वाचक वर्ग तो आमचा सांस्कृतिक व ऐतिहासिक प्रयत्न गोड मानून घेईल, अशी आशा प्रदर्शित करून भागलेल्या लेखणीला आता विश्रांति देतो

सायणं नमस्कृत्य वेदार्थप्रकाशकम् ।
तत्प्रकाशेन विनश्यन्ति आत्मस्थं सर्व-संशय ॥



# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ नं | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५ | १९ | ग्रथे | ग्रथ |
| ८ | २ | पिद्वान | विद्वान |
| १४ | ७ | प्र ाणेच | प्रमाणेच |
| ३४ | २२ | बसूत | बसून |
| ५१ | २ | राज्याजी | राज्याची |
| ८१ | १० | बडे | बंडे |
| ८६ | २० | ग्रथथ | ग्रथ |
| ८८ | १ | श्रतीना | श्रुतीना |
| १०८ | ९ | निचयनगर | विजयनगर |
| ११२ | १८ | म्हसूर | आंध्र |
| ११३ | २५ | बूर्वागार | पूर्वागार |
| १२५ | ११ | स्वभासिद्ध | स्वभावसिद्ध |
| १४७ | १ | २३वें | २४वें |
| १५२ | १० | ससेच | तसेच |
| १५९ | २१ | थ्यामधील | या मधील |
| १७० | १८ | हें आहे | हें खरें |
| १९८ | २० | टेवणारे | ठेवणारे |
| २०८ | १७ | यजर्थ | यज्ञार्थ |

ता. क काना, मात्रा, अनुस्वार इत्यादि किरकोळ अशुद्ध शब्दाचें शुद्धिपत्र देण्यात आलें नाहीं ते मुद्रण दोष नजर चुकून राहून गेले आहेत. त्या बद्दल वाचकानी क्षमा करावी-